# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

## १९३७ (एप्रील ते दिसेंबर)

# विषयानुक्रमणिका



टीप:— प्रथमचे आंकडे अंकाचे असून नंतरचे पृष्ठांक समजावेत.

---

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

## १९३७ (एप्रील ते दिसेंबर)

# लेखकांची अनुक्रमणिका

टीप:—प्रथमचे आंकडे अंकाचे असून नंतरचे पृष्ठांक समजावेत.

महाराष्ट्र साहित्य परिषद् मंदिर



मंदिर उद्घाटनाच्या दिवशीं भरलेली विशेष साधारण सभा



# मराठींतील कांहीं ध्वनि आणि त्यांचीं चिन्हें*

——:0:——

## १ ऋ-ऌ हे स्वर नव्हेत

संस्कृतांत ऋ-ऌ याना स्वर मानतात. प्राचीन काळीं त्यांचा उच्चार स्वरासारखा होत असेल. तो कसा होत असेल तें कळायला आज मार्ग नाहीं. मराठींत ऋ-ऌ यांचा सांप्रत जो उच्चार होत आहे तो स्वरासारखा नाहीं. अ, आ, इ, उ, ए, ओ हे आपले स्वरच काय, पण इंग्रजींतून मराठींत आलेले बॅट, हॅट् इत्यादि शब्दांतील ॲ, आणि कॉलेज, बॉल इत्यादि शब्दांतील ऑ हे नवे पाहुणे स्वर सुद्धा, सारेच 'अ'चीं निरनिराळीं निर्मळ रूपें वाटतात. 'ज्ञ'चा उच्चार जसा आज मराठींत ज् आणि ञ् यांच्या संयोगाहून अगदीच भिन्न म्हणजे 'द्न्य' असा होतो त्याप्रमाणे ऋ-ऌ यांचे आज होत असलेले उच्चार हे प्राचीन अकाराच्या रूपावलींत बसतील अशा उच्चाराहून अगदीच भिन्न असे होतात. त्यांचा कांहीं तरी उच्चार होतो त्या अर्थी तो एखाद्या स्वरावांचून होत नाहीं हे उघड आहे. ऋ-ऌ यांचा उच्चार स्वरान्त व्यञ्जनासारखा होतो. ऋ-ऌमध्ये आरंभी अनुक्रमें रकार आणि लकार आहेत; आणि त्यात एकच विशिष्ट स्वर मिळून गेलेला आहे. हा स्वर कोणता?

ऋ-ऌमध्ये प्रतीत होणारा स्वर स्वतंत्रपणें कोठें आढळत नाहीं यावरून तो अस्तित्वांतच नाहीं अथवा त्याचें शुद्ध स्वरूप निश्चित करण्याची आवश्यकताच नाहीं असें नाहीं. ञ् हें व्यञ्जन तरी स्वतंत्रपणें कोठें आढळतें? तें तसें स्वतंत्रपणें न आढळल्यानें त्याचा उच्चार जेव्हा यँ् असा करण्यात येतो तेव्हा तो चुकीचा असतो. ञ् हें व्यञ्जन स्वरामागून आणि चवर्गांतील दुसऱ्या एखाद्या व्यञ्जनाशीं संयुक्त असे येतें तेव्हा त्याचा स्वाभाविकपणें जो उच्चार होतो, तो स्वतंत्रपणें करून दाखवायला कठिण जात असला तरी तोच शुद्ध मानायला हवा. पण तें असो. ञ् हें व्यञ्जन स्वतंत्रपणें न आढळताहि त्याला जसें व्यञ्जनमालेमध्ये स्थान आहे त्याचप्रमाणें ऋ-ऌमध्यें प्रतीत होणाऱ्या स्वरालाहि स्वरमालेंत स्थान मिळणें अवश्य आहे. त्या स्वरासाठी स्वतंत्र चिन्हाचीहि योजना करायला हवी.

हा नवखा स्वर धड इहि नाहीं आणि धड उहि नाहीं. इ आणि उ यांच्यामध्ये कोठे तरी उ-कडे कलतें असें त्याचें स्थान आहे. या नवख्या स्वराचें स्वतंत्र अस्तित्व आणि त्याचा स्वतंत्र उच्चार हीं पुढील प्रयोग करून पाहिला असता पटतात.

एखादें स्वरान्त अक्षर दीर्घ उच्चारीत राहिलें तर व्यञ्जनोच्चार हा आरंभींच तेवढा होतो; आणि पुढे त्या स्वराचाच शुद्ध उच्चार होत राहतो. लांबविता येणें हा स्वराचाच धर्म आहे; म्हणून ऱ्हस्व स्वर सुद्धा लांबविता येतो. 'कृ' हें अक्षर ऱ्हस्व असलें तरी त्यांतील स्वर लांबवितां येत नाहीं असें नाहीं. आता कृ हें अक्षर लांबवून उच्चारिलें की, 'क्र्' हे दोन व्यञ्जनोच्चार आरंभीं होऊन पुढे सतत लांब जो उच्चार होत राहतो तो ऋमधील स्वराचा शुद्ध उच्चार होय. ऌमध्येहि हाच स्वरोच्चार आहे. हा अकाराच्या रूपावलींत बसतो इतकेंच नव्हे तर र् वा ल् प्रमाणे इतर व्यञ्जनांशींहि तो संयुक्त होऊं शकतो.

---

* गेल्या मराठी व्याकरणपरिषदेंत वाचलेला निबंध.

हा स्वर र् आणि ल् याच्याशींच संयुक्त असा आढळतो म्हणून लृप्रमाणेच 'र्'ला खाली ृ हें जोडून ऋसाठी चिन्ह सिद्ध करावें. ऋ-लृमध्ये जो स्वर उच्चारिला जातो त्याच्यासाठी स्वतंत्र चिन्ह हवें तें अच्या खाली ृ ही खूण जोडून सिद्ध करावें; हें चिन्ह स्वर-मालेंत घ्यायला कांहीच आक्षेप येऊं शकत नाही.

## २ कांही दिखाऊ संयुक्त व्यञ्जनें

संयुक्त व्यञ्जनाचा विशेष असा असतो की, ते जेव्हा एखाद्या स्वरान्त अक्षरामागून येतें तेव्हा सलग उच्चार करतांना त्या संयुक्त व्यञ्जनातील पहिल्या व्यञ्जनाचा उच्चार त्या-पूर्वीच्या अक्षरांत समाविष्ट होऊन त्याला व्यञ्जनान्त करतो. विप्र या शब्दाचीं दिसायला अक्षरें वि-प्र अशीं असलीं तरी सलग शब्द उच्चारितांना तीं विप् प्र अशीं पडतात. म्हणजे संयुक्त व्यञ्जनांतील पहिल्या व्यञ्जनाचा उच्चार तत्पूर्वील अक्षरांतहि राहतो आणि पुढील अक्षराच्या आरंभींहि राहतो.

असें होतें म्हणूनच संयुक्त व्यञ्जनांत प्रथम व्यञ्जन जर दुहेरी असेल तर तसें तें न लिहितांहि उच्चारिलें जातें. उच्चारदृष्ट्या 'न-त्वम्' आणि 'त-त्त्वम्' याच्यांत पहिल्या व्यञ्जनोच्चारापलीकडे कांही भेद नाही. उज्ज्वल हा शब्द 'उज्वल' असा लिहिला तरी त्याचा उच्चार उज्-ज्व-ल असाच होतो.

याला एकच अपवाद आढळतो. संयुक्त व्यञ्जनांतील पहिलें व्यञ्जन जर र् असेल तर तें पूर्वीच्या अक्षरांत समाविष्ट होऊन त्यास व्यञ्जनान्त करतें; पण पुढील अक्षराच्या आरंभीं तें उच्चारित होत नाही. तर्क या शब्दाचीं उच्चारतः अक्षरें तर्-क अशीं दोन पडतात. याचें कारण एकच संभवतें की, र्-च्या मागून जोडून येणाऱ्या व्यञ्जनाचा उच्चार करतांना मध्ये सूक्ष्म असा खटका, विग्रह राहून जातो.

या खटक्याची थोडी कल्पना येण्यासाठी कांही उदाहरणें देतों. व्यञ्जनापुढे स्वर आला असतां आपण स्वाभाविकपणें त्यांचा संधि करतों; परंतु हा संधि न करतां उच्चार करताच येत नाही असें मात्र नाही. कुर्-आन् हा अरबी शब्द पहिलें अक्षर व्यञ्जनान्त आणि दुसरें स्वरादि मिळून झाला आहे. तेव्हा या शब्दांतील दोन्ही अक्षरें गुरु होतात. पण संधि करून कुरान् असा उच्चार केला की तो उच्चार सुलभ वाटला तरी त्यात पहिलें अक्षर लघु होऊन दुसरेंच तेवढें गुरु राहतें.

संयुक्त व्यञ्जनाच्या प्रकरणीं इतकी प्रस्तावना केल्यानंतर आता दिखाऊ संयुक्त व्यञ्जनां-कडे वळूं. हीं दिखाऊ संयुक्त व्यञ्जनें म्हटलीं म्हणजे ण्ह्, न्ह्, म्ह्, ऱ्ह्, ल्ह् आणि व्ह् हीं होत. हीं वस्तुतः संयुक्त नव्हेत. पांच वर्गांतील दुसरीं आणि चौथीं व्यञ्जनें हीं जशीं अनुक्रमें पहिलीं आणि तिसरीं यांचे महाप्राणयुक्त अवतार होत त्याचप्रमाणे ण्ह्, न्ह्, म्ह्, ऱ्ह्, ल्ह् आणि व्ह् हे अनुक्रमें ण्, न्, म्, र्, ल् आणि व् यांचे महाप्राणयुक्त अवतार होत. पांच वर्गांतील दुसरीं आणि चौथीं हीं महाप्राणयुक्त व्यञ्जनें सुद्धा, जर महाप्राणासाठी लिपींत एक पृथक् चिन्ह असतें तर दिसायला संयुक्तच दिसलीं असतीं. परन्तु तीं असंयुक्त मानण्यांत येऊन त्यांच्यासाठी स्वतंत्र चिन्हें निर्माण करण्यांत आलीं. तीं असंयुक्त का मानण्यांत आलीं असावींत? हा महाप्राण त्या व्यञ्जनांत अगदी एकजीव होतो म्हणूनच तीं असंयुक्त मानण्यांत आलीं असा-वींत. मराठींतील अनुनासिक उच्चार हा जसा स्वराशीं एकजीव होतो तसा हा महाप्राण व्यञ्ज-नाशीं एकजीव होत असावा.

ण्ह्, न्ह्, म्ह्, ऱ्ह्, ल्ह्, व्ह् हे महाप्राणयुक्त उच्चारच संस्कृतांत नाहीत म्हणून त्यांच्यासाठी स्वतंत्र चिन्हेंहि नाहीत. मराठींत हे उच्चार नवीन आले तेव्हां स्थूल दृष्टीने विचार करून त्यांच्यासाठी हीं संयुक्त चिन्हें निर्माण करण्यांत आलीं. परन्तु चिन्हें संयुक्त दिसतात एवढ्यावरून तीं संयुक्त व्यञ्जनें ठरत नाहीत. संयुक्त व्यञ्जनांतील पहिलें व्यञ्जन अंशतः पूर्वीच्या अक्षरांत मिळून जाऊन तें स्वरान्त असल्यास त्यास व्यञ्जनान्त करतें हा निरपवाद अनुभव ण्ह्, न्ह्, म्ह्, ऱ्ह्, ल्ह् आणि व्ह् याच्या ठिकाणीं येत नाही. कण्हेर, पन्हें, वऱ्हाडी, वल्हें, नव्हे इत्यादि शब्दांतील प्रथमाक्षर हें अखेर, विधे, अघाडी, वझे, लढे, मधे इत्यादि शब्दांतील प्रथमाक्षरांप्रमाणे स्वरान्तच राहतें. या ठिकाणीं हीं संयुक्त व्यञ्जनें दिखाऊच आहेत याविषयी शंका नाही.

परन्तु 'तुम्ही' या शब्दाचा उच्चार करतांना पहिलें अक्षर कित्येकदा व्यञ्जनान्त होतें तेव्हा काय होतें आणि तें कशाने होतें ? मराठींत द्व्यक्षरी शब्द ठासून उच्चारायचा झाला की पहिलें अक्षर केवळ दीर्घ असूनहि भागत नाही , तें व्यञ्जनान्त व्हावें लागतें; आणि दुसऱ्या अक्षराच्या आरम्भींचें व्यञ्जन दुहेरी केल्याने त्यातील एक पहिल्या अक्षरात समाविष्ट होऊन त्यास व्यञ्जनान्त करतें. 'आता' हा शब्द टासून उच्चारताना 'आत्ता' होतो, आणि कादंबऱ्यांतील संवादांत तसाच लिहिलाहि जातो. पात्राच्या तोंडीं "मी कध्धी कध्धी येणार नाही" असें वाक्य असलें तर 'कध्धी'च्या ठिकाणीं कधी हें शब्दरूप लिहून चालत नाही. वस्तुतः उच्चाराच्या दृष्टीने पाहता 'कध्धी' हें रूपहि थोडें चुकीचेच आहे. ध् ला ध् न जोडतां तो द् ला जोडायला हवा म्हणजे लेख कद्धी असा पाहिजे. कारण महाप्राण हा स्वराचा उच्चार करतानाच व्यञ्जनाशीं संयुक्त होतो, तत्पूर्वी होऊं शकत नाही. म्हणून 'जख्ख', 'मठ्ठ', 'बथ्थड', लफ्फेदार', इत्यादि शब्दांत महाप्राणयुक्त व्यञ्जनाचे द्वित्व लिहिणें चुकीचें आहे. 'अच्छा', 'मच्छी', 'गद्धा' इत्यादि शब्दात संयुक्त व्यञ्जनांतील पहिलें व्यञ्जन ज्याप्रमाणे महाप्राणशून्य असें लिहिलें जातें त्याचप्रमाणे 'जख्ख', 'मठ्ठ', 'बथ्थड', 'लफ्फेदार' हे शब्दहि 'जक्ख', 'मट्ठ', 'बत्थड', 'लप्फेदार' असेच लिहिले गेले पाहिजेत; असो.

'कधी' हा शब्द ठासून उच्चारताना त्याचे ज्याप्रमाणे 'कद्धी' असें रूप होतें, त्याचप्रमाणे 'तुम्ही' हा शब्द ठासून उच्चारताना 'तुम्म्ही' असें रूप होतें.

ज्या संयुक्त व्यञ्जनात आरंभी ह् आहेत अशी ह्न, ह्म, ह्ल, ह्व हीं जीं संयुक्त व्यञ्जनें संस्कृत शब्दांत आढळतात त्याचा मराठीत उच्चार करताना वर्णविपर्यय होतो आणि ठासून उच्चार करण्यासाठी म्हणून न्ह्, म्ह् आणि ल्ह् याच्यामधील प्रथम व्यञ्जनाचें द्वित्व होतें. असें केल्याने शब्दांचे मात्रालेखन पालटत नाही. चिह्न ( –⏑ ) हा शब्द चिन्–न्ह असा उच्चारला की मात्रालेखन ( –⏑ ) एक गुरु एक लघु असेंच राहतें. चिन्ह, ब्रम्ह आणि प्रल्हाद यांचे उच्चार अनुक्रमें भिन्न, ढम्म आणि जल्लाद याच्याशीं ताडून पाहिल्यास वर जें म्हटलें आहे त्याची प्रतीति येईल.

ह्र याचा विपर्यय र्ह् असा होत नसला तरी ह्र हा शब्दाच्या आरंभींच आढळतो त्यामुळे त्याच्या पूर्वीच्या अक्षरास व्यञ्जनान्त करण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाही, आणि ह्र याचा उच्चार ऱ्ह् या महाप्राणयुक्त र् सारखा होतो. त्याच्या पूर्वीच्या अक्षरास गुरुत्व आलें नाही तरी चालेल असें वाटतें आणि 'प्राप्यनाभिह्रदमज्जनमाशु' (माघ १०।६०)

वा 'तव ह्रियाऽपह्रियो ममे ह्रीरभू-
च्छशिगृहेऽपि ह्रुतं न धृताततः

या पद्यांत छन्दोभङ्ग झाला नाही असें मानण्यांत येतें. अह्रस्व याचा उच्चार जर अर्-

ऱ्हस्व वा अर्ऱ्हस्व म्हणजे अर्-ह्रस्व असा केला तर तो कानाला चुकीचा वाटतो. र् शीं संयुक्त असलेलें व्यञ्जन उच्चारतांना र् नन्तर स्वाभाविकपणेंच खटका पडत असल्याने त्याचा उच्चार पूर्वीच्यांत मिळून जाऊन त्यास व्यञ्जनान्त करतो पण पुढील अक्षराच्या आरंभीं पुन्हा तो येत नाही हें मागेच सांगितलें आहे.

'हृदय' या शब्दांत ह् ला ऋ जोडून लिहितात पण उच्चारात महाप्राणयुक्त रकार आधी येतो आणि पुढे ऋ-तमधील शुद्ध स्वराचा उच्चार होतो. अर्थात् हा शब्द 'ऱ्हृदय' असा लिहिणें योग्य होईल. ऱ्ह् हें संयुक्त व्यञ्जन नसल्याने 'तऱ्हा' या शब्दांत जसें प्रथमाक्षर व्यञ्जनान्त होत नाही तसेंच तें 'अहृदय' या शब्दातहि होत नाही.

तेव्हा 'चिन्ह' इत्यादि शब्दांत संयुक्त व्यञ्जनांतील प्रथम व्यञ्जन दुहेरीच लिहावें म्हणजे उच्चाराचा घोटाळा होण्याची भीतिच उरणार नाही. ब्रह्म हा शब्द ब्रह्म असा तरी उच्चारावा अथवा ब्रम्ह असा तरी लिहावा. संस्कृतात शब्दान्त्य न्‌च्या मागे ऱ्हस्व स्वर असून पुढे स्वर आला असता न् चें द्वित्व करतात त्याप्रमाणे चिन्ह, ब्रह्म, प्रल्हाद इत्यादि शब्दात करायला कांही प्रत्यवाय असूं नये. आणि मग ण्ह्, न्ह्, म्ह्, ऱ्ह्, ल्ह् आणि व्ह् ही व्यञ्जनें दिसायला संयुक्त दिसली तरी तीं असंयुक्त महाप्राणयुक्त व्यञ्जनें समजावीत. तऱ्ही आणि बर्ही यातील रकारविषयक भेद दाखवायला दोन निरनिराळीं चिन्हें असण्याचें प्रयोजन नाही. 'बर्ही'मध्ये खटका आहे तो-अवग्रह चिन्हाने दाखवून तो शब्द बर्-ही असा लिहिला तरी चालेल. अर्क, तर्क हे शब्द 'अऱ्क', 'तऱ्क' असे जरी लिहिले तरी त्यांचे उच्चार भलते होण्याची भीति सुतराम् नाही.

य् शीं संयुक्त होणाऱ्या व्यञ्जनाचा उच्चारहि मराठींत असंयुक्त व्यञ्जनासारखाच होतो; आणि ज्या संस्कृत तत्सम शब्दात तो असंयुक्त व्यञ्जनासारखा न होतां संयुक्त व्यञ्जनासारखा होतो तेथें वस्तुतः पहिल्या व्यञ्जनाचें द्वित्व होतें. नद्या या शब्दाची अक्षरविभागणी उच्चारतः न-द्या ( ᵕ – ) अशीच होते. 'नद्याम्' या संस्कृत शब्दाच्या उच्चारात अक्षरविभागणी नद्-द्याम् ( – – ) अशी होऊन पहिले स्वरान्त अक्षर व्यञ्जनान्त होतें. सत्याने (<सत्य ) आणि वत्याने (<वत्ता ) या दोन शब्दांच्या उच्चाराची तुलना केली असतां सत्याने ( सत्-त्या-ने ) हा शब्द उच्चारतांनाहि त् चें द्वित्व कसें होते तें स्पष्ट होईल.

वऱ्याचा आणि कविवर्याचा यातील ऱ्याच्या उच्चारात काय भेद आहे! पहिल्या शब्दांत ऱ्य् हे वस्तुतः असंयुक्तच व्यञ्जन आहे. तर दुसऱ्या शब्दांत र् नंतर खटका आहे. तेव्हा कविवर्यांचा हा शब्द कविवऱ्याचा असा लिहिला तर रेफेचें प्रयोजनच उरणार नाही. 'छऱ्यांचा या शब्दांत मात्र र दुहेरी आहे. संभाषणांत ठासून म्हणतांना उद्या हा शब्द सुद्धा उद्-द्या असा उच्चारिला जातो तेथे द् दुहेरी लिहावा हेंच योग्य होय.

संयुक्त व्यञ्जनाचा हा धर्मच आहे की स्पष्ट जोडून उच्चार करतांना त्यांतील प्रथम व्यञ्जनाचा उच्चार पूर्वीच्या अक्षरांत मिळून तें स्वरान्त असल्यास त्यास व्यञ्जनान्त करतो. परंतु महाप्राणयुक्त ण्, न्, म्, ऱ्, ल्, व् यांचा, वा य्शीं पूर्वी संयुक्त होणाऱ्या कोणत्याहि व्यञ्जनाचा उच्चार असंयुक्त वर्णाप्रमाणे होऊं शकत असल्याने त्यांना असयुक्तच मानावें; आणि जेथे तो उच्चार तसा होत नाही तर एखाद्या व्यंजनाचें द्वित्व होतें तेथे तें द्वित्व लिहून दाखविणेंच योग्य होईल. पुण्ण्याला' शब्द लिहितांना णचें द्वित्व लिहून दाखविल्यास 'पुण्याला' या शब्दाचा आणि त्याचा घोटाळाच होणार नाही.

माधवराव पटवर्धन

# 'वृद्धाचारा'संबंधी चार शब्द

( ले०—श्री. बाळकृष्ण महानुभाव शास्त्री )

१. महानुभाव-वाङ्मय हें बृहन्महाराष्ट्राचें विशिष्ट असें सांस्कृतिक धन असल्यामुळे त्याकडे सध्या बऱ्याच विद्वानांचें लक्ष वेधलें आहे. त्यापैकी श्री. वामनराव देशपांडे, यवतमाळ यांचें नांव महानुभाव-वाङ्मयाभ्यासकांत चिरस्मरणीय राहील यांत शंका नाही. कारण त्यांनी सुमारे एक तपापासून महानुभाव-वाङ्मयाचा अभ्यास अत्यंत आस्थापूर्वक चालविलेला आहे. त्याचें मूर्त स्वरूप त्यांच्या अनेक लिखाणांतून अनेकदा वाचकांना दृग्गोचर झालें आहे. नुकतेंच श्री. वामनराव यांनी 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या व. ९ अं. ३ मध्ये महानुभाव-वाङ्मयापैकी 'वृद्धाचार' नावाचें एक प्राचीन गद्यप्रकरण प्रसिद्ध केलें आहे तें महानुभाव-वाङ्मयाभ्यासकांस बरेंच उपयुक्त होईल अशी आशा आहे. परंतु त्यात काही शब्दांचे सांप्रदायिक अर्थ श्री. वामनराव यांच्या लक्षांत न आल्यामुळे त्यांच्याकडून टीपा देण्यांत क्वचित् अनवधानता झालेली मला आढळून आली. तिचा सांप्रदायिक व्यक्ति या नात्याने मी खुलासा करीत आहें. सदरहु खुलाशाप्रमाणे वाचकवृन्दाने 'वृद्धाचारा'ची शुद्धि करून घेतल्यास त्याच्या अनेक शंका दूर होण्यास बरीच मदत होईल असें वाटतें.

२. श्री. वामनराव यांनी 'प्रास्ताविक' भागाच्या ३ ऱ्या परिछेदांत खेदपूर्वक लिहिलें आहे की, "उपलब्ध साधनांवरून वृद्धाचाराचा जनक व त्याचा लेखनकाल यांचा निर्णय करण्यास कसलीहि मदत होत नाही !" हें त्यांचें विधान प्रायः खरें असलें तरी वृद्धाचाराच्या क्रमांक २९ मध्ये आलेल्या "ऐसी मार्गरूढि" या पदांवरून लेखनकालाची एक सीमा निश्चित करण्यास बरीच मदत होते. ती येणेंप्रमाणे :—

'मार्गरूढि' या सांप्रदायिक परिभाषेची व्याख्या वृद्धाचारकर्त्यांनी आरंभींच दिलेली आहे. ते लिहितातः—" वर्तमानाखालौत्तर वर्तमानयुक्त रूढ जे मार्गप्रवर्तक त्याची जे स्थीति ते मार्गरूढिः". याशिवाय एका प्राचीन वोवीबद्ध 'अन्वयमाळा' नांवाच्या ग्रंथांत "अचळ मुरारी धाराशिवकर : सिद्धांते सुंदर हरिराज : ॥२७॥ शिवराज गुर्जर मुख्य परमार्ग : चौघांचा आचार मार्गरूढि : ॥२८॥" अशी 'मार्गरूढी'ची व्याख्या दिली आहे. अर्थात् अचल मुरारिबास, धाराशिवकर ओंकारबास, सिद्धान्ते हरिबास आणि गुर्जर शिवबास या चौघांनी सांगितलेले किंवा त्यांच्या विद्यमानीं घडलेले वृत्तान्त ती 'मार्गरूढि'. या 'मार्गरूढी'-चा उल्लेख ज्या अर्थी वृद्धाचारांत आलेला आहे त्या अर्थी वृद्धाचाराचें लेखन मार्गरूढी-नंतरच झालें असलें पाहिजे हें उघड दिसतें. याप्रमाणे वृद्धाचाराच्या लेखनकाळाची एक सीमा निश्चित करतां येते. मार्गरूढि याचे मुख्य पुरुषांची शिष्यपरंपरा श्री. मुरलीधर महानुभाव शास्त्री यांनी 'पूर्णेन्दु' (व. ५ अं. ३-४ पा. ३६) मासिकांतून दिलेली आहे. ती वाचकांच्या सोयीसाठी येथे उद्धृत करतों :—




प्रस्तुत ४५ आख्यायिकांच्या वृद्धाचाराच्या कर्त्याचें नाव सध्या उपलब्ध नसलें तरी एका अन्वयस्थळांत असा उल्लेख आढळतो की, "नागनाथ (बत्तीसलक्षणकार आनेराजबासांचे शिष्य) बासांचे शिष्य कवी मालोबास : त्याही **पांचसे स्मृति** : (१२५) **वृद्धाचार** : हे अन्वयीं लाविलीं :......पूर्वी नरेन्द्रबासीं रुक्मिणीसैंवर केलें आन **सातसें स्मृति** : जैस्या वर्तल्या तैस्याचि लिहिल्या :" ('अन्वयस्थळ' पोथी रितपुर येथे श्री. कृष्णराज लासूरकर यांच्या संग्रहीं आहे.)

३. श्री. वामनराव यांना एक पृच्छा करावीशी वाटते ती ही की, महमद सुलतान (तघलख) सन १३२५-१३५१ (श. १२४७-१२७३) पर्यंत दिल्लीच्या गादीवर विद्यमान असल्याचें इतिहास मुक्तकंठाने सांगत असतां त्यांनी वृद्धाचाराच्या प्रास्ताविक लेखाच्या ४ थ्या परिच्छेदात "अर्थात् यातील सर्वच माहिती म्हणजे निर्भेळ ऐतिहासिक सत्य नव्हे, हें क्रमांक २४ मधील दिल्लीच्या महंमद सुलतानाच्या (!) उल्लेखावरून स्पष्टच दिसतें !" अशी शंका कां उपस्थित केली ! मला तर त्यांची सदरहु शंका अगदीच अनाठायीं दिसते. कारण महानुभाव-वाङ्मयांतील कोणताहि ऐतिहासिक उल्लेख (घटनात्मक) असत्य नसून एकूण एक सर्वच ऐतिहासिक उल्लेख निर्भेळ सत्य आहेत असें मी खात्रीने म्हणू शकतों. महानुभाव-वाङ्मयात जर कोणता वादग्रस्त विषय असेल तर तो शकांचे आंकडे हाच होय. व त्याचसंबंधाने सध्या विद्वानांत वाद चालू आहे.

४. पान ८१, ओळ १३ वरील "कवीबास" या पदापुढे ':' अशीं दोन टिंबें पाहिजेत. म्हणजे "कवीबास :" या पदाचें सांप्रदायिक वाचन "कवीबास वासना :" असें होईल. व त्याचा अर्थ "कवी मालोबास यांच्या मतें" असा होतो. कारण, 'कवी मालोबास' यांनी सबंध 'वृद्धाचार' लिहिले असल्याचा उल्लेख एका अन्वयस्थळांत दिलेला आहे.

"**कवीबास**" या पदापुढील "**खांबाइतीं राजन्यकुमरत्वें सर्वलक्षणसंपूर्ण ईश्वरावतार सदइया लोकत्रयपरित्रीकरणार्थ भटोबासीं जन्म स्वीकारू :**" हा मजकूर

श्री. वामनराव यांनीं जाड खिळ्यांत द्यावयाला नको होता, व त्याला निराळ्या परिच्छेदातहि घालणें उचित नव्हतें. तसें केल्यामुळे तो क्रमांकाचा मथळा असल्याचा आणि क्रमांक निराळा असल्याचा भास होतो. ज्या पोथीवरून श्री. वामनराव यांनी 'वृद्धाचारा'ची मुद्रणप्रत बनविली तिजवरून हा पोटमथळा वाटतो हें खरें, पण वस्तुतः क्रमांक ३ मधीलच सदर मजकूर आहे, व तो पुष्कळ पोथ्यांवर प्रस्तुत क्रमांकाच्या शेवटीं म्हणजे "बहुता परि वारीले :" (रा. ८२ ओ. ३-४) या पदाच्या पुढे लिहिलेला असतो. वास्तविक तो पाहिजेहि शेवटीं. कारण, वृद्धाचारकर्त्याने 'कवी मालोबास' यांचें निराळें मत म्हणूनच येथे नमूद केलें आहे.

५. श्री. वामनराव यांनी वृद्धचारांतील ४४व्या आख्यायिकेखाली "ही आख्यायिका अडीचशेंच्या 'नागदेवाचार्यस्मृतीं'त आली आहे" अशी एक टीप दिली आहे. तिच्यावरून असा निष्कर्ष निघूं पाहतो की, "भटोबास बोलिली ते स्मृतिः" (=श्रीनागदेवाचार्यांनी सांगितलेल्या किंवा त्यांच्या हयातीत घडलेल्या प्रसंगांचा संग्रह ती 'स्मृति'); आणि "भटोबासाखालौत्तर श्रुतिस्मृतियुक्त तो वृद्धाचारः*" (=श्रीनागदेवाचार्यांच्या निधनानंतर परशुरामबास, रामेश्वरबास, हर्दमुनि, हीराम्बा आणि नागाम्बा यांनी सांगितलेल्या किंवा त्यांच्या हयातींत घडलेल्या प्रसंगांचा संग्रह तो 'वृद्धाचार') अशी स्मृति आणि वृद्धाचार यांची परिभाषा वृद्धाचारारंभींच वृद्धचारकर्त्यांनी ठरविलेली असताना सुद्धा ज्या अर्थी वृद्धाचारांतील ४४वी आख्यायिका अडीचशेच्या नागदेवाचार्यस्मृतींत आलेली आहे त्या अर्थी वृद्धाचारकर्त्यांनी ठरविलेली 'स्मृति' आणि 'वृद्धाचार' यांची परिभाषा चुकीची आहे. परंतु हा निष्कर्ष वस्तुस्थितीच्या अगदी विरुद्ध आहे. वस्तुस्थिति अशी आहे की, महानुभाव-वाङ्मयांत 'स्मृति' आणि 'वृद्धाचार' हे दोन्ही एकापुढे एक असे एकाच पोथीवर एकत्र लिहिलेले असतात. त्या पोथ्यांचेहि दोन प्रकार आहेत. काही पोथ्यात सुमारे अडीचशे 'स्मृति' व २७ 'वृद्धाचार' असतात; आणि काही पोथ्यात सुमारे साडेतीनशे 'स्मृति' व ४५ 'वृद्धाचार' असतात. या दोन्ही प्रकारच्या पोथ्यांचे कर्ते निरनिराळे आहेत हें निराळें सांगणें नकोच. त्यातहि दोन पक्ष संभवतात. ज्याने अडीचशे 'स्मृति' लिहिल्या त्यानेच २७ 'वृद्धाचार'हि लिहिले; व ज्याने साडेतीनशे 'स्मृति' लिहिल्या त्यानेच ४५ 'वृद्धाचार'हि लिहिले, हा एक पक्ष; आणि ज्याने अडीचशे 'स्मृति' लिहिल्या त्याच्याच अनुयायाने २७ 'वृद्धाचार' लिहिले; व ज्याने साडेतीनशे 'स्मृति' लिहिल्या त्याच्याच अनुयायाने ४५ 'वृद्धाचार' लिहिले, हा दुसरा पक्ष. कोणताहि पक्ष स्वीकारला तरी एकाच्या मतें एक प्रसंग श्रीनागदेवाचार्यांच्या हयातींत घडला म्हणून त्याने तो प्रसंग स्मृतींत नमूद केला; आणि तोच प्रसंग दुसऱ्याच्या मतें श्रीनागदेवाचार्यांच्या निधनानंतर घडला म्हणून स्मृतींत नमूद न करतां त्याने किंवा त्याच्या अनुयायाने 'वृद्धाचारा'त लिहिला. या मतभेदाच्या वस्तुस्थितीमुळे स्मृतींतील प्रसंग वृद्धाचारांतहि येऊं शकतात आणि 'वृद्धाचारा'चे प्रसंग 'स्मृतीं'तहि जाऊं शकतात. याप्रमाणे एकच प्रसंग 'स्मृति' आणि 'वृद्धाचार' या दोन्ही ठिकाणीं वर्णिलेला असल्यास त्याची संगति लावतां येणें शक्य आहे. उदाहरणार्थ :—

---

* "परशुराम आणि दूजा रामेश्वरु : तीसरा सुन्दरु : हर्दमुनि : ॥२५॥
हीराम्बा नागाम्बा : मुख्य पांच जण : यांचे पै वर्तन वृद्धाचारु : ॥२६॥

(कृष्णमुनिविरचित 'अन्वयमाला')

अडीचशेच्या 'नागदेवाचार्य स्मृतीं'त पुढील एक प्रसंग वर्णिलेला आहे. "विष्णुदासा नामयां पंडीतमुखें वेधसंक्रमण: ।। एकदीं नामया पंडीतबासासि भेटला : चर्चा केली : पंडीतबासीं खंडिला : मग उपदेशू मागों लागला : परि नेदीतीचि : मग कृष्णावतारावरि बुधि आली : मग तेनें "दीस गेले वाया वीण" यें पदें केलीं : ।। एकी वासना : (=एकाच्या मतें) कवीश्वरबासीं खंडिला : तैसाचि केमया : (=केमया नावाचा गृहस्थहि खंडिला. जसा नामदेवाचा नामया तसाच केमदेवाचा केमया.) ।।२४४।।" हाच प्रसंग थोड्याबहुत फरकाने श्री. वामनराव यांनी संपादिलेल्या ४५ आख्यायिकांच्या वृद्धाचारात क्रमांक २७ मध्ये नमूद आहे. अशा 'स्मृति' आणि 'वृद्धाचार' या दोही ठिकाणीं वर्णिलेल्या प्रसंगाची संगति वर निर्देशिलेल्या वस्तुस्थितीनुसार लावतां येईल. अर्थात् अडीचशे-स्मृतिकारांच्या मतें वरील विष्णुदास-नामदेवाचा प्रसंग श्रीनागदेवाचार्यांच्या हयातींत घडला म्हणून तो स्मृतींत नमूद केला. आणि साडेतीनशे-स्मृतिकाराच्या आणि त्यांच्या अनुयायांच्या मतें सदर प्रसंग श्रीनागदेवाचार्यांच्या निधनानंतर घडला म्हणून तो वृद्धाचारांत नमूद केला.

श्री. वामनराव यानी ज्या वृद्धाचाराच्या ४४ व्या आख्यायिकेसंबंधी—अडीचशेच्या 'नागदेवाचार्य स्मृतींत' आलेली असल्याची—टीप दिली आहे ती आख्यायिका अडीचशे स्मृतींतून उद्धृत करून वाचकांच्या समोर ठेवतों, म्हणजे ते स्वतःच 'वृद्धाचारा'तील प्रसंग 'स्मृतींत' कसा गेला याचा निर्णय करून घेतील. अडीचशे स्मृतींतील वर्णन पुढीलप्रमाणें आहे—

"अटणीं वीनाएकबासीं. अनूकुळीं संभापण करणें ।। वीनाएकदाये ते **भटोबासांचे शिष्य** : तेयाचां ठाइं वैराग्यनीष्टता : एकदीं ते **भटोबासांते** पुसौनि अटनासि निघाले : तव अटनवीशेषें एका मार्गीयाचेया गावा अनकूळाचेया घटा भीक्षेसि गेले : तेयातें पडिताळिलें: तंव तो गांवीं नाहीं : तेयाची स्त्री घटी होती : तीएसि नेसावेया नाहीं : पाळणा लेंकरूं तें उखरडी निजैलें होतें : तेंही रडत होतें : काइसेनही बूझावेना : तवं तीया वीनाएकबासा देखिलें : आन तैसेंचि फाटुकेनि वस्त्रेंसि दंडवत केलें : वीनाएकबासीं तेया अनकूळातें पुसीलें : तिया म्हणितलें : गांवा गेला : म्हणौनि सांघीतले : हें लेंकरूं का रडतें : तिया म्हणितलें : या उखरडी पाळणा असे म्हणौनि रडतें : मग वीनाएकबासीं तियेसि झोळियेचें अन्न दीधले : आन आपणयापासौनि एक वस्त्र तेया लेंकरुवाखालीं घातलें : आन तें रडों राहीलें : उरली भिक्षा केली : गंगे जेवीलें : तें **भटीं** आइकीलें : अथवा गुरूभावांडीं आइकीलें : आवघेया आश्चर्ये जालें: **भटोबास** तोखलेः ।।१२।।"

सदरील वर्णनांत आणि वृद्धाचारांतील ४४व्या आख्यायिकेच्या वर्णनात महत्त्वाचा फरक तो येवढाच लक्षात ठेवण्याजोगा आहे की, 'स्मृतीं'त' "विनाएक दाये ते **भटोबासांचे** शिष्य...... ते **भटोबासांतें** पूसौनि अटनासि निघाले :...... तें **भटीं** आइकीलें :...... **भटोबास** तोरवले अशीं पदें आहेत आणि त्यांच्या ऐवजी वृद्धाचारांत "वीनाएकदाए ते **परसरामबासांचे** सीष्य :...... ते **परसरामबासांतें** पुसुनि अटणा नीगाले :...... तें **परसरामबासीं** आइकीलें :...... **परसरामबास** तोरवले" अशीं पदें आहेत. तात्पर्य, अडीचशे-स्मृतिकारांच्या मतें श्रीविनायकबास हे श्रीनागदेवाचार्यांचे शिष्य होते, व त्यांच्याच विद्यमानीं विनायकबासांची हकीकत घडली, म्हणून ती स्मृतींत लिहिली; आणि साडेतीनशे-स्मृतिकारांच्या मतें विनायकबास हे परशुरामबासांचे शिष्य होते, व त्यांच्या विद्यमानींच विनायकबासांची हकीकत घडली, म्हणून ती त्यांनी स्मृतींत लिहिली नाही. उलट त्यांनी किंवा त्यांच्या अनुयायाने वृद्धाचारांत

नमूद केली. याप्रमाणे मतभेदामुळें वृद्धाचारांतील एखाद दुसरा प्रसंग स्मृतींत गेला किंवा स्मृतीतील एखाद दुसरा प्रसंग वृद्धाचारांत आला.

६. 'वृद्धाचारा'ची मुद्रणप्रत तयार करतांना श्री. वामनराव यांना ४५ आख्यायिकांची फक्त एकच पोथी माझ्या गुरुजींपासून मिळाली होती. यामुळे मूळातील पाठभेद कायम करतांना त्यांच्या हातून कांही स्थळीं प्रमाद घडणें साहजिक आहे, व त्याबद्दल निदान संशोधन करणारांस तरी आश्चर्य वाटणार नाही. कारण, सांकेतिक लिप्यांतील प्राचीन ग्रंथाची फक्त एकाच पोथीवरून मुद्रणप्रत तयार करतांना अनेकवार कशी कुचंबणा होते, हें त्यांस सहज पटेल. मला 'वृद्धाचारा'च्या कांही पोथ्या पाहण्यास मिळाल्या, त्यावरून श्री. वामनराव याचे वाचनदोष व अर्थदोष दाखवितां येऊं शकतात. अर्थात् या सर्व पोथ्या त्यांना उपलब्ध झाल्या असल्या तर कदाचित् सर्व नसले तथापि कांही प्रमाद तरी त्यांस टाळतां येणें अशक्य नव्हतें.

## वाचनदोष व अर्थदोष

(१) पा. ८३, ओळ ३६ येथील "तींहीं अभ्यागतां म्हणितलें" या वाक्यावर तळटीप देऊन यापुढील मजकूर गळला असावा, असें अनुमानात्मक विधान श्री. वामनराव यांनी केलें आहे. 'वृद्धचारा'च्या सर्व पोथ्यात या वाक्यापुढे तत्संबद्ध असा कांहीच मजकूर नसल्याने ही तळटीप निरर्थक ठरते. 'अभ्यागतां म्हणितलें' =जेवणाचें आमंत्रण दिलें, असाच अर्थ येथे घेतला पाहिजे.

(२) पा. ८७, ओ. १६ येथे 'नवगमे' शब्दापुढे श्री. वामनराव प्रश्नचिन्ह देऊन त्याची दुर्बोधता दर्शवितात. अन्य पोथ्यात हा शब्द 'नावगमे' असा येतो. अर्थः—'व जाणणें' (न+अव+गम्).

(३) पा. ८८, ओ.१ येथे "गद्यें (पद्यें पाहिजे) केलीं" असें वाक्य आहे. कंसांतील मजकूर बरोबर नाही. कारण, गद्यें=२२५ श्लोकात्मक 'गद्यराज स्तोत्र' असा सांप्रदायिक अर्थ आहे.

(४) पा.८८, ओ.२६ येथील 'स्वरीं' हा शब्द अन्य पोथ्यांवरून 'स्थळीं' असल्याचें कळतें.

(५) पा.८९, ओ. ३३ येथे 'केलें' ऐवजी 'ठेलें' शब्द पाहिजे. पोथीलेखकाच्या विशिष्ट लकबीने 'थ' (=ठ) व 'य' (=क) यांचें लेखन प्रसंगीं गैरसमाजास कारणीभूत होतें. म्हणूनच 'थेगें' (=ठेलें) हा सकळ लिपींतील शब्द श्री. वामनरावांनी 'येगें' (=केलें) असा वाचला.

(६) पा. ९०, ओ. १-२ येथे 'दाव' शब्द आला आहे. यांतहि 'थ' व 'य' प्रमाणेंच 'ध' व 'घ' यांबाबत गैरसमज झाला आहे. कारण, 'ध' अक्षर गांठ न देण्यात आल्याने 'घ' सारखें वाटतें. मीं पाहिलेल्या इतर सर्व पोथ्यांत 'डाध' (=दाढ) असाच हा शब्द आलेला आहे. सबब 'दाव' हा पाठ न घेतां 'दाढ' (=दंतविशेष) हाच पाठ घ्यावयास पाहिजे. अर्थात् या शब्दावरील तळटीपहि गैर लागूच समजली पाहिजे.

(७) पा. ९१, ओ. १ येथील 'वनिाएकदाए' या शब्दांतील 'दा' पुढें कंसांत '(व)' असा छापलेला आहे. पण सर्व पोथ्यांत 'दाए' हेंच रूप येतें. त्याचा अर्थ काय ?

(८) पा. ९१, ओ. २३ येथील 'नाना' शब्दाचा तळटीपेंत 'अथवा' असा अर्थ देऊन 'सगर' शब्दाचा अर्थ काय, अशी शंका तळटीपेंत प्रश्नचिन्हाने व्यक्त केली आहे. परंतु 'नाना' शब्दाचा 'अथवा' असा अर्थ येथें प्रकरणप्राप्त नाही. कारण, "नाना वासना हे तनकट" या ओवींत अगदीच सांप्रदायिक अर्थ भरलेला आहे तो असाः—

परशुरामबासांच्या पहिल्या कारकीर्दीपर्यंत महानुभावपंथीयांचे शास्त्रीय सिद्धांत अगदी तंतोतंत श्रीचक्रधरस्वामींनी सांगितल्याप्रमाणेच अव्याहत प्रचलित होते. परंतु परशुरामबासांच्या

शेवटच्या कारकीर्दींत पंथीयापंथीयामध्येच अनेक मतभेद उत्पन्न होऊन शास्त्रीय सिद्धांतात बरीच बचबच माजत चालली होती. परशुरामबासांच्या निधनानंतर ती इतकी वाढली की, ६० बूझातें म्हणजे ६० मतें पंथांतच निर्माण झालीं. परंतु तीं सर्वहि तीनस्थळ कर्तें श्रीगुर्जर शिवव्यास आणि सिद्धान्ते हरिव्यास यांनी मोडून पुन्हा पूर्वस्थिति कायम केली. हीच गोष्ट दृष्टीसमोर ठेवून विनायकबास आपल्या धाव्यात म्हणतात "नाना वासना हे तनकट। तेणें लोपली धर्मवाट। सगर फाटलें अफाट। स्वोक्तीचें स्वामीया ! ॥२॥" भावार्थ:—

नाना = अनेक, वासना = मतभेद, हे = हेच, तनकट = क्षुद्र गवत, तेणें लोपली धर्मवाट = त्या क्षुद्र गवताने धर्माचा धोपट रस्ता लुप्त झाला, आणि स्वोक्तीचे = मनसोक्त विचारांचे, अफाट = अनेक, सगर = पाऊलरस्ते, फाटले = फुटले अर्थात् निर्माण झाले, स्वामिया = हे श्रीचक्रधरा ! अशा प्रकारचा वोवीचा सांप्रदायिक अर्थ लक्षात घेतला म्हणजे श्री. वामनराव यांनी "नाना" शब्दाचा "अथवा" असा केलेला अर्थ चुकीचा ठरतो.

## मुद्रणदोष वा हस्तदोष

यांखेरीच कांही मुद्रणदोष वा हस्तदोष झालेले आहेत, ते येथे दुरुस्त करतों :—

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ८५ | ३६ | करावेया | करवावेया |
| ९० | ६ | परसरामबासी | परसरामबासासी |
| ९० | १९ | स्मृति | स्तुति |
| ९१ | २७ | प्रीतिनी एत्त | प्रीति नीएत (=ठरलेली) |

एकंदरीत श्री. वामनराव याच्या लिखाणांत माझ्या माहितीप्रमाणे मला जो फरक सुचला तो मीं वाचकांच्या पुढे माडला आहे. त्याची ग्राह्याग्राह्यता वाचकावर सोपवून हा लांबलेला लेख हातावेगळा करतों.

[ **खुलासा:**—पंथीय विद्वान् श्री. बाळकृष्णशास्त्री, महानुभाव, यांच्या लेखांतील **पहिल्या पांच** कलमांबद्दल तूर्त लिहिण्याचें प्रयोजन नाही. सहाव्या कलमातील वाचनदोष वगैरे दुरुस्त केल्याबद्दल मात्र श्री. बाळकृष्णशास्त्री यांचे आभार मानल्यावाचून मला राहवत नाही. 'वृद्धाचारा'ची मला प्रयत्न करूनहि फक्त एकच पोथी मिळाली, कांही सांप्रदायिक गोष्टींचा पंथीयांकडून देखील खुलासा झाला नाही— वगैरे सबबी पुढे न माडता या चुकाचें माप मीं आनंदानें पदरांत घेतों. कारण बिनचूकपणा ही संशोधनांतील मुख्य बाब होय; आणि बिनचूकपणा आणावयास जे कारणीभूत होतात, ते धन्यवादास पात्र असतात.

पुढेमागे 'वृद्धाचारा'च्या अधिक पोथ्या मला मिळाल्या असत्या, व अवश्य ती सांप्रदायिक मांहितीहि मिळाली असती, तर 'वृद्धाचारा'च्या मीं छापलेल्या प्रतींतील दोष दुरुस्त करणें मला जरूरच होतें. पण तो योग येण्यास कालावधि लागला असता. शास्त्रीजींनी पोथ्या वगैरे मिळाल्यामुळे फारसा काल न लागूं देतां न्यूनपूर्ति केली, हे त्यांचे वाचकांपेक्षा मजवरच जास्त उपकार झाले आहेत.

मुद्रणदोष वा हस्तदोष याबद्दलहि माझें हेंच म्हणणें आहे.

वाचकांनी 'वृद्धाचारा'च्या आपापल्या प्रतींत या दुरुस्त्या करून घ्याव्या ही नम्र विनंती आहे.

—वामन नारायण देशपांडे]

# आमच्या इंदूचें शिक्षण*

## [ग्रंथसमीक्षण]

इंग्रजी वाचक जरी असल्या पुस्तकांना सरावलेले असले तरी मराठीमध्ये "आमच्या इंदूचें शिक्षण" ह्यासारखी ग्रंथरचना अभिनव असल्यामुळे आणि त्यांतहि इंदूप्रमाणे अत्यंत रम्य, घराऊ पण सोज्वळ भाषेची भर पडल्यामुळे श्री. पटवर्धन ह्यांची कृति प्रशंसनीय झाली आहे. त्यांनी आपल्या पुस्तकावर अभिप्रायांच्या भाऱ्याचें ओझें ठेविलें नसतें तरीसुद्धा वाचकांनी त्यांच्या पुस्तकाचें कौतुकच केलें असतें. विषयाच्या नावीन्याची, भाषेच्या सौंदर्याची आणि उपहासयुक्त विनोदाच्या चित्ताकर्षकत्वाची प्रशंसा अभिप्रायदात्यांनी मनमुराद केली आहे, त्यांत अतिशयोक्तीचा दोष कोणासहि काढतां येणार नाही असा आम्हांस भरंसा वाटतो. तथापि ह्या पुस्तकाने आमचें शिक्षण माणसाळलेलें म्हणतां येईल असें आम्हांस वाटत नाही. आमची शिक्षणपद्धति जंगली पशूप्रमाणे अद्यापि जंगलीच आहे. माणुसकीपासून ती अजून फार दूर आहे.

श्री. पटवर्धन ह्यांच्या पुस्तकांत स्वतःच्या अनुभवाचें प्रमाण किती पडतें हें पाहण्याच्या प्रयत्नांत आम्हांस यश आलें नाही हें सागणें भाग आहे. तसेच, इंदूच्या आईबापांना एकच मूल असल्यामुळे अनेक मुलांमुलींच्या वागणुकींत सहजवृत्तीमुळे व सहवासाने जो भेद दृष्टीस पडतो त्याचा अनुभव इंदूच्या वडिलांस घेतां आला नाही ही एक मोठी उणीव ह्या पुस्तकांत राहून गेली आहे. दोन मुलगे व दोन मुली असतील तर आईबापांना बालस्वभावाचा अभ्यास चांगला करतां येतो. मुलांमुलींत भांडण झालें असतां दुसरा मुलगा आणि मुलगी आपल्या जातीचा कैवार घेतात किंवा विरुद्धलिंगाकर्षणामुळे अन्य जातीची पाठराख करतात अगर न्यायाची बाजू घेतात हें पाहण्याची संधि मिळते. परंतु कोणालाहि समवयस्क चार मुलें एकाच वेळीं असणें अशक्य, निदान असंभवनीय असल्यामुळे ह्या अनुभवाला आपण पारखे असतों. सख्खीं भावंडें असणें चांगलें. चुलत भावंडांत निर्भेळ अनुभव मिळूं शकत नाही. ह्याकरताच जुळ्या बालकांच्या वृत्तींचा अभ्यास फार बोधप्रद असतो. असो.

मुलांच्या शिक्षणापूर्वी वस्तुतः आईबापाच्या शिक्षणाला प्रारंभ होतो. अर्भकावस्थेंत सांभाळ करण्याची सर्व जबाबदारी आईबापांवर असते. खरें पाहिलें असतां गर्भधारणेपासून ह्या जबाबदारीला प्रारंभ होतो. परंतु ह्या कालांत आपल्या भावी बालकाच्या हितार्थ इंदूच्या आईबापांनी कोणते उपाय योजिले होते, काय खबरदारी घेतली होती ह्याविषयी आपणांस ह्या पुस्तकांत कांहीच सागितलेलें नाही.

इंदूच्या आईला मुलगी झाली ह्याचें वाईट वाटलें, परंतु तिच्या वडिलांना आनंद झाला; आणि ह्याचें कारण फ्राइडसाहेब म्हणतात त्याप्रमाणे विरुद्धलिंगाकर्षण हें असावें असा संशयहि ग्रंथकारांस आला! इंदूच्या आईची वास्तविक भावना काय होती हेंच निश्चित करता येऊं नये अशा गोष्टी 'नानां"नी आपणांस सांगितल्या आहेत. इंदू झाल्यावर पहिल्यापहिल्यांदा किती

---

* ले. व प्र. प्रि ना. म. पटवर्धन, सरस्वतीमंदिर, सोलापूर. किं १ रुपया.

सरी दिवस तिची आई फारशी खुशींत दिसत नसे हें जसें खरें, तसें ती इंदूचे एकांतांत मटामट मुके घेत असे हेंहि खरें आहे. मुलगी झाल्याचें पाहून प्रथम इंदूच्या आईला वाईट वाटणें स्वाभाविक आहे. त्याला लौकिक कारणें असतात. तथापि इंदूच्या वडिलांनी आपला अनुभव निश्चितपणें सांगितला असता तर फ्राइडसाहेबाच्या म्हणण्यांत कांही सार आहे कीं नाही ह्याचा आपोआप निर्णय लागला असता. प्रत्यक्ष अनुभवाच्या कसोटीवर फ्राइडसाहेबाचीं मतें घासून पाहण्याचें "नानां"च्या मनात आलें नाही; उलट परमतांच्या ओघांत ते स्वतःच घुटमळलेले दिसतात.

इंदू काळीसावळीच होती; कित्येक काळ्या माणसांचे डोळे घारे असतात तसे इंदूचेहि होते. हा डोळ्यांचा घारेपणा लहानपणचा होता कीं, जन्मभर टिकणारा होता हें "शिक्षण"-कार सांगत नाहीत. त्याचप्रमाणे इंदूचे ओठ जर खरोखर तांबूस असतील व केस भुरके असतील तर तिच्या "चकाकणाऱ्या श्यामकांती"ची भर पडून इंदूची एकंदर मुद्रा कशी दिसत असेल हेंहि समजण्यास इंदूचे वडील आपल्या मदतीला येत नाहीत. त्यांच्या सौंदर्याच्या कल्पनाहि असामान्य दिसतात. ते म्हणतात "सुंदर नाकडोळ्यांपेक्षा तजेलदार चेहरा जास्त चांगला व सुंदर चेहऱ्यापेक्षाहि सुंदर बांधा जास्त चांगला." आमच्या मतें हे नुसते अर्थशून्य शब्द आहेत. नाक, डोळे इत्यादि अवयव प्रमाणबद्ध असतील तेव्हाच सुंदर बांधा म्हणतां येईल. तजेलदार चेहऱ्याला प्रकृति चागली लागते; नुसते नाक डोळे चांगले असूनहि आरोग्याच्या अभावीं चेहरा तेजस्वी अगर तजेलदार असूं शकणार नाही. सुंदर स्त्रीचें प्रेत कुरूपच असतें. एकंदरींत इंदूच्या रूपाविषयी आपणांस यथोचित कल्पना करतां येत नाही हेच खरें. रूप कसेंहि असो पण इंदू रूपांत आईच्या किंवा वडिलाच्या वळणावर गेली होती अथवा तिचं निराळेंच वळण होतें ह्याचा ऊहापोह ह्या रसिक पतिपत्नींत का बरें होऊं नये !

इंदूच्या लहानपणीं तिचे आईबाप तिला गाडींत घालून उघड्या हवेंत फिरावयास नेत असत, हा प्रकार इष्टच म्हटला पाहिजे; मग तें श्रीमंतीची ऐट मिरविण्याच्या हेतूने होवो किंवा उघड्या हवेचें महत्त्व ओळखल्यामुळे असो. निश्चित कारण इंदूच्या नानांनाहि कळलें नसेल. कोणत्याहि कार्याला अनेक कारणे असतात. त्यात कोणत्या कारणाचा किती अंश असतो हे ठरविणें कठीण असते. आमच्या मतें मनुष्याच्या प्रवृत्तीला उत्तेजक कारण मनोविकार असतो. विचार त्याच्या निश्चितीस कारणीभूत होतो इतकेच. विकार व विचार परस्परांस अनुकूल असतात तेव्हाच हा परिणाम दिसून येतो. मुलाला बाहेर नेण्यांत मातब्बरीची ऐट साधली नसती तर केवळ शास्त्रशुद्ध म्हणून मुलाच्या अंगाला मोकळी हवा लागली असती कीं नाही ह्याची शंकाच वाटते. आजच्या समाजाविषयी बोलावयाचें तर अर्भकांना कोणीं बाहेर नेलें नसतें असेंच आम्हांस वाटतें.

ह्या पुस्तकाचें वैशिष्ट असें दिसतें की, त्याच्या दीडशेंवर पानांत एकाहि ठिकाणीं आमच्या धार्मिक विधींचा उल्लेख चुकूनहि आला नाहीं. इतकें संयमन कौतुकास्पद आहे ! आमच्या धर्मशास्त्रकारांनी तिसऱ्या अथवा चौथ्या महिन्यांत मुलाचा निष्क्रमणसंस्कार सांगितला आहे. त्यांत सूर्यदर्शन व चंद्रदर्शन मुलाकडून करविण्याचा प्रघात आहे. चंद्रदर्शन सायंकाळानंतर होणार हें उघड आहे. सूर्यदर्शनाकरिता सकाळीं बाहेर पडावें लागतें. अर्थात् आमच्या लोकांच्या कल्पनेप्रमाणे मोकळ्या हवेसाठी मुलांना बाहेर नेणें जसें आवश्यक आहे तसें कोवळ्या उन्हाचा लाभ मुलाना मिळावा म्हणूनहि त्यांना घराबाहेर हिंडवून आणलीं पाहि-

जेत. साहेबांचीं मुलें सकाळ संध्याकाळ दुवेळां बाहेर नेण्यांत येतात. इंदूचे वडील तिला एकदाच किंवा दोनदा बाहेर नेत असत तें त्यांनी आपणांस सांगितलें नाहीं. नवराबायकोनी मुलाला घेऊन मोकळ्या हवेंत जाणें हें सध्या "फॅशनेबल" समजत असतील, परंतु निष्क्रमण संस्कारांत आईबापांची दोघांचीहि आवश्यकता असते हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

इंदूचे सुशिक्षित आईबाप तिला पाळण्यांत घालून जातां येतां तिचा पाळणा हालवीत असत ह्यावरून पाश्चात्य शिक्षणाने त्यांचे हिंदु आचार नष्ट झाले नव्हते असें दिसतें. लहान मुलांना पाळण्यांत घालून हालविणें ही पद्धति हिंदूंची व हिंदुसदृशांची दिसते. युरोपियन लोकांना झोके देण्याचें माहीत नसावें. झोके देण्यानें मुलांच्या मेंदूवर परिणाम होतो असेंहि कित्येक म्हणतात. आमच्या इकडे तर झोके देण्याला धर्माचें स्वरूप प्राप्त झालें आहे. झोके देण्याच्या इष्टानिष्टतेविषयीं पतिपत्नींत वादविवाद कसा झाला नाही ह्याचें आम्हांस नवल वाटतें.

लहानपणीं मुलें आजारी पडलीं तर त्याची जबाबदारी कोणावर हा एक मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. मुलांच्या हातून— निदान हालतां, चालतां, खातां येत नाही तोंपर्यंत— कोणताच दोष घडणें संभवनीय नाही. मग खोकला, पडसें, ताप ह्यांपासून त्यांस उपद्रव कां व्हावा? हवेचा परिणाम म्हणावा तर निसर्गाची योजना चुकली असें म्हणावें लागेल. हवेंतील फरक सहन करण्याची ताकत निसर्गानें मुलांत ठेविली नाही काय? का आईबापांकडून जरूर ती दक्षता घेतली जात नाही? कित्येक मुलांना गोंवर व कांजिण्या येत नाहीत. अशांचें प्रमाण किती असतें? हे स्पर्शजन्य रोग असल्यामुळे त्यांपासून मुलांचें संरक्षण करणें शक्य असतें. गोंवराची लस अद्यापि निघाली नाही ह्याचें कारण समजत नाही. एकंदरींत शैशवावस्थेंत इंदूची काळजी घेण्याची जबाबदारी इंदूच्या आईबापांनी पार पाडली असें म्हणण्यास हरकत नाही. मुलांना शिकवण्याच्या पूर्वी आईबापांस स्वतः शिकावें लागतें.

ह्यानंतर इंदूच्या तोंडांतून शब्द स्फुरूं लागला. पहिला शब्द कोणता उच्चारला गेला; त्याच्या मागून कोणत्या अनुक्रमाने इंदू शब्द बोलूं लागली हें तिच्या मातापित्यांनी टिपून ठेवलेलें दिसत नाही. श, ष, स, र, हे ऊष्मे, तसेंच तालव्य व मूर्धन्य वर्ण ह्यांचा उच्चार मुलाना प्रथमतः करतां येत नाही. कठोर व्यंजनेहि मुलें टाळतात. म्हणून मुलांची भाषा निराळीच गमतीदार बनते. क का च्या, त ता च्या, प पा च्या बाराखडींतील वर्ण उच्चारण्यास त्यांस सुलभ जातें, म्हणून बसतच्या ऐवजी बतत, झालाच्या जागीं दाला, औषधाच्या ठिकाणीं ओतद, माझाच्या बदला मादा वगैरे शब्द त्यांच्या तोंडांतून उच्चारले जातात. ह्याशिवाय शब्द ध्यानांत न राहिल्या कारणाने सांडगे न मागतां लांडगे मागून हास्य उत्पन्न करतात तें निराळेंच. भाषेप्रमाणे लहान मुलांच्या कल्पनाहि अभ्यसनीय असतात. श्री. पटवर्धन यांनी इंदूने बापाची केलेली व्याख्या दिली आहे ती पाहावी म्हणजे ह्या गोष्टीचें महत्त्व ध्यानीं येईल. ग्रंथकारांनी अशाच आणखी कल्पना सांगितल्या असल्या तर बरें झालें असतें असें वाटूं लागतें.

लहान मुलांचा पहिला गुण म्हणजे अनुकरण. तीं झपाट्याने शिकत असतात. मोठीं माणसें काय करतात तें पाहून त्याप्रमाणे आपण करावें ही लहानपणीं मुलांची वृत्ति असते. अशा वयांत आईबापांनी मुलांना उपदेश न करतां अथवा धाकदपटशा दाखवून त्यांच्याकडून चांगल्या गोष्टी करून न घेतां मुलांनी जें करावें असें आपणांस वाटतें तें सर्व आपण स्वतः आचरावें हेंच योग्य होय. आईचा स्वयंपाक पाहून मुलें भातुकली करतात. अशा वेळीं आईने चुलीभोवतीं स्वच्छता राखण्याची दक्षता घेतली म्हणजे मुलींना आपोआपच स्वच्छतेची सवय

लागते. जें जें पाहतील त्याचें अनुकरण मुलें करतात. ह्यामुळे ज्यांना मुलें आहेत त्यांच्यावर चांगल्या रीतीने वागण्याची विशेष जबाबदारी पडते. आईबाप व शिक्षक ह्यांनी ह्या बाबतींत फारच खबरदारी घेतली पाहिजे. इंदूच्या मातापित्यांनी ह्या कामीं चूक केली नाही ही आनंदाची गोष्ट आहे. खोटें बोलणे, रागावणें, भांडणें, अपशब्द बोलणें, अमंगळपणा करणें इत्यादि प्रकार मुलांच्या देखत आम्ही हरहम्मेश करतों आणि मुलांना बिघडवतों. मुलांच्या घोळक्यांत शिमग्यात फाका घालून बोंबा मारणारे शिक्षक लोकलबोर्डाकडून राजरोसपणें पोसले जात आहेत ! ह्या दृष्टीने नोकरांच्या सहवासात मुलें ठेवणे आत्मघातकीपणाचें आहे. आईबापांना पोहताना बघून मुले आपण होऊन पाण्यांत शिरतात. सभ्यपणा अथवा शिष्टाचार ह्यांविषयी तर आपण बेफिकीर असतों. तहान लागली असतां कोणालाहि पाणी आण म्हणून सांगणें गांवढळपणाचे द्योतक आहे. सुसंस्कृत मनाचा मनुष्य 'मला तहान लागली आहे एवढेंच' म्हणेल. नवऱ्याने बायकोजवळहि अशीच भाषा वापरली पाहिजे. "मला स्नानाला पाणी दे" व "मी स्नानाला येऊं काय !" ह्या दोन वाक्यांत वक्त्याचा संस्कृतिभेद निदर्शनास येतो.

अनुकरणशीलता हा जरी मुलांचा प्रमुख गुण असला तरी त्यांना स्वत्व नसतें असें नाही. बाल्यावस्थेंत विचाराच्या पूर्वी विकारांचा प्रादुर्भाव होतो. त्यांतहि राग, संतोष ह्या मनोविकारांचा उद्गम प्रथम होतो. म्हणून सर्व मुलें रडतात व हसतात. रडणे व हसणें हे विकारांचें दृश्य स्वरूप होय. आपल्या मनाजोगें झालें नाही की मूल रागावतें व मग रडूं लागतें; मनाजोगें झाले म्हणजे आनंदित होतें व हसतें. इजा झाली असता रडूं येतें तें निराळें. तसेंच गंमत वाटून हसूं येतें तें निराळें. हे दुसऱ्याप्रकारचें हसणें लहान मुलांत प्रथमावस्थेंत आढळणार नाही. मनाजोगें होणें म्हणजे मनाला काही तरी हवेंसे वाटतें हें उघड आहे. प्रथम ही हाव नैसर्गिक असते. उदा. भूक लागली की मुले रडूं लागतात. उत्तरोत्तर दृष्टीस पडेल ती वस्तु आपल्याला मिळावी ही इच्छा उद्भूत होते. ह्या वासनेमुळेच सापडेल ते घेऊन मुलाना सर्व वस्तूंचा संग्रह करण्याचा नाद लागतो. दुसऱ्याचें घ्यावयाचें आणि आपलें द्यावयाचें नाही ह्या स्वरूपांत पहिला विकार-लोभ हा प्रकट होतो. ह्यानंतर आवडनावड हिचें अस्तित्व व्यक्त होऊं लागतें. जो पदार्थ नावडेल तो मूल टाकून देतें; आणि आवडेल त्याच्यासाठी हट्ट धरून बसतें. ही आवडनावड स्वयंभू असून व्यक्तिपरत्वें भिन्न असूं शकते. मूल जरा मोठें झालें म्हणजे ह्या प्रथमावस्थेंतील आवडनावडीचा विस्तार सत्प्रवृत्ति व असत्प्रवृत्ति ह्याच्या रूपाने झालेला आढळतो. जन्मतः मूल नीतिमान अथवा अनीतिमान नसतें हा कित्येक साहेबांच्या म्हणण्याचा अनुवाद करतां आला तरी तें अनुभवाच्या विरुद्ध आहे ह्यांत संशय नाही. मागे सांगितल्याप्रमाणे एकाच आईबापाच्या अनेक मुलांत हा स्वभावभेद सहज दिसून येतो. एक मुलगा आज्ञाधारक तर दुसरा आपलाच हेका चालविणारा; एक यथार्थ बोलणारा तर दुसरा निष्कारण असत्य बोलणारा; एक अभ्यासू तर दुसरा उनाड; एक धीट तर दुसरा भेकड; एक स्वच्छ तर दुसरा अमंगल; एक धर्मप्रवण तर दुसरा धर्मलंड, अशा प्रकारचे मूलतःच मुलांमध्ये असणारे भेद आपल्या वारंवार निदर्शनास येतात.

मी शहाणा आहें असें समजणें हा स्वार्थाचाच एक पर्याय आहे. ह्यांतूनच लोकांनी आपणांस शहाणें समजावें असा अभिमान जन्मास येतो. म्हणून तूं अमूक केलेंस तर लोक तुला वेडा म्हणतील ह्या म्हणण्याचा परिणाम मुलांवर होतो. लोकमताची कल्पना तेव्हा नसते.

मला कोणी मूर्ख म्हणूं नये एवढेंच वाटत असते. मुलाना एखाद्या गोष्टीपासून परावृत्त करण्यास ह्या मात्रेचा चागला उपयोग होतो. मी स्वरूपवान् आहे, शाहणा आहें, ह्या भावना मुलात अल्पवयांत जागृत झालेल्या असतात. ह्याप्रमाणे शाळेंत जाण्याचें वय होईपर्यंत आईबापाकडून मुलांना मिळणारें शिक्षण प्रायः आईबापाच्या स्वतःच्या वागणुकींतून दिलें जातें. ह्या गोष्टीचें आजच्या आईबापाना पुरें विस्मरण झालेलें दिसतें.

शाळेंत घालण्यापूर्वी मुलाना अक्षरओळख घरच्याघरींच होते. परंतु अक्षरओळख म्हणजे वाचन नव्हे. पुष्कळ मोठ्या माणसानाहि नीटसें वाचता येत नाही. निर्जीव शब्द वाचणें व शब्दात जिवंतपणा निर्माण करून ते वाचणें ह्यात महदंतर आहे. अलीकडे मराठी शाळांतून वाचनाकडे दुर्लक्षच केले जातें. लिहिताना लिहिणाराच्या ज्या भावना असतात त्या सर्व वाचतांना उमटल्या पाहिजेत. इंदूला मिशनऱ्यांच्या शाळेत घातले नसतें तर ती वाचन-कुशल बनली नसती ह्यात संशय नाही. आरंभीं मुलाना जेथे मोकळेपणा वाटेल, त्याच्या मनाचा व बुद्धीचा अनिरुद्धपणें विकास होण्यास जेथे वाव मिळेल अशाच शाळाची आवश्यकता असते. संयमन, शिस्त, नियमितपणा इत्यादिकाचें वळण ही पुढची पायरी होय. ह्या विरोधी गुणासाठी शाळाहि वेगवेगळ्या पाहिजेत. कांही काळ मुलाला वाटेल ते बोलूं देणें इष्ट असलें तरी पुढे अनिष्ट बोलण्याच्या सवयीचा प्रतिकार करणे अवश्य असते. "एका शाळेत कांही बोलावें, काही लिहावें, काही काढावें; दुसऱ्या शाळेंत बरोबर बोलावें, बरोबर लिहावें, बरोबर काढावें लागे." एकापुढे दुसरी अशा शिक्षणाच्या ह्या दोन पायऱ्या आहेत; आणि त्या अपरिहार्य आहेत. मात्र दुसऱ्या पायरीवर चढून जाण्याची तयारी झाली असता पहिल्या पायरीवर रेंगाळत राहिलें तर कोणत्याहि मुलाला इंदूप्रमाणे कंटाळा आल्याखेरीज राहणार नाही. अशा बालशिक्षणाची आमच्या इकडे सोय नाही; एवढेच नव्हे तर त्याचें महत्त्वहि कोणाला पटलेलें दिसत नाही.

ह्या सर्वाला उत्तम शिक्षकाची आवश्यकता असते. आमच्याकडे नमुनेदार शिक्षक विरळा. शिक्षकाचें शील आदर्शभूत पाहिजे त्याचप्रमाणे शिक्षणाची कलाहि त्याने साध्य करून घेतली पाहिजे. श्री. पटवर्धन म्हणतात त्याप्रमाणे क्षेत्रफळ किंवा घनफळ शिकविताना वर्गाचें प्रत्यक्ष मोजमाप करणारा शिक्षक आपल्या महाराष्ट्रात एक तरी सापडेल काय? "३।४ उदाहरणें घालून ठेवावयाचीं आणि मग वर्तमानपत्र वाचीत बसावयाचें" असे शिक्षक आमच्या विद्यार्थीदशेंत होते तसे आता नसतील असें नाही. मराठी शिक्षकात तरी असले दुर्गुण विपुल प्रमाणांत आढळतील. वर्गांत वेळेवर न जाणें, गेल्यावर खाजगी पत्रें लिहिणें, कित्येक दिवस परवानगी न घेतां शाळेंत न जाणें, शाळेंतील जिन्नस लांबवणें, मुलाच्या समक्ष खोटें बोलणें, कुरापती लावणें इत्यादि अनेक ठळक दोष मराठी शिक्षकात सापडतील. अशा या अवगुणान्वित शिक्षकांना, शिकवावें कसें ह्याची कल्पनाहि नसते. असे शिक्षक असलेल्या शाळांत आम्ही आपलीं मुलें बिघडण्याकरिता पाठवितों असें म्हणावें लागतें. ज्या शिक्षकाना नुसत्या भाषेचें ज्ञानहि मुलांना करून देण्याचें सामर्थ्य नाही त्यांनी वाङ्मयाच्या सात्त्विक आनंदाचा लाभ मुलांना करून द्यावा अशी श्री. पटवर्धन अपेक्षा करतात!

जेथे पुस्तकांतला धडा शिकवता येत नाही तेथे संस्कृति कसली घेऊन बसलां? "लोकांच्या सुखदुःखांशीं समरस होणें म्हणजे सुसंस्कृत होणें होय" हें अगदी खरें परंतु ह्याचे धडे मुलांना देणें हें आपलें कर्तव्य आहे असें मानणारा शिक्षक ह्या महाराष्ट्रभूमीवर धुंडाळला

असताहि मिळणार नाही. एखादा मुलगा शाळेत आजारी झाला तर कोणत्या मुलांनी त्याला साहाय्य केलें व कोणीं त्याच्याकडे ढुंकूनहि पाहिलें नाही ह्याची चौकशी करण्याचें शिक्षकाच्या मनांतहि येणार नाही; मग घरीं दुखणाईत झालेल्या मुलाच्या समाचाराला कोण गेला होता ह्याची पृच्छा करणारा शिक्षक कोठे मिळणार ! बरें, एखादा शिक्षक असा मिळाला तरी ह्या-बद्दल शिक्षकाला शिव्यांजली न देणारे आईबाप कोठे सापडतील असा भरंसा वाटत नाही. ह्यावरून आम्हांला देण्यात येणाऱ्या शिक्षणाचा हिणकसपणा अजमावितां येण्यासारखा आहे.

मुलें भावनाप्रधान असतात. ह्या गोष्टीचा उपयोग त्यांची देशहितकर्तृत्वशक्ति वाढेल अशा रीतीने करून घेणें हें शिक्षकाचें कर्तव्य आहे. शिवाजी मोठा होता, आपला धर्म चागला आहे वगैरे राष्ट्रीयत्व उत्पन्न करणारे विचार विद्यार्थ्यांपुढे मांडणें वेडेपणाचें आहे असें श्री. पटवर्धनाप्रमाणे आम्हास वाटत नाहीं. मुलाना स्थितप्रज्ञ बनवावयाचे नाहीत; त्यांना राष्ट्रकार्यप्रवण करावयाचे आहेत. कर्माच्या बुडाशीं राजस गुण असतो, सत्त्व गुण नसतो. आपलेपणाचा अभिमान लहाणपणीं रुजवावयाचा नाही तर काय मोठेपणीं ! मोठेपणीं विवेक-बुद्धि आपोआप येते व ती बेताल भावनाना आळा घालूं शकते. कोणत्याहि राष्ट्राला कांही गोष्टी पूज्य मानाव्या लागतात. आई-बाप वाईट असले तरी त्याची निंदा करणें मुलांचा धर्म नव्हे. लोक नालस्ती करतील. त्याकरिता मुलें लोकांना नांवें ठेवणार नाहीत परंतु ह्याठिकाणीं वाइटाला वाईट म्हणणें हा सद्गुण आहे ही सबब मुलाना उपयोगी पडणार नाहीं. देवळांत पाटलोण घालून तोंडांत सिगारेट धरून कोणी पुराण सागूं लागले तर नुसत्या विचाराच्या जोरावर तुम्ही ह्या कृत्याचें खंडण कसें करणार ! येथे भावनाच विचारात घेतल्या पाहिजेत. केवळ पुराण सांगण्याचा उपयोग होतो हा समज खोटा आहे. तत्संबंधी अनेक आनुषंगिक गोष्टी असतात त्याचाहि पुराण श्रवण करणारावर परिणाम होत असतो. बाह्य सृष्टीइतकीच मनःसृष्टि कार्यकारी असते. इंग्रजाच्या राज्यलोभाबरोबर मराठ्याच्या राज्यलोभाचेंहि वर्णन करावें असें श्री. पटवर्धन म्हणतात. आमच्या मते हा उपदेश घातकी तर आहेच पण त्याखेरीज चुकीचाहि आहे. विषय कोणता ! इंग्रजांना राज्यलोभ आहे कीं नाही या प्रश्नावर निर्णय देताना मराठे लोभी होते हें सागणें अप्रस्तुत होय. शिवाय दोनशे वर्षांपूर्वीचे अ-शिक्षित मराठे व आजच्या विसाव्या शतकातील सुसंस्कृत म्हणवून घेणारे इंग्रज ह्यांची तुलना तरी कशी होणार हें आम्हास समजत नाही. मुलाना वारंवार हिडीस केलें तर त्यांच्यावर वाईट परिणाम होतो हा आपला अनुभव आहे. तसेंच जर आपण आपल्या धर्माच्या व राष्ट्राच्या बाबतींत केलें तर आपलेपणाने आपण जगांत राहूं शकणार नाहीं. आपला धर्म वाईट आहे ना, मग मुसलमान अगर खिती का होऊं नये ! आपला पोषाख नेभळा, मग स्वीकारा परकी पेहराव ! आपला देश घाणेरडा, मग जा इंग्लंडांत राहावयास ! स्वत्वाचा समूळ नाश होईल असलें शिक्षण आम्हांस नको. आपलेपणाचा अभिमान आवश्य धरावा. मात्र त्या अभिमानाने अंध होऊन आपले दोष आपणांस दिसणार नाहीत असें होतां कामा नये. अभिमान असेल तरच आपले दोष आपणांस दिसतील व तरच ते घालवून टाकण्याचा प्रयत्न आपल्या हातून कसोशीने होऊं शकेल. ज्याना अभिमान नाही त्यांच्या हातून सुधारणा कधीच होणार नाही. स्वतःच्या कमीपणाच्या भावनेचे घातक परिणाम कसे होतात हें मनीचें उदाहरण देऊन ग्रंथकारांनी विशद केलेंच आहे. "व्यक्तींतील समष्टिरूपाचा विकास हेंच खरें शिक्षण" मिळाल्यावर स्वाभिमानाचे दुष्परिणाम होतील ह्याची भीति बाळगण्याचें कारण नाही. एतद्विषयक श्री. पटवर्धन ह्यांचीं मतें सर्वस्वीं अविचाराचीं आणि म्हणून अग्राह्य

आहेत. ह्या त्याच्या जुन्या पुराण्या मताना अनुसरून मुलं प्रथम ध्येयवादी न होता व्यवहारी झाली पाहिजेत असा सिद्धांत त्यानी प्रतिपादिला आहे तो योग्यच आहे! प्रत्येक माणसांत ध्येय व व्यवहार ह्यांचें योग्य संमिश्रण असावें लागतें. श्री. पटवर्धन ह्यांच्या विचारांच्या शिक्षकाच्या शिक्षणानें मुलें कर्तृत्वशून्य खात्रीने बनतील; विद्वान कदाचित् होतील. सध्या मुलें शाळेंत शिकण्यासाठी जातात असें म्हणण्यापेक्षा न शिकण्यासाठी जातात असें म्हणणें अधिक यथार्थ होईल. कारण शाळेंतला अभ्यास म्हणजेच शिक्षणसर्वस्व अशी मुलाची समजूत झालेली असते. इतर गोष्टींनीहि शिक्षण मिळतें ही कल्पनाच त्याच्या मनाला शिवत नाही. ह्या मूर्खपणाच्या समजुतीची जबाबदारी आईबाप व शिक्षक ह्यावर सारखीच आहे. ह्या समजुतीचा निषेध ग्रंथकारांनी केला आहे (पा. १४०) तो स्तुत्य आहे.

सर्व ज्ञान मुलाना एकदम होऊं शकत नाही. जसजशी शरीर व बुद्धि ह्यांची वाढ होते तसतसे ज्ञानाचे विषय वाढत जातात, आणि कित्येक विषयाचें ज्ञानहि न शिकतां आपोआप प्राप्त होतें. परंतु कित्येक पाश्चात्याच्या वेडगळ कल्पना शिरसावंद्य मानणारे आमचे लोक अविकसित अवयवाच्या लहान बालकाना प्रजननकर्म समजावून देण्याचा आग्रह धरतात. श्री. पटवर्धन हे त्यापैकीच एक आहेत. तथापि कुत्रीला पिलं कशी झाली हें इंदूला समजावून सागणारे "नाना" दुसऱ्या एका गोष्टीसंबंधाने "पण हें सर्व इंदूला समजावून देण्यात काही अर्थ नव्हता; तिला तें कळण्यासारखें नव्हतें" (पा. ७६) असें नामोहरम होऊन कबूल करतात हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

विकासक्षम शिक्षण, विचारस्वातंत्र्य आणि दररोज निघणारे तऱ्हतऱ्हेचे मोहक पदार्थ ह्यांच्या योगाने अत्यंत प्रागतिक अशा बापाच्या कल्पनेतहि न उतरणारें असें विलक्षण परिवर्तन मुलामध्ये होणें अपरिहार्य आहे. आणि असे झालें म्हणजे कित्येक बाप बावरल्यासारखे होतात. इंदूच्या वडिलांची अशीच स्थिति झाली आहे. इंदूच्या नवीन तऱ्हा पाहून "हे चाळेच नवीन का माझे डोळेच जुने" हा विचार त्याच्या मनात आला. आचार व विचार ह्यातील हा भेद मनन करण्यासारखा आहे. विचार हे आचाराच्या पुढे असतात. आपण आपले विचार आपल्या मुलांवर बिंबवितों. त्यांचें रूपांतर त्याच्या आचारात होतें. आपले आचार आपल्या वडिलांच्या विचाराचें कार्य असतें. आचार वडिलाचे आणि विचार आपले. आपल्या विचाराचें दृश्य रूप अविचलित मनानें पाहण्याची धमक फार थोडक्यात असते. हल्लीच्या पिढीला असले धक्के सहन करावे लागत आहेत.

शिकलेली मुलगी पुरुषी ऐट आणते, कांहीशी स्वेच्छाचारी बनते, नटतेसवरते वगैरे प्रकार पाहिले म्हणजे बापाला प्रथम शिक्षण दिल्याचा पश्चात्ताप होतो हें खरें; परंतु ही क्षणिक अवस्था असते, चिरकाल टिकणारी नसते असा अनुभव येतो. जात्याच वळणात राहण्यासारखी मुलगी नसली तर मात्र शिक्षणाने आणि तिला मिळालेल्या स्वातंत्र्याने ती बेलगामी बनते. हें कांहीहि असो, असल्या प्रकारचें चिंतन करण्याचें प्रयोजन "नानां"ना उरलें नाही. इंदूचें शिक्षण संपलें, ती दुसऱ्याची पत्नी झाली आणि ह्या "दुसऱ्या"च्या नशिबीं तिच्या शिक्षणाचे बरे वाईट परिणाम भोगण्याचें आलें. बाप आपल्या मनाप्रमाणे मुलीला शिक्षण देणार. परंतु बापाचें मन व पतीचें मन जुळतें नसलें तर! असो. शेवटीं मराठींत एक सुंदर पुस्तक लिहिल्याबद्दल श्री. पटवर्धन ह्याचें मनःपूर्वक अभिनंदन करून हें परीक्षण पुरें करतों.

**ना. गो. चापेकर**

# महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या मंदिराचें उद्घाटन

महाराष्ट्र साहित्य परिषदेसाठीं बांधलेल्या नवीन इमारतीच्या कचेरीविभागाचा उद्घाटन-समारंभ रविवार ता. ७ फेब्रुवारी रोजीं सकाळीं ८॥ वाजतां इचलकरंजी संस्थानचे अधिपति श्रीमंत बाबासाहेब घोरपडे याच्या हस्तें मोठ्या थाटाने साजरा करण्यांत आला. या समारंभानिमित्त येथील मांडववाले दाते यांनी मुख्य इमारतीच्या जागेवर संकल्पित इमारतीच्या आकाराचाच शोभिवंत मंडप घातला होता व तो उत्तम तऱ्हेने शृंगारण्यांत आला होता. या समारंभास अनेक प्रतिष्ठित साहित्यिक व सन्मान्य नागरिक हजर होते; त्यांत प्रामुख्याने खालील मंडळी दिसत होती:

श्री. सरदार माधवराव किबे, सौ. कमलाबाईसाहेब किबे, दि. ब. गोडबोले, प्रि. ज. र. घारपुरे, धुळ्याचे श्री. शंकरराव देव, सरदार बापूसाहेब काळे, रा. ब. कृ. ग. जोशी, श्री. नानासाहेब चापेकर, श्री. तात्यासाहेब केळकर, प्रो. माधवराव पटवर्धन, श्री. विश्वनाथ-महाराज केसकर व त्यांच्या अमेरिकन शिष्या, श्री. ज. स. करंदीकर, श्री. शंकरराव गोखले, प्रो. श्री. नी. चापेकर, प्रि. वि. ग. आपटे, श्री. वहिनीसाहेब विंचूरकर, श्री. सौ. वहिनीसाहेब पंडित, श्री. सौ. ताईसाहेब काळे, कु. वेणूबाई पानसे, श्री. नी. वा. किंकर, श्री. गं. बा. गरूड, श्री. कृ. गो. पुंडलिक, श्री. रा. प्र. कानिटकर, श्री. ना. तु. ठाकूर, श्री. रा. भा. भागवत, श्री. य. ल. गुण्ये, रा. सा. रा. शं. दीक्षित, प्रो. श्री. म. माटे, प्रो. द. वा पोतदार, प्रो. के. ना. वाटवे, प्रि. ध. रा. गाडगीळ, प्रि. प्र. के. अत्रे, रा. ब. रा. के. बाळ, कॉंट्रॅक्टर श्री. दा. ह. रानडे, श्री. राजाभाऊ रानडे व श्री. रावसाहेब मराठे, सेवानिवृत्त कलेक्टर श्री. मर्ढेकर, डॉ. न. का. घारपुरे, प्रो. वा. गो. पराजपे, प्रो. दे. द. वाडेकर, प्रो. कृ. पा. कुलकर्णी, श्री. रा. दा. देसाई, रावसा. र. लु. जोशी, श्री. दि. वि. काळे, श्री. दा. न. शिखरे, श्री. बाबासाहेब देशपांडे, प्रो. ओतूरकर, वाडिया कॉलेजचे प्रो. तुळपुळे, प्रो. मा. रा. परांजपे, श्री. य. रा. दाते, श्री. श्री. ल. आपटे, सेवानिवृत्त सबजज श्री. भिडे, श्री. कृष्णराव मराठे, श्री. गोपीनाथ तळवलकर, श्री. निरंतर, श्री. तांबेशास्त्री, श्री ब. श्री. रुद्र, श्री. रा. गो. कानडे, श्री. वि. धों. कुलकर्णी, श्री. सोनूताई काळे, सौ. येसूबाई कुलकर्णी, कु. मैनाताई शहाणे, इ.इ.

बरोबर ८॥ वाजतां कार्यक्रमास सुरुवात झाली. प्रथम साहित्यपरिषदेचे अध्यक्ष श्रीमंत सरदार माधवराव किबे हे सर्वांचें स्वागत करतांना म्हणाले की, आज आपलें स्वागत करण्याचा मान मला मिळाला याबद्दल मी आभारी आहें. हा मान खरोखर श्री. नानासाहेब चापेकरांचा होता. पण मागे राहण्याचा त्याचा स्वभाव असल्यामुळे मला हें कर्तव्य करावें लागत आहे. मी कोनशिलासमारंभास हजर राहूं शकलों नाहीं व एका अर्थाने कर्तव्यास च्युत झालों म्हणून आज मुद्दाम येथे येऊन मी तें कर्तव्य पार पाडीत आहें. आजची आपली इमारत हें औंधच्या राजेसाहेबांच्या कृपेचें फळ आहे. ही जागा त्यांनी परिषदेस अत्यंत सवलतीने दिल्यामुळे येथे आज इमारत उभी राहत आहे. आज दिसतें आहे तेवढ्यांतच या इमारतीचें काम पुरें झालें असें नाहीं; तर हा केवळ साहित्यमंदिराच्या भावी भव्य इमारतीचा

प्रारंभ आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेला या कामीं साहाय्य करा अशी आपणाजवळ याचनाहि करावयास मला हरकत वाटत नाही. या पुण्यभूमीबद्दल बाहेर द्वेष आहे असें मी म्हणत नाहीं. पण असूया मात्र आहेच. तरी पण जळगांव येथील संमेलनाच्या प्रसंगीं सर्वांनी साहाय्य केल्या-मुळे येथे आज इमारत झाली आहे. परिषद्-संमेलन-वाद मिटला आहे. आपणांस मिळालेल्या प्रांतिक स्वायत्ततेच्या दिवसात प्रांतिक भाषांचा उपयोग केला जाईल. कारण सामान्य जनतेला राजकारणांत भाग घ्यावा लागणार आहे, आणि ते आपल्या मातृभाषेचाच उपयोग करतील. आजच्या समारंभाला श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर यांच्यासारखा विद्वान अध्यक्ष लाभला हें आपलें परम भाग्य होय. ज्या वेळीं संस्थानिकांचें आपआपल्या संस्थानांतील भाषांकडे दुर्लक्ष झालें होतें तेव्हापासून श्रीमंत बाबासाहेब आपल्या भाषेकरिता प्रयत्न करीत होते. त्यांचा आशीर्वाद आपणांस या शुभ प्रसंगीं लाभणार आहे. या वेळीं मी आपलें स्वागत करतों व श्रीमंत बाबासाहेब घोरपडे यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी त्यांना विनंती करतों.

यानंतर या सूचनेस दुजोरा देतांना श्री. तात्यासाहेब केळकर म्हणाले की, परिषदेच्या उद्घाटन-समारंभाकरिता श्रीमंत बाबासाहेब आले याबद्दल त्याचा मी आभारी आहे. साहित्यिकाला साधन फारच थोडें लागतें. कागद, दौत, टांक आणि डोकें; व तें असतेंच. पण प्रत्येकाने आपापल्या घरीं काम करण्यापेक्षा एकत्र आल्याने काम बरें होतें; म्हणून संस्था पाहिजे. संस्था म्हटली म्हणजे नाव व वास्तव्य पाहिजे. त्यांपैकी आतापर्यंत या संस्थेला नांव होतें. आतां वास्तव्य लाभत आहे. परिषदेंत पूर्वी अंतःकलह फार होते. परंतु ते सुदैवाने आता दूर झाले आहेत. म्हणून यापुढे साहित्यविषयक भरीव काम होईल असें मानावयास हरकत नाही.

यानंतर येथील लॉ कॉलेजचे प्रि. ज. र. घारपुरे सदर सूचनेस दुजोरा देतांना म्हणाले की, रा. सा. रानडे यांच्या प्रयत्नाने साहित्यपरिषदेचा प्रारंभ झाला. मालकीची इमारत असणें हा जो अभिमानाचा भाग असतो तो योग या संस्थेबाबत आज जमून येत आहे व या प्रसंगीं श्रीमंत बाबासाहेब अध्यक्ष लाभले आहेत हा अपूर्व योग आहे. नंतर प्रो. वा. म. जोशी अध्यक्षांच्या सूचनेस पाठिंबा देतांना म्हणाले की, कोणत्याहि मंगल प्रसंगीं जोशाच्या हातून कार्यक्रम व्हावा लागतो. आणि या कल्पनेमुळेच मला बोलावयास उभे केले असावें. आज अध्यक्ष कोणी तरी साहित्यिक पाहिजे होते व आजचे अध्यक्ष तसे लाभले आहेत. इतरांच्या विषयांची त्यांना माहिती आहे. मीं नीतिशास्त्रावर एक पुस्तक लिहिलें व त्यामुळे, मला वाटलें, मला या विषयाची बरीच माहिती आहे. पण इचलकरंजीला मी व्याख्यानास गेलों व तेथे मला दोन चार प्रश्नांत श्रीमंतांनी अडविले. अनेक विद्वानांबरोबर संभाषण करण्याचे प्रसंग येत असल्या-मुळे संस्थानिक बहुश्रुत होतात म्हणून धंदेवाईक साहित्यिकांपेक्षा ते पुष्कळ वेळां जास्त हुशार असतात. बाबासाहेबांनी पुण्यांतील किती तरी संस्थांना देणग्या दिलेल्या आहेत. याचा अर्थ मी त्यांना या प्रसंगीं संकटांत घालूं इच्छितों असा नाही. तरी पण मला आशा आहे की, आज नाही उद्या येथे इचलकरंजीकर हॉल आपणांस दिसेल. यापूर्वी श्रीमंतांच्या उदार देणगीने आमच्या हिंगण्याच्या पाठशाळेंत इचलकरंजीकर हॉल नुकताच तयार झाला आहे हें आपणांस माहीत आहेच.

यानंतर अध्यक्षांना श्री. किबे यांनी पुष्पहारमंडित केल्यावर परिषदेचे एक चिटणीस रा. सा. र. लु. जोशी यांनी खालील मंडळीकडून शुभसंदेश आल्याचें सांगितलें: श्री. सौ. इंदिराबाई महाराणीसाहेब होळकर, जमखंडीचे राजेसाहेब, मिरज थोरली पातीचे अधिपति,

देवास धाकटी पातीचे अधिपति, फलटणचे राजेसाहेब, रा. ब. प्रि. दामोदर गणेश पाध्ये, निजाम विजयचे संपादक, रा. सा. कोल्हटकर (सांगली), सॉ. बा. गं. खेर, श्री. भास्करराव जाधव, औंधचे दिवाण श्री. दर्शने, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री कोगजे, नागपूरचे प्रि. ओक, रा. ब. अंजनगावकर, कवि तिवारी, श्री. पांडुअण्णा शिराळकर, प्रि. म. का. कारखानीस, रा. ब. चिन्मुळगुंद, रॉयल इन्स्टटयूटचे प्रो. परांजपे, प्रो. पां. वा. काणे, श्री. हर्षे (पॅरिस) इ. औंध आणि भोर संस्थानच्या राजेसाहेबांचीं अभीष्टचिंतनपर पत्रें समारंभानंतर मिळालीं.

संदेशनिवेदनानंतर परिषदेचा मागील थोडासा वृत्तांत सांगतांना कार्याध्यक्ष रा. सा. **नानासाहेब चापेकर** म्हणाले की, "महाराष्ट्र परिषदेच्या इतिहासांत आज क्रांति घडून आली आहे. त्यामुळे आजचा दिवस भाग्याचा आहे. आपणापैकी पुष्कळांना कल्पना करतां येणार नाही. सन १९२८ पूर्वी ही परिषद् म्हणजे मुंबईसारख्या ठिकाणीं एका नाकपुडीएवढ्या खोलींतली जुनीपुराणी लहानशी ट्रंक होती. आज लहानशीच कां होईना पण स्वतःच्या इमारतींत संस्था सुप्रतिष्ठित झाली आहे. माणसाप्रमाणें संस्थेची स्वतःची इमारत झाली म्हणजे तिची प्रगति होते. आमच्याजवळ आजमितीस दोन हजार ग्रंथ आहेत; कांही लोकांना अशी शंका येते की, ही इमारत पुण्यांत झाली म्हणून ही पुणेकरांचीच वतनवाडी तर झाली नाही! त्यांना मी असें आश्वासन देतों की, जीं जीं माणसें पुढें येतील त्यांच्या हवालीं आम्ही हें साहित्यपरिषदेचें कार्य देण्यास तयार आहोत. तीन महिन्यांनी नवीन निवडणुकी होणार आहेत. तेव्हा आजचें कार्यकारी मंडळ उत्क्रांत होणार आहे. मी तर या निवडणुकीस उभाच राहणार नाही. पण कार्यकारी मंडळाच्या सदस्यांपैकी इतर कोणीहि निवडून येण्याकरिता खटपटी करणार नाहीत असें मी खात्रीपूर्वक सांगतो. कोणी म्हणतील कीं, ही दगडमातीची इमारतच आमच्या हवालीं करणार ना! पण ध्यानात ठेवा की, सन १९२८ पूर्वी परिषदेचें नांव पुष्कळांना माहीतहि नव्हतें, आज तिला योग्यता व महत्त्व प्राप्त झालें आहे. अशी कामगिरी तिच्यामागे आम्हीं तयार करून ठेवली आहे. साहित्यपत्रिकेच्या द्वारां महत्त्वाचें अभ्यसनीय तीन हजार पृष्ठांचें प्रगल्भ वाङ्मय तयार झालें आहे. आजच्या कालांत नाटकें—कादंऱ्यांत रुतलेल्या मुंबई विद्यापीठाचे पाय त्यांतून सुटतील व त्याबाहेर कांही वाचनीय आहे अशी विद्यापीठाच्या चालकांची कल्पना होईल तेव्हा अभ्यासकाला पत्रिकेचीं हीं पाने चाळणें भाग पडेल.

"पुढल्या सालापासून परिषदेतर्फे परीक्षा घेतल्या जाणार आहेत. मुंबई विद्यापीठानें अभ्यासक्रम बदलावा म्हणून प्रयत्न चालू आहेत. शुद्धलेखननिर्णयपरिषदेनें आपलें कार्य केलें आहे. सध्या मराठी भाषा फार अशुद्ध झाली आहे. रस्त्यावरच्या पाट्यांत तर हल्ली इतकें अशुद्ध असतें की, डोळे मिटून चालावेसें वाटतें. तें राहूं द्याच, पण वर्तमानपत्रें व मासिकें यांत पांच ओळी शुद्ध लिहिलेल्या कोणीं दाखविल्यास मी त्यास १०० रुपये इनाम देईन अशी घोषणा एखाद्यानें केली तर त्याला आपल्या पिशवीचें तोंड उघडावें लागणार नाही! आमच्या शुद्धलेखनाप्रमाणें पुष्कळ पुस्तकें लिहिलीं जात आहेत व मुंबई विद्यापीठालाहि आमच्या शुद्धलेखनाला मान्यता द्यावी लागेल. १९३३च्या नंतर संमेलन ठरावांची अंमलबजावणी झाली आहे. परिषदेचें प्रत्यक्ष कार्य करणारे म्हटले म्हणजे अध्यक्ष, कार्याध्यक्ष व चिटणीस हे होत. ह्या सर्वांच्या सहकार्यानें मला या गोष्टी करता आल्या याबद्दल मी त्यांचे या प्रसंगी जाहीर आभार मानतों. माझ्या देखत १ अध्यक्ष, ३ कार्याध्यक्ष व २० चिटणीस झाले. कार्यकारी मंडळांत ८० पेक्षा जास्त लोकांचा संबंध येऊन गेला. कांही लोक म्हणतात की, ८-१० लोकांच्या हातांत ही संस्था आहे, व

ते चळवळ करतात. वरील आंकड्यांवरून हा नुसता भ्रम आहे असें दिसून येईल. आजच्या अध्यक्षांचा आम्हांस सदैव पाठिंबा मिळत असे. त्यांनी अलिबाग येथे १९०१ सालीं 'जंगल' या विषयावर टीकात्मक भाषण केलें. तेव्हापासून मला त्यांच्याबद्दल आदर वाटत आहे."

अशा आशयाचें श्री. नानासाहेबांनी भाषण करून अध्यक्ष श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर यांना परिषदेची इमारत खुली करण्यास विनंती केली व तीस अनुसरून श्रीमंतांनी टाळ्यांच्या गजरांत परिषदेच्या इमारतीचें चांदीच्या किल्लीने उद्घाटन केलें. या वेळीं श्री. तांबे शास्त्री यांच्या गायनशाळेंतील मुलींनी सुस्वर आवाजांत कवि गिरीश यांनी केलेलें पद म्हटलें.

नंतर परिषदेचे दुसरे चिटणीस श्री. चिं. ग. कर्वे यांनी थोडक्यांत इमारतीची माहिती सांगितली. ते म्हणाले की, इमारतीसाठी मागे तीन हजार रुपये जे मिळाले, त्यांचा स्वतंत्रनिधि करून ठेवला होता. १९३५ सालीं श्रीमंत औंधकरांच्याकडे त्यांच्या गोटांतील इमारतीपुरेशी जागेची मागणी करतां अवघ्या तीन महिन्यात त्यांनी परिषदेस ही जागा दिली. याबद्दल त्याचे शतशः आभार मानले पाहिजेत. श्रीमंतांनी ही सहा हजार चौरस फूट जागा केवळ दरसाल १५ रुपये भाड्याच्या स्वामित्वाने दिली आहे. संपूर्ण इमारत दुपाखी दुमजली आहे. पण तूर्त कचेरीचा एक भाग बांधला आहे. ता. १८-१०-१९३५ रोजीं रा. ब. पाध्ये यांच्या हस्तें कोनशिलासमारंभ झाला असला तरी गेल्या तीन महिन्यातच इमारतीचे सर्व काम झालें. परिषदेचे स्थापत्यमंत्री रानडे बंधु कॉन्ट्रॅक्टर व ठेकेदार शिल्पशास्त्रज्ञ श्री. करमरकर यांनी परिषदेला बहुमोल मदत केली आहे. ही सुंदर आणि भक्कम इमारत त्यांच्या दीर्घ परिश्रमाचें फळ होय. परिषद् त्यांची अत्यंत आभारी आहे. या इमारतीच्या बांधकामास लागलेल्या सहा हजार रकमेपैकीं अद्यापि आदा न झालेल्या तीन हजार रुपयांचा बोजा श्री. नानासाहेबांनी आपल्या शिरावर घेतला असून त्या रकमेच्या देणग्या त्यांनी मिळविल्या आहेत. आतापर्यंत १६६० रुपये रोख मिळाले असून १८०० रुपयांची आश्वासने आहेत. कै. हरिभाऊ आपटे यांच्या पत्नींनी एक हजार रुपये देणगी देण्याचें आश्वासन मागेच दिलें असून ती रक्कम लौकर मिळाली तर या मांडवाच्या जागीं तात्पुरतें सभागृह बांधतां येईल.

शेवटीं श्री. कर्वे यांनी देणग्या देणाऱ्यांची नांवें वाचून दाखविलीं. तदनंतर कांहीं हितचिंतकांचीं भाषणें झालीं. सुरवातीस धुळ्याचे सुप्रसिद्ध समर्थभक्त श्री. शंकरराव देव यांचें भाषण झालें. ते म्हणाले की, पुण्याबाहेरचा म्हणून मला उभा केला आहे. मी बाहेरचा असूनहि येथे बोलावयास उभा राहिलों. कारण माझ्यासारखी मंडळी पुण्याकडे महाराष्ट्राची राजधानी या दृष्टीने पाहात आली आहेत. पुणें हें साहित्याचें केंद्र आहे. अशी साहित्याच्या बाबतींत पुण्याकडे पाहण्याची आमची दृष्टि आहे. या पुण्यांत किती तरी शाळा कॉलेजें आहेत. अशा शिक्षणसंस्थांचें माहेरघर या नात्याने या पुण्याकडे आम्ही आदर्श म्हणून पाहात असतों. (अध्यक्ष—I wish it to be true.) अध्यक्ष म्हणतात ही सदिच्छा अंतःकरणपूर्वक असावी. म्हणजे अद्याप त्यांना या बाबतींत शंका आहे. (अध्यक्ष—नव्हे, खात्री आहे.) पण माझ्या जिल्ह्यापुरतें तरी मी सांगतों की, आम्ही पुण्याकडे असूयेने पाहात नाही! दहा दिवसांपूर्वी मी येथे आलों तेव्हा या ठिकाणीं मला केरकचरा दिसला. पण दहा दिवसांत आज येथे किती तरी सुंदर मंडप उभारलेला दिसत आहे. आपण बसलों आहों त्या जागेवर मुख्य इमारत उभारावयाची आहे, पण ती केव्हा उभी करूं तें त्यांनी सांगितलें नाही. हें मला आवडलें नाही. महाराष्ट्राची उमेद

फार मोठी असते. पुण्यांतले पडके वाडेहि पुन्हा उभारले गेले पाहिजेत अशी मला फार मोटी महत्त्वाकांक्षा आहे. कितीहि कार्य झालें तरी समाधानाला कधीच शेवट नाही अशी आपली वागणूक आहे. म्हणून परकीय माणूस प्रेमाने, आदराने आपल्याकडे पाहतो. आपण पुढील वर्षी इमारत बांधण्याचे जाहीर करा व त्याबद्दलचे आगाऊच निमंत्रण आज द्या.

साहित्यपरिषदेचे जुने प्रमुख कार्यकर्ते व एक वेळचे चिटणीस **प्रो. न. र. फाटक** यांचें नंतर भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले की, मी आजच्या समारंभाला साहित्यिक, हितचिंतक व परिषदेचा एक जुना चिटणीस म्हणून आलों आहें. माझ्या चिटणीशीच्या कारकीर्दीत मी तीन कार्याध्यक्ष पाहिले व ज्याच्या काळात मला रजा घ्यावी लागली ते कार्याध्यक्ष श्री. ना गो. चापेकर हेच होत. सन १९२१ सालीं बडोद्यांत संमेलन-परिषद्-वाद सुरू झाला. त्या वेळीं संमेलनाचे अध्यक्षस्थान श्री. तात्यासाहेब केळकर यांना देण्याचे ठरलें होते. संमेलन-परिषद्-वाद जोराने सुरू झाल्यावर अध्यक्षांनाहि मोठी अडचण पडली व 'वाद मिटत असेल तर मी अध्यक्षस्थान स्वीकारीन' अशी तातडीची तार त्यांनी कार्यकारी मंडळाकडे पाठविली. वास्तविक ही अज्ञात माहिती सांगण्याचे या प्रसंगीं मला कारण नव्हतें; परंतु मी त्या वेळीं परिषदेचा एक चिटणीस होतों व ज्या अर्थी आजचे कार्याध्यक्ष रा. सा. चापेकर यानी मागील वादाचा उल्लेख केला आहे त्या अर्थी हा वाद मिटविण्याच्या कामीं श्री. केळकर यानी किती मदत केली हे सांगणे मला जरूर वाटतें. त्यानंतर अनेक भानगडी उपस्थित झाल्या व वाटाघाटी झाल्या. त्याचेंच दृश्य फळ म्हणजे आजची ही इमारत होय. मुंबईत काम होईना तेव्हा कांही जणांना वाटलें की, परिषदेचें स्थलांतर केल्यास कार्य होईल. त्यानंतर भाडणें झाली. तीं मिटलीं असलीं तर मला आनंदच आहे; पण कार्याध्यक्षाच्या भाषणातच ती मिटली नाहीत असा सूर निघाला आहे. परिषद् पुण्याला आणावयाची ठरली तेव्हा त्या गोष्टीला मीं मुंबईकरातर्फे संमति दिली. मुंबईकरांनाहि परिषदेबद्दल आनंदच वाटतो, असूया नाही. आणि आमचा हा आनंद पोकळ नाही याची खातरजमा म्हणून मी सांगतों की, जर मुंबईलाही मंडळी येतील तर मी साहित्य-परिषदेच्या इमारतीसाठी रक्कम मिळविण्याची शक्य ती खटपट करीन.

यानंतर **प्रो. श्री. नी. चाफेकर** हे आपल्या भाषणात म्हणाले की, मी पूर्वी या परिषदेचा सभासद होतों. पण मध्यंतरी नव्हतों. आज घरून निघताना असें ठरविलें की, या तीर्थावर जाऊन प्रायश्चित्त घ्यावें. म्हणून मीं पुनः सभासद होण्याचें ठरविलें आहे. आजचा उपक्रम शुभदिनीं झालेला आहे. मतभेद जरी असले तरी साहित्यप्रेम प्रत्येकाच्या ठिकाणीं दृढ वास करीत आहे व प्रत्येक जण साहित्याच्या उत्कर्षासाठी प्रयत्न केल्याखेरीज राहणार नाही. या परिषदेचा व्याप उत्तरोत्तर वाढो व तिचें कार्य चांगलें होवो.

नंतर अध्यक्ष **श्रीमंत बाबासाहेब घोरपडे** यांचें भाषण झालें. प्रथम या सभेचे अध्यक्ष होण्याचा मान दिल्याबद्दल परिषदेचे आभार मानल्यावर ते म्हणाले की, "प्रकृतिमान व सांपत्तिक स्थिति खालावल्यामुळे मी आज येणार नव्हतों. पण परिषदेचे कार्याध्यक्ष नानासाहेब यांनी मला या वेळीं सांगितलें की, माझें हें शेवटचें कार्य आहे. त्यामुळे मला येण्याचें कबूल करावें लागलें. संस्थानिकांनी बाहेर जाऊन लांब लांब गप्पा माराव्यात व बाहेरच्या संस्थांना पैसे द्यावेत असें संस्थानिकांच्या प्रजेला वाटत नाही; पण हिंदुमुसलमान असे पक्ष ज्याप्रमाणे हिंदुस्थानांत पडले आहेत, त्याप्रमाणे संस्थानिक व संस्थानिकेतर असा एक नवा पक्ष कोणीं काढूं नये.

आजच्या प्रसंगीं गुरुवर्य पाध्ये हजर असते तर मला संतोष वाटला असता. मला त्याच्या वतीने संमेलनाचा अध्यक्ष होण्याची श्री. केळकरानीं गळ घातली होती, पण त्या वेळीं मीं ती गोष्ट नाकारली.

"औंधच्या राजेसाहेबांनी या संस्थेला जागा दिली याबद्दल **मी औंधच्या राजेसाहेबांचें अभिनंदन करतों.** अशा कार्यांना सर्वांनी मदत केली पाहिजे. असल्या संस्थेला ज्याच्याजवळ पैसा आहे त्याने मदत करूं नये तर कोणीं करावी! कोणालाहि घर झालें म्हणजे स्थायिकत्व येतें. आमच्या डेक्कन व्हर्नाक्युलर सोसायटीला अद्याप जागा मिळाली नाही, पण या संस्थेने ती मिळविली ही आनंदाची गोष्ट आहे. या परिषदेंत पैशावरून भाडणें सुरू झालीं असें मला कळलें आहे. मग आता तर जागा मिळाली आहे! त्यामुळे अधिक भाडणें होतात कीं काय अशी भीति वाटते. कारण आता पैसाहि आहे आणि मालमत्ताहि आहे. येथल्याप्रमाणे मुंबई, बडोदें वगैरे ठिकाणीं इमारती झाल्या तर मला त्यांत आनंदच वाटेल.

"मी पुणेकरहि आहें व बाहेरचाहि आहें. माझ्या गेल्या सात पिढ्या या पुण्यात गेल्या. रा. सा. रानडे नेहमी म्हणत कीं, इतर ठिकाणीं ज्वारी, गहूं पिकतात त्याप्रमाणे पुण्यांत माणसें होतात. पुण्याचा हा लौकिक आजहि कायम आहे. पुण्यांत ज्याप्रमाणे वाङ्मयाचें प्रचंड कार्य होतें तसें इतरत्र होत नाही, व तसें होणारहि नाही. पुण्याची परिस्थिति साहित्यनिर्मितीस सर्वस्वीं अनुकूल अशी आहे. पण पुण्याचा एक दोष म्हणजे तोंडाळपणा हा होय. मी तुम्हा पुणेकरांना सांगणार आहें की, "पुणेकरांनो, तुम्ही आपलें तोंड जरा ताब्यांत ठेवा". साहित्याच्या क्षेत्रांत पुणेकरांची राजधानी मान्य केलीच पाहिजे. इतरांनी त्या साहित्यनिर्मितींत अग्रेसर होण्याची हाव धरूं नये. जर ते त्यात पडले तर उताणे पडतील. साहित्याच्या बाबतींत महाराष्ट्र दुर्दैवी आहे. याचें कारण मोठमोठे संस्थानिक महाराष्ट्राबाहेर आहेत. पण त्यांनी पुण्यावरील आपली दृष्टि दूर करता कामा नये. महाराष्ट्रांत लहान संस्थानिक उरले आहेत. आणि त्यांतहि कित्येक संस्थानांच्या मुलखाचा बराचसा भाग कर्नाटकात मोडतो. बरें, महाराष्ट्राचा व्यापारहि गुजर, मारवाडी याच्या हातांत आहे. म्हणून अशा संस्थाना फारसा पैसा व्यापाऱ्यांकडून मिळत नाही. आपणांला भरपूर कार्य करण्याची इच्छा आहे, त्यामुळे येथे कितीतरी पटीने चांगलें कार्य होईल. खरेशास्त्री, इतिहासाचार्य राजवाडे, शंकरराव देव यांच्यासारखीं आपल्या महाराष्ट्रांत अतुल स्वार्थत्यागी अनेक नररत्नें दाखविता येतील. पूर्वीचे ऋषीहि असेच स्वार्थत्यागपूर्वक काम करीत. जबाबदारी मध्यमवर्गावर पडते व ते काम करूं लागले म्हणजे आमच्यासारख्यांना पैसा द्यावासा वाटतो. आपण जे ग्रंथ लिहिता ते माझ्यासारख्या सामान्य लोकांकरता लिहिता. ['मी' याचा अर्थ Country Gentleman असा करतों.]

"शुद्धलेखनासंबंधाने आपण परिषदेमार्फत उपयुक्त कामगिरी चालविली आहे. या बाबतींत इंग्रजांचें धिम्मेपणाचें धोरण आपण पुढे चालविलें पाहिजे. शुद्धलेखनवाल्या मंडळींनी स्वराची बाराखडी तयार केली आहे. शुद्धि करणाऱ्या लोकांनी ही जी आई (आ ओ) उभी केली आहे ती कांही आमच्या मनाला पटत नाही. अहो, त्यांच्या नवीन लिपीमुळे आम्हांस ईश्वराची ओळखसुद्धा पटत नाहीशी झाली आहे! यामुळे कांही वेळां संताप येतो व वाटतें की, असल्या लिपींत लिहिलेलें पुस्तक वाचूं नये; फाडून टाकावें. पण पुढील पिढीकरिता आम्ही तें फाडीत नाहीं. व्याकरण हें कांही तरी कार्याकरिता आहे, आणि तें झालें नाही म्हणजे कार्य झालें नाही असें होणार आहे. आजची भाषा अशुद्ध होत चालली आहे. पूर्वी घरात

मुलाना पुरुषसूक्त, वैश्वदेव वगैरे शिकवीत. त्याचा हेतु हा की, मुलांची वाणी शुद्ध व्हावी. पण हल्ली अशुद्ध भाषा होत चालली आहे. त्यामुळे आमच्यासारख्यांना ती नीट समजत नाही. म्हणून विशेषत: ब्राह्मणांनी व इतरांनीहि आपली वाणी सुधारणें जरूर आहे. मोडी लिपी मागे पडत चालली आहे. तिच्या पुनरुज्जीवनाबद्दल आपण प्रयत्न करावेत. सध्या गायकी चीजांचें मराठीकरण चालू आहे, तसेंच भाषेचे शुद्धीकरणहि चालू आहे. फारशी-अरबी शब्द मराठींत नको म्हणतात, पण संस्कृतहि नसावेत असे मी म्हणतों. श्री. हरिभाऊ आपटे हे मराठी फार शुद्ध लिहीत असत म्हणतात. कारण ते शाळेंत संस्कृत शिकलेच नव्हते! वर्तमानपत्रकार इंग्रजी ताराची वाटेल तशी भाषांतरें करूं लागले म्हणून भाषेची ओढाताण झाली आहे. याचें कारण, कोणी त्या बाबतींत बोलणारा नाहीं. हिंदी-उर्दूची करा बरें ओढाताण पाहूं! मराठींत संस्कृत शब्द जे आहेत त्याऐवजी मराठी शब्द वापरावेत. हल्लीच्या बायकाना आज सासवा नको असतात त्याप्रमाणे मराठीच्या या आजेसासूला काढून टाका. मराठी भाषा पूर्वी बायकांनी शुद्ध ठेवली होती, पण आता बायकाहि बऱ्याच शिकूं लागल्या आहेत. त्यामुळे मराठीचा ऱ्हास होण्याची अधिक भीति आहे. वास्तविक मराठी भाषेची सर्वांगीण सुधारणा होण्याकरिता महाराष्ट्र विद्यापीठ लौकरच स्थापन झालें पाहिजे.

"सध्या बायकाना पूर्वीसारखी दळण, कांडण, पाणी आणणें, धुणें वगैरे कामें नाहीत. त्यामुळे रिकामा फार वेळ सापडतो व वेळ घालविण्याकारिता काही तरी साधन लागतें. पूर्वी 'करमणूक'सारखें चांगलें पत्र असे. पण सध्या भलत्या वाङ्मयाचा प्रसार फार वाढला आहे, व वेळ घालविण्याचें साधन म्हणून असल्या वाङ्मयाचा खप होतो. अशा वेळीं कांहीं तरी उत्तम वाचनीय लिखाण मिळाले पाहिजे. असले चांगलें लिखाण निर्माण झाल्याशिवाय असल्या लिखाणाला दोष देण्यात अर्थ नाही. सगळ्या बाबतींत आमचाच दाम खोटा आहे. असलें वाङ्मय आपण घ्यावयाचेंच नाही असा निश्चय केला तर उद्या असलें वाङ्मय बंद पडेल. चांगलें वाङ्मय निर्माण करण्यासाठी पैसे खर्च करण्याची आमची तयारी आहे. आमचे मित्र प्रि. धारपुरे येथे आहेत. त्यांच्या विचाराने या बाबतींत काही तरी कार्य करण्याची आमची इच्छा आहे. अनुताईंनी चिखलात दगड टाकूं नये असें आम्हा वडीलधाऱ्या मंडळीना वाटत होते; पण त्यानी स्वयंस्फूर्तीने पत्र लिहिलें. परंतु त्यामुळे त्याजवर गहजब करण्यात आला आहे. आमच्या दैवताची विटंबना करण्यात आली. आमच्या धर्मासंबंधाने, स्त्रियासंबंधाने कोणीं कांही केलें तरी आम्ही काही करीत नाही. आम्ही नेभळे असल्यामुळे आमचे देवहि नेभळे बनले आहेत. मुसलमानी किंवा शीख धर्माबद्दल असें लिहून पाहा पाहूं! आमची ही लाचार स्थिति बदलली पाहिजे."

यानंतर प्रो. द. वा. पोतदार यांचें आभारप्रदर्शक भाषण झालें. ते म्हणाले की, मी इतके दिवस परस्थ होतों, तो आजच स्वस्थ झालों आहे. निझाम राज्यांतून, नांदेड वगैरे जुन्या मराठवाड्यांतून रत्नाकरापर्यंतच्या प्रदेशांतून मीं प्रवास केला. त्या सर्व ठिकाणीं मला मराठी भाषेविषयी अभिमान व कळकळ दिसून आली. पुण्यांत माणसें होतात असें आता अध्यक्षांनी सांगितलें. पण येथे माणसें होत नसून निरनिराळ्या ठिकाणचीं माणसें पुण्याला लागतात. पुणें हें माणसें लागण्याचें बंदर आहे व तीं येथे येऊन काम करतात. आता श्री. नानासाहेब देव यांनी खऱ्या महाराष्ट्रातर्फे पुढील कार्याबद्दल आपल्याला आदेश दिला आहे. आम्ही पुढील कार्याचा बेत जाहीर करणार होतोंच, पण खऱ्या महाराष्ट्राच्या

आदेशाची आम्ही वाट पाहात होतों. आता पुढील संवत्सराच्या आंत या ठिकाणीं मंदिर उभारलें जाईल. अर्थात् संवत्सर केवढें असावयाचें हें परिस्थितीवर अवलंबून राहील.

शेवटीं प्रो. पोतदार यांनी सदर इमारतीला जागा देणारे औंधचे श्रीमंत राजेसाहेब, साहित्यमंदिराला देणग्या व इतर मदत करणारे, मांडव घालणारे दाते, इमारत बांधणारे व त्या कामीं सल्ला देणारे स्थापत्यविशारद करमरकर व रानडे बंधु, स्वागतपर पद्य म्हणणाऱ्या विद्यार्थिनी व त्यांचे शिक्षक श्री. तांबे व समारंभाला हजर असलेली मंडळी या सर्वांचे आभार मानले.

नंतर कुमारी दातार यांनी श्री. कृ. कोल्हटकरकृत "महाराष्ट्रगीत" सुस्वर आवाजांत गायिलें. या राष्ट्रगीताच्या वेळीं सर्व मंडळी उभी राहिली होती. शेवटीं सर्वांना पानसुपारी फुलें वांटण्यांत आल्यावर हा समारंभ सुमारें ११ वाजतां आटोपला.

---

[ हल्लीं पॅरिस येथे डॉक्टरेटचा अभ्यास करीत असलेले परिषदेचे सभासद श्री. हर्षे यांच्या खटपटीने पुढील संस्था पॅरिस येथे स्थापन झाली आहे. ]

# ASSOCIATION DES ÉTUDIANTS HINDOUS

**9, rue du Sommerard, Paris V**

***Tel. Danton 81-05***

---

**Pre'sidents d'Honneur** : Monsieur A. Foucher, Membre de l'Institut : Professeur a la Sorbonne ; Madame Sylvain Lèvi.

The object of the Association is to furnish information and give advice to Indian students prosecuting or wanting to prosecute their studies in Paris, and to organize meetings with the object of bringing the Indian students into contact, socially and intellectually, with the French and the foreign students. The Association has no political activities and chooses to remain above all parties.

Indian Students studying in Paris can become "Membres Actifs". Foreign Students and also Indian Students studying in other Universities are very cordially invited to become "Membres adhe'rents".

All persons who are interested in furthering the objects of the Association will be admitted with pleasure as "Membres sympathisants".

*Fees* : Membre actif—20 fr. per year.
Membre adhe'rent—10 fr. per year.
Membre sympathisant—Any contribution will be received with thanks.

A social meeting is held ordinarily on the Third Sunday of every month. Previous notice will be given of other meetings.

**Office-bearers** (1936-37) : *President*: Dr. B. T. Keskar, D.Litt. *Vice-president*: Mr. M. C. Ghose. *Treasurer*: Mr. R. G. Harshe. *Members*: Mr. G. P. Metha ; Mr. A. K. Imtiyaz. *Secretary*: Dr. B. C. Bose. Inquiries may be addressed to the Secretary.

---

# Principles which should govern Definition of Parts of Speech *

[मिस् एच्. एम. ॲवर्ट, पुणें]

## *General Principles*

1. Grammer is the study of the function (work) of words in the expression of thought, and the forms which words assume in performing these functions. Form is subordinate to function. The purpose of grammar, like that of all sciences, is to observe, not to control or dictate. Science in every branch is a means, not an end. By observation of existing facts, and the discovery of the laws which describe the habits of things as they are, all sciences lead us to the discovery of the truth. They are our servants, not our masters. This is true also of grammar Grammar has this special function, that being the science of language, its laws being the description of language habits, it is the servant of logical thought and literary expression. It makes us conscious of our language experience, and therefore makes that experience available for our further guidance. Its function is to observe the working of the 'tools' or 'material' that we use in expressing thought, and the form which they assume in that working.

Now elaboration has no place in scientific thought. The method of all sciences is to observe, analyse and classify according to the simplest fundamental principles.

2. We proceed to define the qualities of the good grammarian, the scientist in the sphere of language forms. He is one who has the power to perceive by observation, analysis and classification, the essential forms of speech as the medium of expressing thought. As a scientist he must be free from all prejudice either of past tradition or of present convention. (We are speaking here of the grammatical study of modern languages as spoken to-day, not of the historical grammarian, who traces the origin of words and the history of their forms. That is another branch of language study better called philology or morphology. The modern grammarian's work is the observation of what is spoken to-day not even what 'ought' to be spoken, for grammarians of modern living languages cannot control the movement within the language which represents its 'livingness', they can only observe and describe habits, which we call 'rules.'). The good grammarian must have the power to analyse thought without prejudice, he must be trained to be able to see truth by perceiving essentials and distinguishing them from non-essentials. This and this

---

* मराठी व्याकरणपरिषदेंत वाचलेला निबंध.

alone will preserve him from the three temptations to which the grammarian often falls a prey.

*a.* Too great simplification, by failing to see the essential differences in the function of words in the expression of thought. An illustration of this is found in the tendency among some Marathi grammarians to reduce the parts of speech to three—noun, verb and 'indeclinable' The function of noun and adjective, of verb and adverb, is not the same. A logical examination of their functions will make it impossible to group together words having widely differing functions in the expression of ideas. To reduce the parts of speech to these three classes is to confuse the study of the parts of speech with the analysis of sentences.

*b.* Too much elaboration, or complication. An illustration of this tendency is found in the tendency to increase the number of the parts of speech to eleven or twelve. This arises out of a confusion between function and form as being the main guide. As remarked above, form is subordinate to function, it is not a co-ordinate principle for refining grammatical categories. —Take for example the two sentences:—

तो हळू हळू चालतो. तो चांगला चालतो.

In both cases here, the work of defining, modifying the meaning of the verb is done by an adverb. In the first sentence the adverb is uninflected. In the second sentence it is inflected. But the *work*, the function, remains the same, that of modifying the meaning of the verb. The fact that one is inflected and the other uninflected does not make their function differ; and therefore does not make them different parts of speech. In describing adverbs we must refer to both types, when we are going into details and sub-categories; but in order that we may keep before us, and convey to the children in our schools, the essential nature of an adverb, we must first examine what its work is Later will come the time to teach children the sub-divisions of each main category. The inflectable and the uninflectable adverbs are sub-divisions according to *form* of the class of words which are called adverbs according to their *function*. They are not different parts of speech.

It should be mentioned here that the division of adverbs into *inflectable* and *uninflectable* adverbs does not, in the minds of some grammarians, refer to such adverbs as were given above. By many the division is made between inflected and uninflected adverbs. This is due to an even greater confusion of thought. Take for example the adverb मोठ्याने. This is called by some an inflected adverb as opposed to the adverb हळू, which is said to be uninflected. But the word is not inflected as an adverb, as is the case with the adverb चांगला, which often takes the same gender and number as the verb; it

is an adjective inflected in the genitive case in order that it may be used as an adverb. It is, therefore, in this case an adverb of the same class as हळू, which does not change its termination to suit the gender and number of the verb.

Another illustration of the confusion of form with function which gives rise to unnecessary elaboration is the tendency to make separate category for such particles as च, ही, देखील, सुद्धा. But these emphatic particles never occur as independent words in a sentence, and therefore have no grammatical function, though they add a shade of meaning to the words to which they are attached. For instance, तो आताच आला. तोच आला आहे. मी ते पाहिलं सुद्धा नाही. मजजवळ एकहि पैसा नाही. These emphatic particles do not change the function of the words to which they are attached, and therefore they are not separate parts of speech. तो and तोच are equally performing the function of pronouns. The change in the meaning or emphasis is a matter of thought, not of function and form.

*c.* The third temptation of the grammarian is that of confusing the normal grammatical function of words with their idiomatic use. An illustration of this may be taken from the English expression 'Now then'. These words are both adverbs of time. But in the following sentences it will easily be seen that the use of these words in the second pair of sentences is purely idiomatic.

I. I am *now* in this hall. (At noon) I was *then* at home.

II. *Now then*, be quiet, I want to go to sleep.

This, *then*, is what I am trying to do (now).

In the second pair of sentences those two words do not perform the usual function of adverbs in a sentence. They are, therefore, in these contexts, 'freaks' (as far as their function is concerned) such as are found in all scientific observation.

A parallel illustration of this in Marathi, a case in which this confusion has occurred between normal and the 'freak', and the tendency to create a new category for 'freaks' is observable, is the following use of आपला, e. g., in the sentence मी आपला जातों. The word आपला is an adjective, or an adjectival form of a pronoun. But here it is used simply for emphasis, to add 'colour'. We cannot obviously parse it according to its normal function, because it is not performing that function here. It is a 'freak' in this context, and all we can do is to describe it as such and leave the matter there. It is an adjective used idiomatically to add picturesqueness to the meaning, contrary to its usual function. Grammar is the study of the normal, and its rules are the description of normal habits of speech. There are idioms in all languages which defy the explanation of the grammarian, just as there are freaks and abnormalities in nature which defy the power of scientists in their attempts to explain the normal

facts of life. In other branches of science scientists do not create new classes for every freak Then why in the science of grammar ?

## Application of principles in detail

Let us examine now the part of speech commonly accepted in many languages, and see whether they will bear examination according to the above principles. What we want to observe is that each has its own independent work to do in the expression of ideas, and no other of the parts of speech defined can do that work Approaching the definition of the part of speech from the point of view of European languages we must be careful. We must not accept these eight parts of speech because they are traditional, but because, judged by a logical and unprejudiced analysis, they are true and essential. (And here it should be remembered that many European languages have a common origin with Indian languages, and therefore, we are likely to find similarity in the method of expressing ideas.) Then, before we add any other categories to these eight we must be convinced by the facts, not by the conventions of prejudiced persons, that there is still another class of words which perform a distinct function not yet accounted for by any of these eight classes.

Noun : Function is to name a living being, an object, or an idea.

Pronoun : To stand instead of a noun to avoid unnecessary repetition.

Adjective : To define the living being, object or idea, named by the noun.

Verb : To state a fact of action or suffering about a living person, object or idea.

Adverb : To define the scope of a verb, adjective, or other adverb, i. e., modify its meaning.

Preposition : To show relation between two ideas.

Conjuction : To join together words or sentences expressing two or more ideas.

Interjection : To express feeling directly, i. e., without describing it.

No one of these words, without modification, can do the work of any word of another class in its normal use. And these eight functions seem to be those which are essential, and also sufficient, for the expression of local thought.

---

*Note*—With regard to the teaching of grammar, two importantpoints should be remembered.

i. The great truths, fundamental principles, of any science are very simple. It is possible to present them in simple language to small children. If we are regarding as a fundamental truth, e. g., a main category, something which cannot be presented to small children, we should think again.

ii. Grammar, in contrast with other subjects such as history, teaches nothing new. It is a training in the observation of our experience, a description of our own habits of speech. By becoming conscious of our experience we are enabled to use it more effectively for self-training and development.

# सैतान !

## ( छंद : वैनायक )

[ महाकवि मिल्टनच्या 'Paradise Lost' ह्या महाकाव्याच्या 'नष्टनंदन' या भाषान्तरांतील चवथ्या सर्गांतील पहिल्या शंभरावर ओव्या. ]

हन्त, ध्वनि भयसूचक, त्यांहि ऐकिला
स्वर्गमीं दुमदुमतां, ज्यांहि देखिला
[1]'साक्षात्कारीय' ग्रंथ,—नादला तदा,
'दानव' ये क्रुद्ध पुनर्युद्ध कराया,
सूड घ्यावयास 'मानवां'वरी यदा,—
"यातना अहो, पृथिवीवासियां!—" असा.
ज्या ध्वनिनें, अवसर असतांच, सुचविली
मातापितरांस आद्य, गुप्त शत्रुची
तत्सन्निध आगति; की संकटमुक्ति-
तन्मारणजालमुक्ति होत ! !...काय की,
आगत सैतान अता खालती, पुरा
चवताळुनी, क्रोधानें जळत पातला,—
दोष घडविण्याआधि, प्रथम भुलविण्या
या मानवजातीला अखिल; तत्पर,
मनुबाळावरती निर्दोष कोवळ्या
हानि प्रथमयुद्धाची भरुन काढण्या,
अन् बचपा पतनाचा नरककर्दमी.
दूरस्थित, निर्भय, परि स्वीयगतिमधें
संतुष्ट न, जरि सुधीर; दर्पवल्गना
करण्याला उचित मिष न; आरभिला तें
भागीरथ स्वप्रयत्न, परि जन्माच्या
वेळिच जो गड्गडुनी, कढकढे हृदी
संकुल; उल्हाटयंत्र राक्षसी जणू
उलटत त्यावरिच परत; भीति भीषणा
नी शंका कुटिला कुणि ओढि मागुनी
क्षुब्ध विचारांस, तळांतून खळबळे
'नरक, अन्तरांत भिने तै, कारण की
आणियला 'नरक अन्तरांत' भोवती,
सळसळता; पळणें नच एक पाउल
'नरका'पासून शक्य, नी तसेंच ना
स्वतःपासून, जरी करि स्थलान्तर :
जागवी अता विवेक घोर निराशा
निद्रित जी, जागविते कटुसंस्मरण—
पूर्वस्थिति, सद्यःस्थिति, आणि भविष्यत्
कटुतर भवितव्यस्थिति; आधिकष्ट हीं

स्वाभाविक, घोरकृतीतून निपजणें.
खिळवी स्वव्यथितनेत्र, खिन्न कदाचित्
दृष्टिपुढे प्रसृत रम्य 'अमरोद्यानी',
कधि स्वर्गावरि, आणि पूर्ण तळपत्या
'सूर्या'वरती खमध्यसौधि जयाचे
तुंग अधिष्ठान. परिभ्रमुन बहुत तो
दीर्घ उसासे टाकित, वदला ऐसें :
"हे, तूं अभिषिक्त अतुल अग्रवैभवें,
अद्वितीयसाम्राज्यांतुन निहाळसी,
अधिदैवच ह्या नवीन सृष्टिचा जणू;
नी विलोकितां जयास सकल तारका
ओशाळुन शीर्ण शीर्ष लपविती; तुला
सांगाया आगत मी, परि न हितवचें,
किंवा नच नामवंततेत वर्धन
तव करण्या, भो सवितर ! तुजसि कथाया,
केवी तव किरण तिरस्कार्य मानितों
जे देती स्मरण करुन की, कुठल्या मी
उच्चस्थानावरुनी भ्रष्ट जाहलों,
अन् कसा तव गोलाच्याहि वरिवरी
वैभवशालीन एकदा प्रकाशलों,
तोवरि जैं दर्प आणि महदाकांक्षा
दुष्ट, अधःपतन करवि, स्वर्गि झगडतां
स्वर्गींच्या अप्रतिभट सम्राटासी :
हाय, काय कारण ! ना युक्तसा तया
बदला हा मजकरवी. की जया तयें
निर्मियलें तेवि, जेवि मी असें तदा
प्राधान्यी उज्वल, नी साधुनेमुळे
उपहास न कोणाचा कुन, न कठिण वा
तत्सेवा. शक्य कांहितरी असेल का,
किंचिदून स्तवनसुमन उधळणिपेक्षा,
सहज देय उलट भेट जी ? आभारां—
त्याचे ते देयसेच—अर्पणें तयां !
तरिही तत्साधुकृती सर्व कुटिलशा
ठरली मम ठायि, अंति; आणि धुमसवी
केवळ तद्वेष; उंच उन्नत इतुका

---

१ Apocalypse—'revelation'; seen by Apostle John, last Bible Bk.

मी त्याचें धिक्करिलें दास्य, वाटलें
चढलों जरि एक अधिक पायरी तरी
सर्वाधिक उच्च खचित, आणि देइन
एकपलीं ऋण महिष्ठ, जें कृतज्ञता-
ऽनंतभाव सहज, किती भारभूत जें !–
चाले जरि फेड सतत, तरि फेडायाचें;
विस्मरलों त्यापासुन घेतले किती,
आणि जाणलें न की, कृतज्ञ मानस
ऋणको तरि ऋणको नच, फेड तरि करी,
ऋणयुक्त नि ऋणविमुक्त एकसमयि तें;
ओझें मग कसलें ! हा:, नियति बलवती
त्याची जरि करती कुणि क्षुद्र किन्नर
मजला, तरि असतों सुखि; जागवती ना
दुर्दम्या आशा महदाकांक्षेसी.
तरिहि कां न ? दुसरी कुणि शक्ति कांक्षती
तितुकी दुर्दान्त, आणि क्षुद्र मी, तरी
सत्पक्षा मिळतों; परि समबल शक्ती
भ्रष्टल्या न, तिष्ठति निष्पंद अंतरीं
अथवा बाहिरुनीहि, सज्ज ठाकल्या
सर्व मोहनांविरुद्ध. असति तुज जरी
ती मुक्तेच्छा अन् ती शक्ति ठाकण्या ?
होत्या तुजजवळ: तदा कोण तुजमधे,
अथवा आरोपि कोण, मात्र स्वर्गिचे
'प्रेम अनिर्बंध' वागवीत सारखें
सकलांना ? म्हणुन अता प्रेम तयाचें
शापित; की, प्रेम आणि द्वेष सारखी,
जरि मजला शाश्वत तें देत यातना.
नाहि, शप्त तूंच; यथा तव इच्छेने,
तद्विरुद्ध निवडिलेंत, जें तिला अता
न्याय्याने भोगाया भाग जाहले.
मी विपन्न-दीन ! पळूं कोणत्या दिशें.
हा अनंत क्रोध, ही अनंत निराशा
चुकविण्यास ? ज्या दिशेस पळत, 'नरक' तो;
मीच स्वता नरक; रसातलि सखोलशा
खोल दुजी गर्ता मज ग्रासण्या उभी
'आ' वासुन, जी पुढतां ज्या नरकीं मी
पिचतों तो 'स्वर्ग' साच भासतो मला.
आ: शेवटि विरम : नाहि किमपि अवसर
अनुतापा उरला ? नच की क्षमेसहि ...?
नहि, 'शरणागति' चिन्मन, आणि शब्द 'तो'
तिरस्कार करि निषिद्ध, आणि भीतिही
लज्जेची नीच स्थित यक्षसमूही
ज्यांना मी भ्रष्टविलें वचन देउनी
आणि इतर गप्पांनी, एक निश्चिती
मात्र दिली "शरणागति नहिच; नमविलों
'सर्वेशा'–" ऐसें तै जल्पजल्पुनी.
अहह ! त्यांस कल्पना न, केवि महाग
भरपाई गर्वास्तव पोकळ इतुक्या
करित, यातनांत आर्त मनि विलापतों:
मजसि यदा पूजिति ते नरकराष्ट्रपदी,
मुकुट-राजदंड उंच जधि उभारती,
अध:पतन अधिक तधी; श्रेष्ठ केवळ
दैन्यीं; 'आनंद' हाच कांक्षा मिळवी.
परि, समजा अनुतपलों, आणि मिळविली
पूर्वस्थिति अनुकंपनि; लवकरी तदा
उच्चस्थिति स्मरविल दुर्दम्य विचारां,
माघारी घेइल, जे शपथिलें तदा
जातांना शरणमिषें: सुस्थिति येतां
दु:खीं दिधली वचनें जाति विसरुनी
हिंसक नी हीनसत्त्व सारखीच जीं.
कारण, खरि मनमिळणी तेथ शक्य ना
व्रण मारक द्वेष खोल करि इतुके जें
जो की नेइल मज कटु प्रतिक्रिया
आणि अध:पात अधिक, यांप्रती: असा
घेइन संक्रमणकाल सान विकत मी
देउन मूल्या सवाई,–द्विगुण यातना.
हें जाणत दंडमुख्य; म्हणून दूर तो
तितुका 'दाना'पासून 'याचने'हुनी
आत्मशांतिच्या जितुका दूर मी असें:
अशि सरतां सकलाशा, पाहि, ऐवजी
अमुच्या जे परित्यक्त, सीमपार ही,
त्याचा नवहर्ष, सृष्ट मानवजाति,
नी त्यास्तव ही 'जगती'. म्हणुनिया अता
रामराम आशे, अन् भीति, तुजसिही,
रामराम शोक: सर्व 'सत्' विनष्टलें;
होइ असत्, सत् मम तूं; तुजमुळें तरी
भिन्न स्वाराज्य 'स्वर्गराज'पासुनिया
घेइन मी, तुजकरवीं, अर्ध-अधिकसें
शासिन मी; की जें लौकरिच मानव
आणिक हें जगत नव्य, यांस कळेल."

—नारायण गजानन जोशी

# परिषदेची विशेष साधारण सभा

परिषदेची विशेष साधारण सभा ता. ७ फेब्रुवारी १९३७ रविवारीं दुपारीं ३ वाजतां परिषदेच्या नवीन इमारतीच्या उद्घाटनसमारंभासाठी उभारलेल्या मंडपात भरली होती. सभेस पुढील २३ सभासद आले होते :— (१) दा. न. शिखरे (२) रा. प्र. कानिटकर (३) चिं. ग. कर्वे (४) य. ल. गुण्ये (५) ग. गं. जांभेकर (६) कृ. पा. कुलकर्णी (७) ना. म. जोशी (८) ध. रा गाडगीळ (९) दे. द. वाडेकर (१०) न. चिं. केळकर (११) मा. त्र्यं. पटवर्धन (१२) रा. दा. देसाई (१३) ना. गो. चापेकर (१४) द. वा. पोतदार (१५) र. लु. जोशी (१६) ना. म. भिडे (१७) वा. म. जोशी (१८) ल. ना. चापेकर (१९) रा. वि. जोशी (२०) श्री. कृ. माटे (२१) न. का. घारपुरे (२२) ल. गं. काळे व (२३) ग. ब. ग्रामोपाध्ये.

श्री. ना. गो. चापेकर यांनी सुचविल्यावरून व श्री. ग. गं. जांभेकर यांनी अनुमोदिल्यानंतर परिषदेचे एक उपाध्यक्ष श्री. न. चिं. केळकर यांची अध्यक्षस्थानी योजना झाली. विशेष सभा असल्यामुळे मागील सभेचा वृत्तान्त वाचून दाखविला नाही. श्री. भाई कोतवाल यांचें सभेपुढे असलेल्या कामांबद्दल मतवजा पत्र वाचून दाखविण्यांत आलें. यानंतर सभेंत खालील ठराव मान्य करण्यांत आले :—

(१) ज्या अर्थी नियम ५ प्रमाणे परिषदेचें चालू काम व चालते दप्तर किंवा अन्य विवक्षित कार्यें अन्यत्र म्हणजे पुण्याबाहेरहि कोठे चालवावयाची हे ठरविण्याबाबत या सभेसाठी सूचना मागविल्या होत्या, व याबाबत फक्त नागपूरहून पत्रिकेचें काम करण्याची तयारी दर्शविण्यात आली आहे, त्या अर्थी परिषदेची ही विशेष साधारण सभा असा ठराव करीत आहे कीः—

हल्ली निवडणुकीचें प्राथमिक काम चालू झालें आहे व संपादकाची निवडणूक ही याच निवडणुकीचा भाग आहे म्हणून संपादकाची निवडणूक झाल्यानंतर पत्रिकेचें छपाई, प्रकाशनादि काम साहित्यपत्रिकेचा निवडलेला संपादक ज्या स्थळीचा असेल त्या स्थळीं, संपादकाने तशी इच्छा प्रदर्शित केल्यास व जबाबदारी पतकरल्यास, करण्यास हरकत नसावी.

सूचक— प्रो. वा. म. जोशी अनुमोदक— प्रो. ध. रा. गाडगीळ

(२) घटनेच्या १२ व्या नियमातील शेवटचें वाक्य गाळून त्या जागीं खालील वाक्य घालण्यांत येत आहे :—

'कोणत्याहि सभेंत किंवा निवडणुकींत कोणाहि बाकीदार सभासदांस मत देता येणार नाही.'

सूचक— प्रो. दे. द. वाडेकर अनुमोदक— प्रो. ध. रा. गाडगीळ

(वरील फेरफार करून मान्य झालेल्या नियमांची अंमलबजावणी ता. १ जून १९३७ पासून करण्यांत यावी असें सभेने ठरविलें.)

(३) घटनेंतील नियम १४ यास खालील पुस्ती जोडावी :—

'कोणत्याहि एखाद्या प्रादेशिक विभागात नियुक्त संख्येपेक्षा सभासद कमी असल्यास किंवा मुळीच नसल्यास प्रादेशिक विभागांतील सभासदांची ती संख्या स्वीकृत सभासदांची संख्या वाढवून भरून घ्यावी.

सूचक— प्रो. द. वा. पोतदार अनुमोदक— प्रो. डॉ. न. का. घारपुरे

याप्रमाणे कामें झाल्यानंतर अध्यक्षांनी सभा विसर्जन केली.

---

# कुलधर्म



गीतेंतील पहिल्या अध्यायांत ४० ते ४४ श्लोकात कुलधर्म नष्ट झाला असतां उद्भवणाऱ्या परिणामांचें वर्णन केलें आहे. गीतेवर अनेकानी भाष्यें केलीं आहेत तथापि 'कुलधर्म' या शब्दाचा निश्चित अर्थ अद्यापि कोणीं सांगितला आहे असें दिसत नाही.

चाळीसाव्या श्लोकांत कुलक्षय झाला असता कुलधर्मांचा नाश होतो व अधर्म बोकाळतो असें सागितलें असून पुढच्या श्लोकांत अधर्माच्या योगाने कुलस्त्रिया बिघडतात आणि स्त्रिया बिघडल्या म्हणजे वर्णसंकर होतो असें प्रतिपादिल्यावर बेचाळीसाव्या श्लोकात संकराच्या योगानें नरकाची प्राप्ति होत असून वर्णसंकर करणाऱ्या दोषामुळे जातिधर्म व कुलधर्म हे उत्पन्न होतात असें बजावल्यानंतर उत्पन्न झालेले लोक नरकात पडतात असें प्रतिपादिलें आहे. अर्थात् हें प्रतिपादन अर्जुनाचें असल्याने तें पूर्वपक्षरूपानेच जनतेपुढे आलेलें आहे. तथापि हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे की, अर्जुनाने माडलेल्या या विचारसरणीचें निराकरण भगवंतांनी पुढे कोठेच केल्याचें आढळत नाही. यावरून कौरवांना मारण्यांत अर्जुनाला पाप लागलें असतें किंवा नाही या प्रश्नाबाबत श्रीकृष्णांनी निश्चयपूर्वक पुढे सागितलें असलें तरी कुलधर्मांचें अर्जुनाने वर्णिलेलें महत्त्व श्रीकृष्णांना मान्य आहे असें धरून चालण्यास कांही अडचण दिसत नाही.

अर्जुनाच्या म्हणण्याप्रमाणे कुलधर्म हे सनातन आहेत; कुलाचा क्षय झाला असतां कुलधर्म बुडतात आणि अधर्माचा प्रादुर्भाव होतो. यांत कुलधर्मांचा लोप अधर्माला कारणीभूत होतो. इतक्या महत्त्वाचे कुलधर्म आहेत असें अर्जुनाचें म्हणणें. यावरून आपणांस कुलधर्मांचें स्वरूप ठरवावयास पाहिजे. अर्जुनाने कुलधर्माला शाश्वत व सनातन हीं जीं विशेषणें लावलीं आहेत तींहि महत्त्वाचीं असून कुलधर्मांचा अर्थ समजण्यास साहाय्यभूत होणारीं आहेत. सध्या आपण क्षुद्र दैवतांचें पूजन करणें हा कुलधर्माचा प्रकार समजतों. परंतु असले कुलधर्म बुडाले तरी यत्किंचित्हि हानि होणारी नसल्यामुळे अशा कुलधर्मांबद्दल अर्जुन शोक करीत नाही हें उघड आहे. दासोपंतांनी म्हटल्याप्रमाणे "कुलातें धर्मुचि मूल" म्हणजे धर्मावरच कुलाचें अस्तित्व असतें अशा योग्यतेच्या अर्जुनाला ज्याबद्दल विषाद वाटतो तो कुलधर्म असला पाहिजे. पण असे कुलधर्म कोणते हें मात्र कोणीच स्पष्टपणें सांगत नाही. पहिल्या श्लोकांत कुलधर्मांचा अभाव म्हणजे अधर्म असें समीकरण मांडण्यांत आलें आहे. अधर्माच्या योगाने स्त्रिया बिघडतात यावरून कुलधर्म शब्दाने सामाजिक वैवाहिक बंधनें ध्वनित होतात असें म्हणता येण्यासारखें आहे. पण मग शंका अशी येते की, विवाहविषयक नियंत्रण हा एकाच कुलाचा धर्म होत नसून सर्वच कुलांचा होत असतो. आणि जो सर्व कुलांना सामान्य धर्म असतो तोच जातिधर्म बनतो. परंतु त्रेचाळीसाव्या श्लोकांत जातिधर्म व कुलधर्म हे निराळे असल्याचें सुचित केलें आहे. सनातन व शाश्वत या दोन विशेषणांच्या योगाने कुलधर्म हे बदलणारे नाहीत अशा स्वरूपाचे ते असले पाहिजेत.

म. सा. प. (१०-१-५)

सनातन याचा अर्थ 'परंपरेने प्राप्त झालेले' असाच बहुतेकानी केला आहे. आता परंपरेने प्राप्त झालेले कुलधर्म विशिष्ट आणि भिन्न परिस्थिति निर्माण झाली तरी बदलण्याचें कारण पडत नाही. असे कुलधर्म कोणते असावे याची कल्पनाहि करता येणें शक्य नाही. कित्येकांनी जातिधर्म म्हणजे वर्णधर्म असा अर्थ केला आहे. वर्णधर्म–निदान धर्म प्रतीत ज्यांत होतो असे जे आचार त्यात–परिवर्तन झालेले आपण पाहात आहों. तेव्हा परिवर्तनशील असूनहि सनातनत्व ज्याच्या ठिकाणीं आहे असे हे जातिकुलधर्म असले पाहिजेत. जातिधर्म म्हणजे येथे क्षत्रियधर्म असें टीकाकारांनी स्पष्ट म्हटले आहे. आता क्षत्रियाचा धर्म युद्ध करणें हा आहे. वर्णसंकर झाला असता ह्या जातिधर्माचा म्हणजे क्षात्रवृत्तीचा लोप होण्याचा संभव आहे. ज्या निरनिराळ्या वृत्तींची राष्ट्राच्या कार्यास आवशकता असते त्या वृत्ति उत्कटत्वाने निर्माण करावयाच्या असल्यास वर्णसंकर न होऊं देण्याची दक्षता बाळगली पाहिजे असा प्राचीन शास्त्रकारांचा कटाक्ष होता यात शंका नाही. परंतु जातींतच पण निरनिराळ्या कुळांत कुलपोषक अशा कोणत्या वृत्तींची अपेक्षा शास्त्रकार करतात हें मात्र समजत नाही. दासोपंतांनी जातिधर्म म्हणजे स्वरूपधर्म–आत्मज्ञान अथवा आत्मसाक्षात्कार–असा केला असून याला साधनीभूत होणारें कर्माचरण तो कुलधर्म असें सांगितलें आहे. कुलधर्माचरणाच्या योगाने सत्त्वगुण साध्य होतो असें त्याचें म्हणणें आहे. "विहित कर्मांचें अनुष्ठान। पाहिजे सत्त्व शुद्धी लागून। यालागीं आचरण। ते एक कुलधर्माचें ॥".

आता विहित कर्मांचें अनुष्ठान प्रत्येक कुलाला सारखेंच असलें पाहिजे. याकरिता जातिधर्माहून कुलधर्माची भिन्नता ओळखता येणें कठीण जाईल. एखादा गुण एखाद्या कुळांत बहुत काळ प्रकट झाला तर तो पुढे त्याच गुणाची निर्मिति त्याच कुळात करूं शकतो असा एक आनुवंशशास्त्राचा नियम आहे. हा नियम बरोबर आहे असें मानलें तरी प्रत्येक कुळांत निरनिराळ्या धर्माचा परिपोष कोणत्या स्वरूपाचा होऊं शकतो हे कोणी जरी विशद करण्यास पाहिजे आहे. वामन पंडित म्हणतो "ज्या धर्मी जोडे ब्रह्म ते, छिन्न होतां कुलधर्म, मोक्षप्रद मनुष्यजन्म नरकसाधन होत असे." यावरून कुलधर्माने ब्रह्माची जोड होते असाच अभिप्राय वामन पंडिताचा असल्यामुळे ब्रह्माची जोड करून देणारे परंतु जातीचे धर्म नसणारे आणि केवळ कुळाचेच असणारे असे धर्म कोणते याचें स्पष्टीकरण व्हावयास पाहिजे.

**ना. गो. चापेकर**



मुंबई व उपनगर मराठी साहित्यसंमेलनाचें तिसरें अधिवेशन डिसेंबरांत ठाणें येथे श्री. भा. वि. वरेरकर यांच्या अध्यक्षतेखाली भरून यशस्वी पार पडलें. स्वागताध्यक्ष प्रसिद्ध थिआसॉफिस्ट श्री. रा. स. भागवत होते. संमेलनांत, 'ललित वाङ्मयाचा हेतु निरपेक्ष आनंद की मतप्रचार !' व 'वाङ्मयात कंपूशाहीची इष्टानिष्टता' या दोन विषयावर चांगली चर्चा झाली.

× × × ×

बडोद्याच्या सांवत्सरिक वाङ्मयपरिषदेचें अध्यक्षस्थान नागपूरचे विख्यात साहित्यिक श्री. पु. य. देशपांडे यांनी स्वीकारलें होतें. जीवन आणि कला यांच्यासंबंधी त्यांनी केलेलें विस्तृत विवेचन मननीय वाटेल.

# अशिष्ट इंग्रजींतील हिंदी शब्दसंकेत

सोळाव्या शतकापासून युरोपियनांचा संबंध हिंदी लोकांशीं येऊं लागला व परस्परांचे कांही विशिष्ट शब्द आणि वाक्प्रचार परस्पराच्या भाषेंत शिरूं लागले. हिंदुस्थानचीं शब्दमौक्तिकें युरोपीयाच्या मुखात प्रथम घालणारे पाहिले लोक म्हणजे जिप्सी होत. हे युरोपांत कधी गेले याचा निश्चय होत नसला तरी १५व्या शतकात ते इंग्लंडांत होते यात शंका नाही. प्रथम त्यांची भाषा इंग्रजांना कळत नसे म्हणून त्याना ती गूढ, सांकेतिक वाटे. Cant ही संज्ञा त्या वेळीं रूढ झाली. जिप्सी भाषेला 'झिंगारी' (बंजारी) भाषा असें म्हणण्यात येऊं लागले; व तींतील कांही शब्द अशिष्ट लोकाच्या, विशेषतः चोर-भिकारी याच्या, बोलण्यांत शिरले. Slang हा शब्दच मुळीं जिप्सी आहे. त्याचा अर्थ 'बोली (जिप्सी).' इंग्रजी भाषेत शिरलेल्या अशा अशिष्ट शब्दांचा कोश इ. स. १५६६ त झाला हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. असो.

शिपाई आणि खलाशी यांचेंच विशेषतः बरेंचसें दळणवळण हिंदी लोकांशीं होई व ते सुद्धा हलक्या जातींच्या हिंदी लोकांशीं. तेव्हा त्यांच्या बोलण्यांतील शब्द लवकर उचलले गेले यात नवल नाही. याच्या उलट इंडियन सिव्हिल सर्व्हिसच्या परिक्षेस संस्कृत आणि अरबी भाषा कंपनीच्या अमदानींत ठेविल्या असल्याने इंग्रज अधिकाऱ्यांना प्राच्य वाङ्मयाचा परिचय झाला व कळत नकळत त्यांच्या तोंडीं व लिहिण्यांत नवीन व दृष्टातपर हिंदी वाक्प्रचार येऊं लागले. 'पंच' पत्राने ४ मे १८५९ च्या अंकात याबद्दल विनोदाने तक्रार केल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें.

व्यापारी लोकांना ठिकठिकाणीं हिंडावें लागून ठिकठिकाणच्या भिन्नभाषी गिऱ्हाइकाशीं बोलावें लागत असल्याने त्यांचीहि मूळ बोली धेडगुजरी बनते. मारवाडी किंवा पारशी व्यापारी आपल्या भाषेंत बोलतांना पाहावें; किती तरी परभाषांतील शब्द ते सहजासहजी बोलून जातात. गुजरात-काठेवाडांत राहणारा दक्षिणी माणूस किंवा उत्तरेकडील हिंदी मुलखांतला मराठी माणूसहि असाच धेड-गुजरी किंवा धेड-हिंदी बोलतो. त्यामुळे त्याचा व्यवहार कांही बिघडत नाही पण त्याची स्वभाषा मात्र परक्या शब्द-वाक्प्रचारांनी स्थूल बनत जाते. प्रथम कांही दिवस या शब्दस्थौल्याला अशिष्ट-रोग म्हणून संबोधण्यांत येतें पण नतर काही दिवसांनी त्याला शिष्ट, निरोगी बाळसें म्हणून मानतात. मग भाषेला रोग जडला आहे कीं नाही याचा वाद भाषाशोधकांत चालतो.

पुढील कांही शब्द १८७२ सालीं प्रसिद्ध झालेल्या Slang Dictionary मध्ये आढळतात. हे व आणखी आपणांस सुपरिचत असे (आया, बझार, बीबी, बगी, बडा, छोटा, कांजी, खानसामा, धोबी, हकीम, नबाब इ०) वीस पंचवीस शब्द धरून त्या कोशांत हिंदी भाषांतून आलेले याहून जास्त अशिष्ट किंवा सांकेतिक शब्द नाहीत. पण १८८४-१९२८ पावेतो बाहेर पडलेल्या द्वादश विभागात्मक नव्या आक्सफोर्ड कोशात किती तरी हिंदी शब्द उद्धृत केले आहेत. जुन्या अशिष्ट शब्दांना शिष्टपणा कालांतराने येतो व ते शिष्ट लोक राजरोस वापरूं लागतात. ही गोष्ट एकाच भाषेंतील जुन्या आणि नव्या कोशांचा तुलनात्मक अभ्यास करणारास सहज आढळेल.

१ Banyan day (बनिया दिन)—या दिवशीं इंग्रजी जेवणांत मांस नसतें. निवृत्तमांस हिंदु वाणी कधी मांस खात नाहीत यावरून बनलेला प्रयोग. हा प्रथम पोर्तुगीज लोकांनी बनविला. खलाशांत प्रथम हा रूढ झाला. पुढे लक्षणेने याचा अर्थ 'उपासमार' असाहि बनला. Banyan hospital म्हणजे जनावरांचें इस्पितळ ! (अहिंसावादी वाणी प्राण्यांना रुग्णालयात पांजरपोळात ठेवीत यावरून). Banyan tree = वड, वटवृक्ष; हा शब्द सुद्धा वाणी लोकांचे देव वडाखाली असतात व त्याला ते पूज्य मानतात, हें पाहून साहेबाने बनविला.

२ Bombay Ducks (मुंबईचीं बदकें)—ईस्ट इंडिया कंपनीच्या सैन्यांतील मुंबईच्या पथकांना हें नाव असे. नंतर हें नाव वाळलेले मासे, सुकट, बोंबील याला पडलें. आंग्लो इंडियनांत हा शब्दप्रचार आहे.

३ Buckshish (बक्षीस)—पारितोषिक. हिंदुस्थानांत सर्वत्र काम केल्यावर ठराविक मजुरी मिळाल्यानंतर जी चिरीमिरी मागण्यांत येई तीवरून या शब्दाला युरोपीय भाषेंत निंदाव्यंजक अर्थ आला. Tip ची पद्धत युरोपांतच फार आहे म्हणतात.

४ Chee-chee (शी शी) — ही संज्ञा युरेशियन (हाफ-कास्ट) लोकांना निंदार्थी लावतात. यांच्या हिंदी बायका शीः शीः (इश्श) असें वारंवार म्हणत यावरून शब्द बनला.
—आंग्लो इं.

५ Cush mawaunee (कुछ मवानी नहीं)—'कांही हरकत नाही !' या अर्थी शिपाई-खलाशी वापरतात. —आंग्लो इं.

६ Dungaree (डोंगरी)—१ हलका, सामान्य, अशिष्ट. २ हलकें, निळें कापड (खलाशी वापरतात तसले). मुंबईच्या परिसरात वाईट वसतीचा 'डोंगरी' हा एक भाग आहे त्यावरून शब्द बनला. —आंग्लो इं.

"As smart a young fellow as ever you'd see,
In jacket and trousers of blue dungaree."

७ Dustoorie (दस्तुरी)—लाच, कमिशन. —आंग्लो इं.

८ Feringee (फिरंगी)—युरोपियन. इकडे प्रथम हा शब्द पोर्तुगीजांना लावीत. फारसींतील 'फरंग' शब्द 'फ्रँक'वरून आला असेल ! —आंग्लो इं.

९ Juwaub (जबाब)—'उत्तर' या अर्थी आंग्लो इंडियन हा शब्द वापरीत नसून 'नकार' या अर्थी वापरतात.

१० Pyah (प्या)—क्षुद्र, फालतू या अर्थी खलाशी लोक वापरतात. परिया या अस्पृश्य जातीच्या नावावरून प्या बनला. जुन्या पोर्तुगीज वसाहतवाल्यांच्या परिया वंशजांना 'प्या पोर्तुगीज' म्हणतात. सेंट हेलेना येथील गचाळ देशी लोकाना खलाशी लोक 'प्या इंग्लिशमेन' असेंहि म्हणतात !

११ Surat (सुरत)—हलक्या दर्जाचा किंवा भेसळ पदार्थ. सुरतेच्या हलक्या जातीच्या कापसावरून हा अर्थ निघाला. अमेरिकन यादवी (सिव्हिल वॉर)नंतर कारखानदार बहुशः अमेरिकन कापसांत सुरतेच्या हलक्या कापसाची भेसळ करीत. यावरून लँकाशायरचे लोक 'सुरत' ही संज्ञा कोणत्याहि हलक्या, भेसळ वस्तूला लावूं लागले. 'All in want of beerhouses must beware of Beaumont and White, the Surat brewers' अशा जाहिरातीवरून ब्युमॉट–व्हाईट कंपनीने अब्रूनुकसानीची फिर्याद केली होती.
—टाईम्स ८ मे १८६१

'सुरत' या गांवाचा सांकेतिक अर्थ आपल्या महाराष्ट्रियांत निराळाच आहे. 'या संमेलनाची सुरत करूं, लक्षांत ठेवा !' अशा आशयाचा धाक जळगांव संमेलनापूर्वी कांही मंबापुरिस्थ साहित्यिकांनी घातला होता हें स्मरणांत असेलच. '१९०७ सालची सुरतची कॉंग्रेस लो. टिळकांनी जशी उधळून लाविली तसें हें संमेलन उधळून देऊं' हा ध्वन्यर्थ सुरतच, संकेत माहीत असल्याशिवाय कळणार नाही खास. 'पानपताला' हि असाच संकेत आहे.

परकीय शब्दांना जे संकेत प्राप्त होतात ते त्याच्या मूळच्या अंगच्या विशिष्ट गुणावरूनच होतात हें वरील इंग्रजींतील हिंदी शब्दांवरून दिसून येणार आहे. या तऱ्हेच्या अभ्यासाचा आणखी प्रयत्न झाल्यास तो भाषाध्ययनाला उपकारक होईल.

**चिंतामण गणेश कर्वे**

---

# पहिली मराठी व्याकरण परिषद्

[सविस्तर वृत्तात परिषदेच्या अहवालांत येईल.]

पूर्वी जाहीर झाल्याप्रमाणे ता. २५ व २६ डिसेंबर या दोन दिवशीं सकाळ दुपार या परिषदेच्या बैठकी भरल्या. सुमारे शंभर विद्वान आणि व्यासंगी मंडळींनी परिषदेंत उत्साहाने भाग घेतला होता. आरंभीं श्री. ताम्बेशास्त्री यांच्या गायनशाळेंतील मुलींनी, या परिषदेसाठी स्वतः ताम्बेशास्त्री यांनी व गिरीश कर्वींनी केलेलीं पदें म्हटल्यावर श्री. मुकुंदशास्त्री मिरजकर यांनी स्वतः रचलेले प्राचीन वैयाकरणाच्या प्रशस्तिपर संस्कृत श्लोक म्हटले. यानंतर स्वागताध्यक्ष श्री. ना. गो. चापेकर यांचें मराठी व्याकरणाच्या प्रगतीचा आढावा घेणारें भाषण झालें. श्री. न. चिं. केळकर यांनी ही व्याकरणपरिषद् भरविण्याचा उद्देश आपल्या विनोदी व मार्मिक भाषणांत स्पष्ट केला. नंतर अध्यक्षांची सूचना आणि अनुमोदन देणारीं लहान लहान भाषणें रावब. कृ. ग. जोशी, प्रो. के. ना. वाटवे, प्रो. वा. म. जोशी, श्री. बा. मा. खुपेरकर, श्री. नी. शं. नवरे इ.नी केलीं. यापुढे व्याकरणपरिषदेचे एक चिटणीस श्री. रा. दा. देसाई यांनी बाहेरून आलेले अभीष्टचिंतनपर संदेश वाचून दाखविले. एवढें झाल्यावर अध्यक्ष वे. शा. सं. रंगाचार्य रड्डी यांचें भाषण होऊन सकाळची बैठक आटपली.

दुपारीं 'मराठी व्याकरणाची रचनापद्धति' या विषयावर चर्चा ठेविली होती. डॉ. प. ल. वैद्य यांनी विषयाचा उपन्यास करतांना संस्कृत आणि इंग्रजी या दोन्हीहि भाषांचें साहाय्य घेऊन व्याकरणरचना करावी हें आपलें मत स्पष्ट केलें. श्री. म. पा. सबनीस, श्री. गो. पां. पावशे, श्री. गो. कृ. मोडक, श्री. मो. स. मोने, श्री. वि. ह. निजसुरे, श्री. खुपेरकरशास्त्री, श्री. ह. ना. नेने, श्री. वाडीकरशास्त्री इ. मंडळींनी चर्चेंत भाग घेतला होता. या चर्चेंत विवेचिलेले

मुद्दे परिषदेच्या अहवालांत सविस्तर देण्यांत येणार आहेत. संध्याकाळीं केसरी कचेरींत प्रतिनिधींना पानसुपारी झाली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रदर्शनउद्घाटनसमारंभ होता. आरंभीं मंगल पद्यें झाल्यानंतर डॉ. प. ल. वैद्य यांनी प्रदर्शन उघडण्यापूर्वी व्याकरणाच्या ग्रंथाच्या इतिहासावर भाषण केलें. यानंतर प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन, ना. दा. बनहट्टी यांचे व इतर काही निबंध वाचून दाखविण्यांत आले. याच बैठकींत मुंबईचे श्री. भा. स. तर्खड यांनी दादोबा पांडुरंग यांच्या चरित्रावर भाषण केलें. दुपारीं 'शब्दाच्या जाती' या विषयावर चर्चा झाली. उपन्यास डॉ. वा. गो. परांजपे यांनी केला. सदोष इंग्रजी व्याकरणावर आधारलेल्या शब्दाच्या आठ जाती कशा अयुक्त आहेत हें त्यांनी आपल्या भाषणात सोदाहरण दाखवून दिलें. प्रो. ग. ह. केळकर, मिस्. लॅंबर्ट, प्रो. गो. वि. तुळपुळे इत्यादींनी चर्चेंत भाग घेतला होता. अध्यक्षांच्या समारोपाच्या भाषणापूर्वी परिषदेच्या पुढील कामासाठी एक समिति नेमण्याचा ठराव करण्यात आला. वे. शा. सं. रंगाचार्य रड्डी, श्री. कृ. पा. कुळकर्णी, डॉ. प. ल. वैद्य, डॉ. वा. गो. परांजपे, प्रो. श्री. म. माटे, प्रो. ग. ह. केळकर, श्री. गो. कृ. मोडक, श्री. फके व रा. दा. देसाई (चिटणीस) यांचा या समितींत समावेश करण्यांत आला. शेवटीं प्रो. न. र. फाटक, जोशी व श्री. चिं. ग. कर्वे यांनी अध्यक्ष व इतर परिषद् यशस्वी करण्यास उपयोगी पडणारी मंडळी यांचे आभार मानल्यानंतर ही परिषद् विसर्जन पावली.

श्री. शं. ग. दाते यांनी या परिषदेला जोडून जुन्या-नव्या व्याकरणग्रंथाचें उत्कृष्ट प्रदर्शन मांडलें होतें व व्याकरणग्रंथांची एक सूचीहि प्रसिद्ध केली होती. ही सूची या अंकात इतरत्र जोडली आहे. दोन्ही अध्यक्षांचीं भाषणें गेल्या अंकाबरोबर रवाना केलींच होतीं.

चिटणीस,
म. सा. परिषद्.

---

भारतीय साहित्य परिषदेचें द्वितीय अधिवेशन मद्रास येथे ईस्टरच्या सुट्टींत भरलें. परिषदेचा मुख्य उद्देश हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील साहित्यिकांचा व साहित्यांचा परस्परपरिचय करून देण्याचा जो आहे तो निरनिराळ्या प्रांतांतून अशीं अधिवेशनें भरत गेल्यास कांही अंशीं सफल होणार आहे. सर्व भाषांतील चांगल्या ग्रंथांच्या याद्या तयार करण्याचें काम परिषदेने जें अंगीकारलें तें फार उपयुक्त आहे. परिषदेसाठी महाराष्ट्रशाखेचे मंत्री प्रो. बनहट्टी हे ज्यांना अखिल भारतीय महत्त्व आहे अशा मराठी साहित्यग्रंथांची यादी नामांकित साहित्यिकांच्या मदतीने प्रसिद्ध करण्याच्या तयारींत आहेत.

# परिषद्वार्ता



## कार्यकारी मंडळाच्या सभा—

ता. १५ जानेवारी १९३७—निधिकारकांकडून इमारतखर्चासाठी रक्कम मागविण्याचा ठराव व विशेष साधारण सभेंत मांडावयाचे ठराव मंजूर झाले. कांही सभासदांचीं नांवें कमी करण्यास मान्यता देण्यांत आली.

ता. ४।१४ फेब्रुवारी १९३७—नाट्यसंशोधनमंडळ संलग्न करून घेण्यांत आलें; नागपूर शाखेसभेसंबंधी विचारविनिमय होऊन मान्यता देण्यासंबंधी ठराव झाले. नवीन घटनेंतील निवडणुकीबाबत नियमांतील अडचणींवर निर्णय घेण्यात आला.

ता. २१ मार्च १९३७—कर्नाटक महाराष्ट्र मंडळ (धारवाड) व मराठी वाङ्मयमंडळ (रत्नागिरी) या संस्था संलग्न करून घेण्यांत आल्या. कचेरी-इमारतव्यवस्थेबाबत विचार झाला. चंद्रशेखर व काथवटे यांच्या दुखवट्याचे ठराव झाले.

## वृत्तांत-निवेदन—

परिषदेची कचेरी ता.७ फेब्रुवारीपासून आपल्या मालकीच्या नव्या इमारतींत भरूं लागली आहे हें सांगतांना अवर्णनीय आनंद वाटत आहे. जे जे सभासद यापुढे पुण्यास येतील त्यांनी एकवार परिषदेच्या नव्या इमारतींत पदार्पण करून, नवा आनंद मिळवावा अशी आग्रहाची विनंती आहे.

* * * * *

ता. ७ फेब्रुवारी रोजीं संध्याकाळीं इमारतीचा उद्घाटनसमारंभ ज्या मंडपात झाला त्यांतच पोलंड देशांतील विदुषी प्रो. मादाम विल्मन–ग्राबोवस्का यांचें भाषाशास्त्रावर व्याख्यान झालें. अध्यक्षस्थानीं प्रो. वा. गो. पराजपे हे होते. परिषदेमार्फत वारंवार निरनिराळ्या वाङ्मय-क्षेत्रातील विद्वानांचीं व्याख्यानें व चर्चा करवावयाची हा जो इमारत बांधण्यांतला कार्यकारी मंडळाचा मुख्य उद्देश, त्याच्या सिद्धीला इमारत उघडण्याच्या दिवशींच प्रारंभ झाला. ता. १४ फेब्रुवारी रोजीं सायंकाळीं डॉ. श्री. व्यं. केतकर यांना चर्चेसाठी निमंत्रण करण्यांत आलें होतें. अशा रीतीने, जमल्यास दर रविवारीं परिषदेच्या सभागृहात कांही वाङ्मयीन कार्यक्रम करण्याचा विचार आहे. परिषदेतर्फे ता. २० मार्च रोजीं भारतीय साहित्यपरिषद् (महाराष्ट्र-शाखा), हिचे मंत्री प्रो. श्री. ना. बनहट्टी यांचें भा. सा. परिषदेसंबंधी माहिती देणारें व्याख्यान करविण्यांत आलें होतें.

* * * *

परगांवांहून जे प्रसिद्ध साहित्यिक पुण्यास येतात त्यांचा सन्मान करून त्यांचा परिचय स्थानिक विद्वानाना करून देण्याचाहि मंडळाचा उद्देश आहे. मात्र त्यांचें आगमन झाल्याचें मंडळाला कळलें पाहिजे. तेव्हा ज्यांना ज्यांना अशी माहिती लागेल त्यांनी ती कचेरीस कळविण्याची तसदी घ्यावी अशी विनंती आहे.

नव्या इमारतींत एक अतिथिगृहहि बांधलें आहे. पण त्यांत तूर्त चिटणिसी कचेरी ठेविली असल्याने दुसरें पाखें बाधलें जाईपर्यंत पाहुण्यांना उतरणें गैरसोईचें होणार आहे. तथापि त्यांची तात्पुरती सोय मंडळ अवश्य करील.

**संस्थानिकांच्या भेटी**—मंदिराचें उद्घाटन करताना व त्यापूर्वी दोन दिवस श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर यांनी इमारत पाहिली. ता. ६ मार्च रोजी सायंकाळीं श्रीमंत राजे बाळासाहेब पंतप्रतिनिधी, संस्थान औंध, श्रीमंत राजे बाबासाहेब पंत सचीव, संस्थान भोर, या उभयतां सरकारनी नवें परिषद्कार्यालय पाहण्यासाठी मुद्दाम आगमन केलें. या प्रसंगीं कार्य. मंडळाचे सभासद, स्थापत्यमंत्री रानडे-मराठे, ठेकेदार-इंजिनियर श्री. करमरकर, उपाध्यक्ष प्रो. वामनराव जोशी, रा. ब. कुमठेकर व काही सामान्य सभासद उपस्थित होते. श्रीमंतांना सर्व इमारत दाखविण्यात व जमलेल्या मंडळींचा परिचय करून देण्यात आल्यावर कार्याध्यक्ष श्री. चापेकर यांनी श्रीमंत बाळासाहेब औंधकर यानी जागा दिल्यामुळेच हें लहानसें मंदिर आज दिसत आहे असें आभारपूर्वक सागून श्रीमंताना विनंती केली की, त्यांनी महाराज सयाजीराव गायकवाड यासारख्या मोठ्या सुविद्य संस्थानिकांकडून संकल्पित बाधकाम पुरे करण्यासाठी आश्रय मिळवून देण्याची आता परिषदेचे सभासद या नात्याने खटपट करावी. तसेंच श्रीमंत बाबासाहेब भोरकर यानी ३०० रु. देणगी दिल्याबद्दल त्याचेहि आभार मानून उभतांनाहि परिषदेच्या भावी उत्कर्षाची काळजी बाळगण्यास विनंती केली. नंतर उभयतां श्रीमंतांना पुष्पहार, अत्तर-गुलाब देऊन त्यांचा गौरव करण्यांत आला. श्रीमंत बाळासाहेब यानी उत्तरादाखल मोठें कळकळीचें भाषण केलें व असें सागितलें की, नवीन उपयुक्त साहित्य निर्माण करा म्हणजे लक्ष्मी आपोआप हातांत येईल. इजिप्त देशांतल्याप्रमाणें मातृभाषेचाच आरंभापासून अखेरपर्यंत सर्वांनी अभ्यास करावा व भाषेला महत्त्वास चढवावें. शेवटीं परिषदेच्या मार्फत उत्तरोत्तर भाषासंवर्धनाचें कार्य होत जावें अशी आशा व्यक्त करून श्रीमंतांनी निरोप घेतला.

## इमारतनिधीसाठी मिळालेल्या नव्या देणग्या

१ श्री. बाबूराव साळवेकर, पुणें १०० रु.
२ श्री. केशव विश्वनाथ केळकर, पुणें ५०
३ श्रीमंत डॉवेजर राणीसाहेब, कुरुंदवाड (सीनि.) ५०
४ श्री. गं. वा. बोरगावकर, कल्याण १५०
५ विष्णु लक्ष्मण फडके, कल्याण ५०
६ दि. ब. का. रा. गोडबोले, पुणें ५०
७ सौ. कमलाबाईसाहेब किबे, इंदूर २००

## नवीन सभासद

### साधारण

१ श्री. गोविंद गणेश मालशे, पुणें
२ कु. मैनाताई शहाणे, ,,
३ श्री. यशवंत कृष्ण पटवर्धन, ,,
४ श्री. दामोदर नरहर शिखरे, ,,
५ श्री. महादेव विष्णु गोखले, ,,
६ श्री. सोपानदेव नथू चौधरी, नाशिक
७ श्री. शाहू दगडोबा उजगरे, अहमदनगर
८ श्री. शा. ल. साळवी, ,,
९ श्री. गंगाधर रामचंद्र खरे, सागर
१० डॉ. गोविंद गोपाळ बर्वे, मुरार
११ श्री. चिंतामण महादेव टेंबे, ग्वाल्हेर
१२ श्री. दत्तात्रेय गंगाधर पाळंदे, ,,
१३ श्री. गणेश रामचंद्र सोहनी, ,,
१४ श्री. परशुराम श्रीधर आपटे, ,,
१५ श्री. नारायण वासुदेव गोडबोले, ,,
१६ श्री. त्रिंबक कृष्ण दास्ये, सोलापूर
१७ श्री. शंकर नीळकंठ जामदार, ,,

१८ डॉ. वासुदेव काशीनाथ किर्लोस्कर, सोलापूर
१९ श्री. गोविंद परशुराम पटवर्धन, ,,
२० श्री. रंगाचार्य बाळकृष्णाचार्य रड्डी, वार्ड
२१ श्री. बापू वासुदेव देवधर, पुणें
२२ श्री. दत्त रघुनाथ कवठेकर, ,,
२३ श्री नारायण महादेव पटवर्धन, सोलापूर
२४ डॉ. मोतीराम बाळकृष्ण वेलकर, मुंबई
२५ श्री. शांतवन राघवेंद्र नेवासकर, पुणें
२६ श्री. देवदत्त नारायण टिळक, नाशिक
२७ श्री. वासुदेव कृष्ण मेहेंदळे, पुणें
२८ कु. एच्. एम्. लॅबर्ट, ,,
२९ श्री. विष्णु घनश्याम देशपांडे, नागपूर
३० श्री. माधव गोपाळ देशमूख, निङ्गळ
३१ श्री. रघुनाथ विठ्ठल कुलकर्णी, नागपूर
३२ श्री. महादेव दामोदर साठे, मलकापूर
३३ श्री. विष्णु महादेव अत्रे, नागपूर
३४ श्री. नारायणराव जानराव कोकर्डेकर ,,
३५ सौ. शांताबाई अत्रे, ,,
३६ श्री. पुरुषोत्तम यशवंत देशपांडे, ,,
३७ श्री. कृष्ण खंडेराव माणकेश्वर, नागपूर
३८ श्री. पी. बी. तेलंग, ,,
३९ श्री. त्रिंबक यादवराव देव, ,,
४० श्री. विश्वनाथ नारायण थत्ते, ,,
४१ सौ. विमलाबाई देशपांडे, ,,
४२ श्री. पाडुरंग शिवराम बागडदे ,,
४३ श्री. मोहन ज्ञानेश्वर शहाणे, ,,
४४ श्री. केशव माधव वैद्य, ,,
४५ श्री. मोरेश्वर धोंडो हिंगवे, ,,
४६ श्री. गोपाळ कृष्ण किरकिरे, ,,
४७ सौ. यमुनादेवी शहाणे, ,,
४८ सौ. मालतीबाई पेंडसे, ,,
४९ सौ. विमलाबाई बेंहरे, ,,
५० डॉ. लक्ष्मण जानराव कोकर्डेकर, ,,
५१ श्री. भालचंद्र दत्तात्रेय कठाळे, ,,
५२ श्री. बाळकृष्ण रामचंद्र मोडक, ,,
५३ श्री. जगन्नाथ श्रीधर वाघ, पुणें

**तहहयात सभासद**

१ प्रो. शंकर केशव कानेटकर, पुणें

---

# निरोप

म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाशीं आज जवळ जवळ आठ वर्षें असलेला संबंध सोडतांना मला आनंदच होत आहे. प्रकृतीला जसा तोंडपालट तसा संस्थेला हातपालट पथ्यकारकच असतो. निरनिराळ्या पदार्थांत जसे निरनिराळे गुण असतात तसे माणसांमध्येहि असतात; आणि ह्या सर्व गुणांची आवश्यकता संस्थेला असते. उपयुक्ततेचा प्रवाह एकाच पन्हळींतून कधी वाहत नसतो. गेल्या आठ वर्षांत परिषदेने जें नांव मिळविलें व जी प्रसिद्धि संपादन केली त्यांचें बरेंचसें श्रेय तिच्या वारंवार बदलणाऱ्या चिटणिसांकडे आहे. ह्या काळांत एकंदर बारा चिटणीस झाले. त्या सर्वांच्या गुणांचा फायदा परिषदेस मिळाला आहे. मी कार्याध्यक्ष झालों तेव्हा श्री. न. र. फाटक हे एक चिटणीस होते, व त्यांच्या जोडीचे चिटणीस जरी बदलत गेले तरी हे परिषदेची कचेरी मुंबईहून पुण्यास येईपर्यंत तीन वर्षे टिकून राहिले. श्री. फाटक ह्यांच्यांत अनेक गुण आहेत. ते मार्मिक तसेच मर्मभेदी लेखक आहेत. पटाईत लेखक विद्वान क्वचित् असतात; परंतु श्री. फाटक हे करडे लेखक असून शिवाय विद्वान (scholar) आहेत. कोणत्याहि विषयाचा त्यांचा अभ्यास गाढ व परिपूर्ण असतो. त्यांची स्मरणशक्ति अलौकिक असून संभाषणचातुर्य अप्रतिम आहे. ह्यांतच व्यवस्थितपणा व कर्तव्यनिष्ठा—निदान महत्त्वाकांक्षा अथवा ईर्षा—ह्यांची भर पडती तर त्यांच्या उपयुक्ततेंत न्यून पडलें नसतें. तथापि त्यांनी मिळविलेल्या नांवाचा फायदा परिषदेस झाल्यावांचून राहिला नाही.

कचेरी पुण्यास आल्यावर चिटणिशीचीं वर्षे श्री. कृ. पां. कुळकर्णी यांस देण्यांत

आलीं. आतापर्यंत ज्या गुणांची उणीव परिषदेस भासत होती ते सर्व गुण ह्या नवीन चिटणिसांत आढळले. कामाची कळकळ, मनमिळावू स्वभाव, तत्त्वनिष्ठा व विद्वत्ता ह्या चतुरस्त्रांनी परिषदेला नडत असलेली अपकारक प्रतिकूलता भग्न करतां आली.

श्री. कुळकर्णी ह्यांच्या बदलीमुळे चिटणिशीची माळ प्रो. वाडेकर ह्यांच्या गळ्यांत पडली. आजपर्यंत बाह्य विरोधाची आग निवविण्यात खर्ची पडत असलेलें सामर्थ्य आता कचेरीचा जम बसविण्याच्या कामीं लावतां आलें. परिषदेचें दप्तर नमुनेदार ठेवणें, पत्रव्यवहार नियमितपणें व व्यवस्थित रीतीने करणें ह्या गोष्टींकडे आतापर्यंत दुर्लक्ष झालें होतें. प्रो. वाडेकरांच्या अंगच्या गुणांनी ही उणीव भरून आली. वाडेकराचा उत्साह, टापटीप व कामाची हौस ह्यां-मुळे परिषदेचा लौकिक चक्रवाढीने वाढला. वाडेकरानंतर श्री. चिं. ग. कर्वे आले. श्री. कर्वे थंड, अबोले आणि सावध. त्यामुळे वाडेकरांच्या स्वभावजन्य दुर्दम्यतेने घणमणलेल्या परिषदेला हा फेरपालट थोडासा मानवलेला दिसल्यास आश्चर्य नाही. प्रो. वाडेकर ह्यांच्याबरोबर कांही काल काम करीत असलेले श्री. रा. दा. देसाई ह्यांची कामाची तळमळ प्रशंसनीय व एकांतिक तत्त्वनिष्ठा आदरणीय असे. परंतु कोणत्याहि गुणांची अतिरिक्तता प्रसंगीं अव्यवहार्य ठरते. परिषदेविषयी भलभलते ग्रह असतील ते दूर करून प्रचारकार्य करण्यास लायक गृहस्थ म्हणजे राव सा. र. लु. जोशी होत. असो. ह्या सर्व व्यक्तींच्या अनेकविध गुणांनी परिषदेचें बल वाढलें आहे बाहेरगांवीं राहणाऱ्या चिटणिसांकडून विशेष काम होत नाही. नाही तर प्रो. पटवर्धन किंवा प्रो. शंकरराव पेंडसे ह्यांनाहि मनांत भरण्यासारखी कामगिरी करून दाखवितां आली असती.

चिटणिसाशिवाय ज्या दुसऱ्या गृहस्थांचा उपयोग परिषदेस झाला त्यांत प्रो. दत्तोपंत पोतदार, प्रि. धनंजयराव गाडगीळ व रा. गणपतराव जाभेकर ह्यांचीं नावें प्रामुख्याने सांगितलीं पाहिजेत. दत्तोपंत तर परिषदेचे प्राणच होत असें म्हणण्यात यत्किंचितहि अतिशयोक्ति होणार नाही. परिषदेची प्रारंभापासून कुलकथा माहीत असलेले हे एकच गृहस्थ आहेत. त्यांना परिषदेचा जाज्वल्य अभिमान असून समयसूचकतेमुळे सभा जिंकण्यांत त्याचा हातखंडा आहे. सांप्रत दुर्मिळ असलेला गुण म्हणजे निरहंकारिता. हा प्रो. धनंजयराव गाडगिळांत प्रामुख्याने वसत असल्याकारणाने त्यांची विचारशक्ति व ग्राहकबुद्धि निर्मळ राहिली आहे. वादविवादांत ते क्रोधवश न होतां केवळ मुद्देसूदपणाच्या एकाकी आधारावर प्रतिपक्षाला चीत करूं शकतात. परिषदेला त्यांनी ऐन प्रसंगीं सावरून घेतलें आहे. श्री. जाभेकरांचे नाव घेतलें म्हणजे योजना, संघटना आणि यशस्विता हीं मूर्तिमंत डोळ्यांपुढे उभीं राहतात.

सांगण्याचें तात्पर्य असें की, सर्वच गुण एकांत वसत नसल्यामुळे निरनिराळीं माणसें परिषदेंत येणें अवश्य आहे. मात्र ज्या वेळेला ज्या गुणांची आवश्यकता त्या वेळीं तो विशिष्ट गुण असलेला माणूस लाभला पाहिजे.

परिषदेचे अध्यक्ष रावब. माधवराव किबे ह्यांचें सौजन्य व द्रव्याची झीज सोसण्याची तयारी ह्यांना उपमाच नाही असें मला वाटतें. प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें परिषदेच्या पायीं त्यांना बराच चाट लागला आहे.

परिषदेंत माझा प्रवेश केवळ दैववशात् झाला. मुंबईच्या संमेलनांत कै. मोरमकरांच्या सांगण्यावरून मी स्वागतमंडळाचा सभासद झालों. त्या योगाने आपोआप परिषदेचा सभासद बनलों. कार्यकारी मंडळाची निवड चालली असतां प्रो. पोतदार यांनी माझें नांव सुचविलें. पुढे कित्येक महिन्यांनी कार्यकारी मंडळाच्या सभेचें मला निमंत्रण आलें. सहज मी गेलों. रावब. पाध्ये–कार्याध्यक्ष–हजर नसल्यामुळे माझ्यासारख्या पेनशनराला त्या सभेचे अध्यक्ष निवडण्यांत

आलें. पुढे रावब. पाध्यांनी राजीनामा दिला आणि मी तत्स्थानापन्न झालों. ह्या सर्व गोष्टी सहजासहजीं झाल्या. प्रेम उत्पन्न होण्यापूर्वीच मुलांमुलींचें लग्न व्हावें त्यांतलाच हा प्रकार झाला. परंतु हिंदुविवाहसंस्थेंत प्रेमाच्या ऐवजी कर्तव्यालाच मुख्य स्थान दिलें जातें; त्याप्रमाणे गेल्या आठ वर्षांत अंगावर पडलेली जबाबदारी पार पाडणें हें आपलें कर्तव्य समजून मी परिषदेचें कार्य करीत गेलों व त्यांत उक्तानुक्त मित्रांच्या साहाय्याने माझ्या समजुतीप्रमाणे पूर्ण नसलें तरी अंशतः समाधान मानण्याइतकें काम करता आलें ह्यांतच आनंदाचें बीज आहे. आता कोठे कार्यास प्रारंभ झाला आहे. एकंदर कार्याचें क्षेत्र अफाट आहे; तथापि परिषदे-विषयी वाढता उत्साह लोकांमध्ये दिसत आहे. त्यामुळेच उत्कर्षाविषयी खात्री वाटते आणि आनंद होतो. मिळकतीचा धनी हा त्या मिळकतीचा संपादक असतोच असा नियम नाही. तद्वत् लौकिकदृष्ट्या यशाचा धनी कोणी का असेना त्याच्या संपादनाचें श्रेय अध्यक्ष रावब. किबे, कार्यकारी मंडळाचे सभासद व चिटणीस ह्यांच्याकडेच गेलें पाहिजे. ह्या सर्वांची कृतज्ञतापूर्वक मी रजा घेतों.

ना. गो. चापेकर

---

# साभार स्वीकार

(१) **खेळावें कसें ?** (२) **वागावें कसें ?** (३) **अभ्यास,** (४) **निश्चय,** (५) **मनाची मशागत,** (६) **भाग्यपुरुष,** (७) **पुढलें पाऊल,** (८) **गुरु व शिष्य**—लेखक :—प्रो. द. वा. पोतदार; प्रकाशक :— महाराष्ट्र प्रकाशन संस्था, गिरगांव, मुंबई ४.

(९) **बडोदें राज्यदप्तरांतील ऐतिहासिक वेचे** (खंड ३ रा)— Published by Authority, State Records Department ; किंमत १ रु. ३ आ.

(१०) **क्षणचित्रें** — लेखक :— श्री. भ. दि. गांगल, बी. ए.; प्रकाशक :— श्री. द. म. सुतार, अग्यारी रोड, ठाणें; किंमत १ रुपाया.

(११) **मार्क्सवाद** (नवयुगाचें तत्त्वज्ञान)— लेखक :— श्री. स. रं. सुंठणकर, एल्. एल्. बी., धारवाड; प्रकाशक :— श्री. र. वा. जठार, संपादक 'राजहंस', धारवाड; किंमत ८ आणे.

(१२) **श्रीसर्वज्ञ चक्रधर निरुपित दृष्टान्तपाठ** [यादवकालीन मराठींतील गद्य प्रबंध]—संपादक :— श्री. ह. ना. नेने व श्री. नी. ब. भवाळकर, नागपूर; प्रकाशक :— श्री. ह. ना. नेने, एम्. ए., एल्. टी., शिक्षक, पटवर्धन हायस्कूल, नागपूर; किंमत १॥ रु.

(१३) **सावरकरसाहित्य** — लेखक :— बॅ. सावरकर; प्रकाशक :— किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी; किंमत १२ आणे.

(१४) **आजकालच्या थोर विभूति** — लेखक :— श्री. गो. ग. तळवळकर; प्रकाशक :— श्री. गो. ब. जोशी, आनंद मुद्रणालय, सदाशिव पेठ, पुणें; किंमत ८ आणे.

(१५) **शेकऱ्यांचा कैवारी** — लेखक व प्रकाशक :— श्री. रामराव जोतीराव शिंदे, आनंदबाग, देवास राज्य २; किंमत १ रुपाया.

(१६) **शाकुन्तलसौंदर्य** — लेखक व प्रकाशक :— मुंजजी-मइ-खास-बहादूर न. शं. रहाळकर, शंकरभुवन, शीख मोहल्ला, इंदूर; किंमत १ रुपाया.

(१७) **सुखाचा शोध** — लेखक :— प्रो. वि. स. गोगटे, एम्.ए., बहाउदीन कॉलेज, जुनागड; प्रकाशक :— श्री. त्र्यं. श्री. फडके, बी. एस्सी., जमखंडी; किंमत १॥ रु.

# संपादकीय निवेदन

गेल्या वर्षी कार्यकारी मंडळाने 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या संपादनाचा भार माझ्या अंगावर टाकला तेव्हा तो मी मोठ्या कष्टानेच घेतला. हें काम करायला मला फारसा वेळ नव्हता; आणि पत्रिका हा एक टीकेचा मोठा विषय होऊन बसला होता. पत्रिकेंत विविध साहित्यिक प्रश्नांची सखोल चर्चाहि नाही आणि लालित्याच्या रंजकतेची छटाहि नाही अशी सुकर हाकाटी ठिकठिकाणांहून ऐकूं येत होती. समय असा बिकट होता आणि काम किचकट होतें तरी भरप्रसंगीं माघार घेणें शक्य नव्हतें.

'पत्रिका' हें साहित्यिक तत्त्वचर्चेचें आणि संशोधनाचें क्षेत्र असावें असें मीं स्वतःशीं ठरविलें. केवळ लालित्याला इतरत्र भरपूर वाव आहे. लिखाण चर्चात्मक आणि संशोधनात्मक असून मनोरंजक झालें तर दुधात साखर पडली. परंतु केवळ साखर पेरायची नाही. याप्रमाणे मीं धोरण ठरविलें तरी संपादकाने कांही स्वतःच्या लेखांनीच अंक भरून काढायचे नाहीत. पुन्हा माझ्यासारख्या प्रचारकलेखकाने पत्रिकेचा उपयोग स्वमतप्रचारार्थ करणें युक्त नाही. म्हणूनच इतरांच्या आग्रहाला न गाठता, साहित्यसंमेलन हें परिषत्कार्य आहे तरीहि, माझें अध्यक्षीय भाषण मीं एकीकडे सारलें. विविध विषयांवर मनोरंजक लेख संपादकाकडे येऊन पडत असून तो हेकटपणाने एकमार्गी नीरस अंक काढता तर तो अवश्यमेव संपादकाचा दोष झाला असता. परंतु तशी स्थिति नाही. ठिकठिकाणच्या विद्वानांना त्याने विनंतिपत्रें लिहिलीं पाहिजेत याविषयीं वाद नाही. पण अशीं पत्रें पाठवूनहि विद्वान लेखक आपआपल्या स्थानीं स्वस्थ राहतात तेव्हा संपादकाची स्थिति मोठी केविलवाणी होते. साहित्यपरिषदेच्या सदस्यांनी संपादकीय विनंतीची अपेक्षा कशाला करावी ? घरचेंच कार्य आहे तेव्हा स्वयंसेवकाची वृत्ति कां ठेवूं नये ? परंतु विशेष खेदाची गोष्ट अशी की, परिषदेवर आणि पत्रिकेवर तोंडसुख घेणाऱ्या एका विद्वानांना मीं विनंतिपत्रें पाठविलीं असतांना लेख पाठविणें त्यांना सोयींचें वाटलें नाही ! अशा स्थितींत संपादकाच्या हाकेसरशी धावून ज्यांनी लेखनसाह्य केलें त्यांनी व्यक्तिशः संपादकावरच उपकार केले असें त्याला वाटल्यास आश्चर्य नाही. संपादक यापुढे पालटला तरी या सहायकांनी पत्रिकेवर पूर्ववत् प्रेम करावें अशी माझी त्यांना कळकळीची विनंती आहे.

पत्रिकेकडे अभिप्रायपरीक्षणासाठीं अनेक पुस्तकें येतात. परंतु अधिकारी समीक्षकांकडून निर्भीड आणि समतोल परीक्षणें आणविणें हें कार्य लेखकांना वाटतें तितकें सोपें नाही. कोणाला खरोखरीच वेळ नसतो; कोणाला तो होत नाही. कोणाला भीड मोडवत नाही, तर कोणाला तोल सावरत नाही. एकूण काय तर अभिप्रायसमीक्षणाचें कार्य मुळीच मनासारखें होत नाही. याचा विषाद मला वाटतो; पण यावर उपाय करणें माझ्या हातीं नसून तें समीक्षक विद्वानांकडे आहे.

संपादकाचें कार्य माझ्या हातून एक वर्षभरच झालें आहे. परिषदेच्या घटनेंत फेरफार होऊन आता नव्या निवडणुकी होत आहेत. परिषदेच्या अधिकारी व्यक्तींवर 'मिरासदारी'चा आरोप करण्यांत येत असल्याने संपादकाच्याच नव्हे तर कोणत्याहि अधिकाराच्या स्थानासाठी उभें राहावयाचें नाही असें मीं ठरविलें असल्याने मी पत्रिकेच्या लेखकवाचकांचा हा निरोप घेत आहें. मी संपादकीय काम कोल्हापुरास राहून करूं शकलों त्याप्रमाणे नागपुराहूनहि करतां येईल; कोणीहि संपादक निवडून आला तरी परिषत्कार्य म्हणून माझें त्याच्याशीं सहकार्यच होईल; भाऊबंदकी होणार नाही. माझ्या संपादकीय कामांत कार्यकारी मंडळांतील माझ्या सहकाऱ्यांनी आपल्या नांवाप्रमाणे चांगलें सहकार्य जें केलें त्याचें फळ म्हणजे या वर्षी अंक वेळेवर निघूं शकले. त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

हें सारस्वताचें गोड । तुम्हींचि लाविलें जी झाड ।
तरी अवधानामृतें वाड । सिंपौनी कीजो ॥
मग हें रसभावफुलीं फुलेल । नानार्थ फळभारें फळा येईल ।
तुमचेनि धर्में होईल । सुकाळ जगा ॥—ज्ञानेश्वर

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष १० वें] [अंक २

## अनुक्रमणिका

# व्याकरणपरिषदेंत स्वागताध्यक्ष श्री. नारायण गोविंद चापेकर यांनी केलेलें भाषण

मराठीचा आद्य व्याकरणकार कोण यासंबंधाने काही वर्षांपूर्वी मासिकांतून व वर्तमानपत्रांतून चर्चा चालू होती. अशा स्वरूपाच्या वादांत सर्वांना सम्मत होईल असा अभिप्राय कोणालाहि देतां येईल असें मला वाटत नाही. निरनिराळ्या स्थळीं निरनिराळ्या हेतूंनी निरनिराळे प्रयत्न कमी अधिक प्रमाणांत एकाच वेळीं अथवा आगेमागे चालू असतात. याच कारणास्तव आद्य ग्रंथत्वाचें श्रेय निश्चित करणें सोपें नाही. तथापि वर उल्लेख केलेल्या चर्चेचा समारोप 'विविधज्ञानविस्तारा'त जो केलेला आहे त्यांत प्रतिपादिलेलीं मतें मला आजहि मान्य आहेत. त्यावरून आद्य व्याकरणकार म्हणून गंगाधरशास्त्री फडके यानाच मान मिळणें योग्य आहे असें मला वाटतें. बाळशास्त्री जांभेकर याचें एक व्याकरण होतें असें म्हणतात. त्याचप्रमाणे पुष्कळशा शास्त्र्यांनी मिळून शाळेंत मुलांस शिकवण्याकरता हस्तलिखित व्याकरण तयार केलें होतें असें ऐकिवात आहे. परंतु हीं सर्व व्याकरणें प्रसिद्ध झालीं नसल्यामुळे तीं विचारांत घेणें अशक्य आहे.

हें जरी खरें असलें तथापि विस्तृत व पूर्ण अशी मराठी व्याकरणाची रचना दादोबांनीच केली यांत कांही शंका नाही; आणि म्हणून दादोबा हेच मराठीचे पहिले व्याकरणकार असें समजून त्यांनाच नमन करणें योग्य होईल.

आज मराठीच्या व्याकरणाचा शतसांवत्सरिक उत्सव साजरा करण्यास आपण जमलों आहों. अशा वेळीं गेल्या शतकांत ह्या विषयाची कसकशी प्रगति होत आली ह्याचा आढावा थोडक्यांत आपल्यापुढे मांडण्याचें योजिलें आहे. हें वर्ष मराठीच्या व्याकरणाच्या उत्सवाचें आहे असें मानणें म्हणजेच दादोबांस मराठीचे यशस्वी व्याकरणकार समजून त्यांस अग्रपूजेचा मान देणें होय हें उघड आहे.

दादोबांच्या व्याकरणाची पहिली आवृत्ति १८३६ सालीं प्रसिद्ध झाली. त्या वेळीं त्यांचें वय बावीसहि पुरें नव्हतें. सरकारने त्यांस चांगलाच आश्रय दिल्यामुळे त्याना इ. स. १८८१ पर्यंत कित्येक आवृत्त्या काढतां आल्या. सरकारी आश्रयाचें भाग्य त्याच्याइतकें फारच थोड्या व्याकरणकारांना मिळालें आहे! पहिल्या आवृत्तीनंतर ८।९ वर्षांनीच म्हणजे इ. स. १८४५ सालीं 'बोर्ड ऑफ् एज्यू.' सभेने सांगितल्यामुळे आपल्या ग्रंथाची सुधारलेली आवृत्ति त्यांनी काढली. ह्या दुसऱ्या आवृत्तींत पहिलीपेक्षा पुष्कळ अधिक मजकूर त्यांनी घातला; किंबहुना हें नवेंच पुस्तक आपण लिहिलें असेंच त्यांनी म्हटलें आहे. त्यानंतर बऱ्याच वर्षांनी कृष्णशास्त्र्यांचे मराठी व्याकरणावरील टीकात्मक निबंध प्रसिद्ध झाल्यावर आपल्या ग्रंथाची आणखी सुधारणा करण्याची त्यास इच्छा झाली (सन १८८१); परंतु फारसा फेरफार न करितां लवकर आवृत्ति काढण्यास सरकारने फर्माविल्यामुळे त्यास त्यात सुधारणा करता आली नाही; म्हणून त्यांनी 'पूरणिका' ह्या नांवाचा ग्रंथ लिहून बऱ्याच वर्षांचे आपले मननपूर्वक केलेलें विचार विषयवार त्यांत प्रगट केले आहेत. ही सुमारें २०० पृष्ठांची पूरणिका संपवितांना त्यांनी काढलेले उद्गार असे आहेत—"इ. स. १८३६ त जेव्हां मीं आपल्या व्याकरणाची

विरळ लिहिलेल्या १९२ पृष्ठांची पहिली आवृत्ति शिळाछापावर छापवून प्रसिद्ध केली तेव्हा तिच्या परिसमाप्तींत जो श्लोक लिहिला होता तोच आता ४५ वर्षे गेल्यावर त्याच व्याकरणाच्या सुमारें दसपट ग्रंथ माझ्या हातून त्याच ईशकृपेने वाढला असतांहि......त्याच श्लोकाचें स्मरण होतें." ह्यावरून त्यांनी आपल्या ग्रंथाची सुधारणा किती केली हें आपणांस दिसतें.

दादोबांच्या व्याकरणानतर इ. स. १८६७ साली कृष्णशास्त्री गोडबोले यांनी 'मराठी भाषेचें नवें व्याकरण' हा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ म्याट्रिक्युलेशन परिक्षेची तयारी करण्यास व मराठी कविता वाचतांना विद्यार्थ्यांस ज्या अडचणी येतात त्यांतून कांही दूर करण्यास उपयोग व्हावा, ह्या हेतूने लिहिलेला असून संस्कृत व प्राकृत भाषांशीं तिचें साम्य आणि प्राकृत भाषेचें संक्षिप्त व्याकरण व कोश ह्याचाहि समावेश ह्यात होता. ह्या ग्रंथकारासहि सरकारचा आश्रय मिळून त्याची दुसरी आवृत्ति काढण्याचा योग ६।७ वर्षांनीच आला. तेव्हा यांनीहि आपल्या ग्रंथात बरीच वाढ व सुधारणाहि केली. "पहिल्या आवृत्तींत नुसता शब्दविचार होता, पण दुसऱ्या आवृत्तींत मित्रांच्या व सरकारच्या सागण्यावरून वाक्यविचार व पद्यविचार कांहीशा नवीन आणि उपयुक्त पद्धतीवर रचून जोडले आहेत" असें ग्रंथकारांनी लिहिलें आहे. तसेंच ह्यांनी आपल्या ग्रंथाचें हस्तलिखित शास्त्रीबोवांना दाखविलेलें होतें हेहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे. यांच्या नवीन व्याकरणाने संस्कृत व फार्सी भाषाचा प्रकाश मराठीवर पाडून मराठींतील संस्कृत व फार्सी शब्दांची व्युत्पत्ति विशद केली आहे. संयुक्त काळाविषयी होईल तितकी समाधानकारक व्यवस्था करण्याचा यशस्वी प्रयत्न यांनी केला आहे. शिवाय वाक्यमीमांसेचाहि प्रयत्न त्यांनी केला होता.

या दोन वैयाकरणांच्या ग्रंथांनंतर कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर-ज्यांस त्या काळीं बृहस्पति मानण्यांत येई-त्यांनी व्याकरणावरील आपले सुप्रसिद्ध निबंध लिहिले. हे निबंध प्रथम ट्रे. कॉलेजांत शिकवले गेले व शाळापत्रकात प्रसिद्ध झाले; यामुळे व्याकरणाचा पद्धतशीर अभ्यास करण्यास पुष्कळ उत्तेजन मिळालें व विचारविनिमयहि पुष्कळ झाला. हे निबंध 'बोधवृत्युत्पादक' व जागोजाग सूचक आहेत ह्यात संशय नाही.

दादोबानी आपल्या ग्रंथाची रचना इंग्रजी व्याकरणग्रंथ पुढे ठेवून केली होती तरी मराठींत वाक्यपृथक्करण हा विषय त्यांनी आणिला नव्हता. कृष्णशास्त्री गोडबोले यांनी या विषयाकडे कांहीसें लक्ष दिलें हें वर सांगितलेंच, परंतु मराठी व्याकरणाला वाक्यपृथक्करणाची जोड कै. आगरकर यांच्याकडून मिळाली ही समाधानाची गोष्ट होय. वाक्यमीमांसा हा छोटासा ग्रंथ अत्युत्तम आहे असाच विद्वानांचा अभिप्राय आहे. परंतु ह्या ग्रंथाकडे जावें तितकें लक्ष कोणाचें गेलें नाही, व ज्याचें गेलें त्यांना त्याचें महत्त्व समजलें नाही. प्रो. दामले यांनी या ग्रंथाला धरूनच हा विषय पुढे लिहिला आहे.

वाक्यमीमांसा हा ग्रंथ इ. स. १८८८ मध्ये प्रसिद्ध झाल्यानंतर लौकरच रा. रा. मि. जोशी यांनी आपलें 'प्रौढबोध व्याकरण' लिहिलें. यांनी चिपळूणकरांच्या बऱ्याच सूचना स्वीकारून त्या अंमलांत आणण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु कांही ठिकाणीं व विशेषतः वाक्यमीमांसेत जी नसती उलथापालथ त्यांनी केली तीमुळे व्याकरणाचें पाऊल बिलकूल पुढे पडलें नाही असें नाइलाजाने म्हणावें लागतें.

इ. स. १८९६ च्या सुमारास 'मध्यम व्याकरण' ह्या नावाचें एक पुस्तक प्रसिद्ध झालें असें म्हणतात; परंतु त्याचा प्रसार झाल्याचें आढळांत नाही.

याच सुमारास खेर यांनी स्कू. फायनलच्या विद्यार्थ्यांसाठी एक व्याकरण इंग्रजींतून

लिहिलें. व्याकरणविषयास शास्त्रीय स्वरूप देण्याचा यांनी बराच प्रयत्न केला आहे. यांच्या पुस्तकाचा उपयोग पुष्कळांना झाला आहे हें सांगणें जरूर आहे.

यानंतरचा मराठी व्याकरणास व वैयाकरणांसहि उपयुक्त असा ग्रंथ म्हटला म्हणजे विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांचा ज्ञानेश्वरींतील मराठीचें व्याकरण हा होय. मराठी व्याकरणाचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार करण्याच्या कामीं या ग्रंथाचा मोठा उपयोग आहे. ह्या ग्रंथाचें महत्त्व त्याच वेळीं 'केसरी' वर्तमानपत्रद्वारा जाहीर झालेंच होतें. उपसंहार करतांना राजवाडे लिहितात— "येणेंप्रमाणे (१) वर्णेतिहास, (२) शब्दविभक्तिप्रत्ययेतिहास, (३) क्रियाविभक्तिप्रत्ययेतिहास, व (४) निपातेतिहास असे चार भाग येथपर्यंत संपले. त्यांत ज्ञानेश्वरी मराठी भाषेचा सांगाडा ज्या शिरांनी, स्नायूंनी व धमन्यांनी व मांसपेशींनी ताणून धरिला व आच्छादिला आहे त्यांचा मागमूस व पूर्वस्वरूप अपभ्रंशात व महाराष्ट्रींत व संस्कृतात कसें होतें तें दाखविलें आहे. त्यावरून असें दिसतें की, ज्ञानेश्वरी मराठीपर्यंत सर्व बाबींची परंपरा अव्याहत लागली आहे. कित्येक वैदिक बाबी संस्कृतांत गळाल्या, कित्येक संस्कृत बाबी महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत नाहीशा झाल्या व कित्येक महाराष्ट्रीय बाबी ज्ञानेश्वरी मराठींत लुप्त झाल्या. परंतु कोणत्या बाबी कोठे लुप्त झाल्या हें आता नक्की कळलें; शंकेला जागा राहिली नाही. वर्ण, शब्द, धातु व निपात यांतील अशी एकहि बाब राहिली नाही की जिचें मूळ दाखविलें गेलें नाहीं."

हा उतारा लांब झाला खरा परंतु ह्यावरून लेखकाचा आत्मविश्वास व प्रयत्न यांची चांगली कल्पना येऊन मराठीच्या प्रचलित व्याकरणकारांनी काय केलें पाहिजे याचाहि बोध होतो.

दादोबा व कृष्णशास्त्री गोडबोले त्यांच्या ग्रंथानंतर मराठीच्या व्याकरणांत क्रांतिकारक स्वरूपाच्या सुधारणा प्रत्यक्ष कृतींत आणणारा असा ग्रंथराज प्रो. दामले यांचा 'शास्त्रीय मराठी व्याकरण' हा होय. हा सन १९११ त प्रसिद्ध झाला. हा ग्रंथ सुमारें एक हजार पृष्ठांचा असून, यांत मागील ग्रंथकारांच्या चुकीच्या मतांचें खंडन व स्वतःच्या मतांचें मंडण जोरदार व स्पष्ट भाषेंत केलें आहे. चिपळूणकरांच्या निबंधांत नुसत्या टीकेवर भर अधिक होता तसा या ग्रंथांत नाही; तर नवीन योजना आधी व मग टीका अशी योजना यांत आहे व हेंच या ग्रंथाचें वैशिष्ट्य होय. वाक्यपृथक्करण ह्या विषयाची योग्य अशी जोड ह्यांनी मराठीच्या व्याकरणाला दिली आहे हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. आणखीहि पुष्कळ बारीकसारीक बाबींचा विचार फारच बारकाव्याने केला असून तो बहुतेक सर्वांना मान्य होण्यासारखा आहे. विभक्ति, काळ, क्रियापद, सं. क्रियापद, प्रयोग इ. इ. बाबींतले यांचे विचार निःसंशय मननीय आहेत. अशा या ग्रंथाचा प्रसार व अभ्यास आपल्या इकडे फारसा झाला नाही ही मात्र न सांगण्यासारखी गोष्ट आहे ! मध्यप्रांतांत मात्र यांच्या ग्रंथाला धरून रा. भावे व कुळकर्णी ह्या दोन विद्वानांनी आपलीं शालेपयोगी पुस्तकें लिहिलीं आहेत.

असो. या मोठ्या ग्रंथानंतर मात्र अद्यापपावतो मराठीच्या व्याकरणावर सांगण्यासारखा ग्रंथ झाला नाही ही आश्चर्य वाटण्याजोगी गोष्ट आहे. ग्रंथ जरी झाला नाही तरी प्राथमिक शाळांतून व्याकरणविषयाची हेळसांड होते ती होऊं नये, मतें आणि मतांतरें यांचे घोटाळे त्यांच्यापुढे न आणतां त्यांना निश्चित व नियमित असें ज्ञान द्यावें हा हेतु साध्य होण्याकरिता योजना तयार करण्यासाठी शिक्षणखात्याकडून एक कमिटी नेमली गेली. कमिटीने १९२६ च्या सप्टेंबरमध्ये कामाला सुरवात केली व दोन वर्षांनी तिने आपलें काम संपविलें. व्याकरणाचीं चालू पुस्तकें वाचून व हा विषय शिकविण्याचे हेतु व पद्धति यांत शिक्षणशास्त्राच्या प्रगती-

बरोबर झालेले फरक लक्षांत घेऊन कमिटीने या विषयाची योजना लोकांपुढे मांडली, त्यांत दुरुस्त्या मागविल्या, मोठमोठ्या खंद्या लेखकांकडे योजना पाठवून त्यांचीं मतें घेतलीं व मग आपली योजना निश्चित केली व सरकारने ती अंमलांतहि आणली आहे. अर्थात् हा अभ्यासक्रम विशिष्ट मर्यादेंतला असला तरी विद्वानांच्या मतांचा वारा कोणत्या दिशेने वाहत आहे हें समजण्यास या कमिटीच्या अभ्यासक्रमाचा बहुत उपयोग आहे.

यानंतर 'मराठी भाषा, उद्गम व विकास' ह्या नांवाचा ग्रंथ श्री. कृ. पां कुळकर्णी यांनी लिहिला आहे. त्यात मराठीच्या व्याकरणावर ६० पृष्ठें खर्ची घातलीं असून तीं विचारणीय अशींच झालीं आहेत. पूर्ववैयाकरणांच्या मताचा परामर्श घेऊन स्वतःचीं मतेंहि स्पष्टपणें त्यांनी सांगितलीं आहेत म्हणून त्याचें महत्त्व अधिक आहे.

मराठी व्याकरणांतले वादग्रस्त प्रश्न मिटविण्याच्या दृष्टीने शेवटचा झालेला प्रयत्न म्हणजे साहित्यपरिषदेने नेमलेली व्याकरणसमिति हा होय. या समितीने एक प्रश्नपत्रिका तयार करून ती पुष्कळ विद्वानांकडे पाठवून नंतर आपला निर्णय नुकताच प्रसिद्ध केला आहे. शुद्धलेखनमंडळाच्या निर्णयाला जसा जनतेचा व सरकारचाहि पाठिंबा मिळूं लागला आहे तसाच या कमिटीच्या निर्णयाला मिळावा अशी अपेक्षा आहे.

याप्रमाणे गेल्या शतकांतील अगदी प्रमुख प्रमुख ग्रंथकारांच्या ग्रंथांचा व निर्णयांचा परामर्श घेतल्यावर मराठी व्याकरणावर इंग्रजींत लिहिलेल्या नवलकर व Bloch ह्यांच्या व्याकरणांचा उल्लेख करणें प्राप्त आहे. राजवाडे यांनी व्याकरणावरील आपल्या प्रबंधांत इतिहासाबरोबर कल्पनेवरहि भर दिला आहे. पण फ्रेंच व्याकरणकार Bloch याचें विवरण सर्वस्वीं ऐतिहासिक पायावर केलेलें आहे. आता पुन्हा एकदा विषयविकासाच्या दृष्टीने मराठीच्या व्याकरणांत कसकशी भर पडत गेली हें पाहूंया.

## वर्णविचार वगैरे

वर्ण, स्वर, व्यंजनें, त्यांचे उच्चार, स्थानें इत्यादि बाबतींत पुष्कळ ऊहापोह झाला आहे व अजूनहि होणार नाही असें म्हणतां येत नाही. परंतु ह्या बाबतींत पुष्कळशा गोष्टी संस्कृत वैयाकरणांनी निश्चित केल्या आहेत त्याच मानणें भाग आहे. अगदी थोडया बाबतींत मराठीमध्ये वेगळेपणा करावा लागेल. उदाहरणार्थ, दीर्घ ॠ व ऌ मराठींत नाहीत असें आतापर्यंतच्या व्याकरणकारांनी म्हटलें आहे. बाकीचे बारा स्वर मराठींत आहेत असें आतापर्यंत मानण्यांत येत आहे. पण नुकतेंच एका विद्वान वैयाकरणाने असें प्रतिपादिलें आहे की, ऱ्हस्व ऌ हा स्वरहि मराठींत गाळावा. कॢप्ति या एखाद्या शब्दाकरिता मराठींत ऌ हा स्वर मानण्यापेक्षा 'कॢप्ति' या शब्दाचा उच्चार 'क्लिप्ति' असा करावा म्हणजे झालें.

अनुस्वार व विसर्ग यांचा समावेश स्वरांत करावा का व्यंजनांत करावा याबद्दलचा निर्णय शास्त्रीय व्याकरणकारांनी दिला आहे तोच मान्य होण्यासारखा आहे. व्याकरणसमितीचा निर्णयहि तशाच स्वरूपाचा आहे.

## शब्दांच्या जाति

दादोबांनी प्रथमावृत्तींत शब्दांच्या जाति नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद व अव्यय अशा पांच मानिल्या होत्या. पण पुढे १८४५ त सुधारलेल्या आवृत्तींत, प्रथम शब्दांचे सविभक्तिक व अविभक्तिक असे दोन वर्ग करून सविभक्तिकांत चार व अविभक्तिकांत चार अशा आठ जाति सांगितल्या आहेत. कै. गोडबोले यांनी आपल्या १८६७च्या दुसऱ्या आवृत्तींत शब्दांचे

वर्ग सहा दिसतात असें लिहिलें आहे. नामें, विशेषणें, क्रियाविशेषणें, क्रियापदें, शब्दयोगी अव्ययें व उभयान्वयी अव्ययें हे ते सहा वर्ग होत. क्रियाविशेषणें हा वेगळा वर्ग पूर्वी व नंतर कोणीं केलेला नाही.

जाति किती असाव्या यासंबंधाने कै. आगरकरांनी आपल्या **'वाक्यमीमांसा'** या ग्रंथांत म्हटलें आहे की, "पाहिजे तेवढी हातचलाखी केली तरी या सात जातींपैकी कोणत्याहि जातींत पडणारा शब्द त्याच अर्थाने दुसऱ्या कोणत्याहि जातींत घालता येणार नाही. तसेंच ज्याला या सात जातींपैकी एका जातींत घालतां येणार नाही असाहि शब्द भाषेंत सांपडावयाचा नाही. यावरून हा सप्तसंख्यात्मक जातिविभाग आवश्यक आहे व पूर्णहि आहे असें मानिलें पाहिजे." यानंतर प्रो. दामले यांनी या सर्व मतांचा उल्लेख करून निष्कर्ष काढला की, "कोणत्याहि भाषेतील एकंदर शब्दांच्या नाम, सर्वनाम, विशेषण, धातु किंवा क्रिया, क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी आणि केवलप्रयोगी या आठ जाति आहेत हा सिद्धांत भाषाशास्त्रामध्ये आता अगदी सर्वमान्य झाला आहे.

शब्दांच्या वर्गीकरणाच्या बाबतींत व्याकरणसमितीने दिलेला निर्णय पुढीलप्रमाणे असून तो मान्य होण्यासारखा आहे. 'सविभक्तिक आणि अविभक्तिक यांबद्दल पुढे सविकारी व अविकारी अशा संज्ञा योजण्यांत आल्या होत्या. पण आता समितीने सव्यय व अव्यय अशा अधिक सुटसुटित संज्ञा योजिल्या आहेत.'

### लिंगविचार

सव्यय शब्दांना जे विकार होतात त्यापैकी लिंग हा एक आहे. या बाबतींत मराठीचें वैशिष्ट्य आहे. स्त्रीपुरुषभेदावरून लिंग ही बाब व्याकरणांत आलेली आहे; अर्थात् प्राणिवाचक शब्दांचें लिंग ठरविणें सोपें आहे. पुरुषजातीच्या शब्दाचें पुंलिंग व स्त्रीजातीच्य शब्दांचें स्त्रीलिंग. अर्थात् निर्जीव वस्तूंच्या वाचक शब्दांचें लिंग नपुंसक असें सामान्यतः सर्व भाषांच्या व्याकरणांत मानितात. परंतु मराठीने हा नियम पाळलेला नाही. निर्जीव वस्तूंच्या वाचक शब्दांना पुंलिंग, स्त्रीलिंग इ. लिंगें दिलेलीं आहेत. यासंबंधी नियम बसविण्याचा यत्न दादोबांनीं केला होता. परंतु तो निष्फळच ठरलेला असून लोकव्यवहार हेंच अशा शब्दांचें लिंग ठरविण्याचें साधन हें पुढील व्याकरणकारासहि मान्य झालें आहे. दादोबांनी सामान्यलिंग असा एक भेद कल्पिला होता. परंतु तो कोणालाच पटलेला नाही.

### विभक्तिविचार

लिंगप्रकरणाच्या पुढचें वादाचें स्थळ विभक्ति हें आहे. या बाबतींत फारच मतवैचित्र्य असून तें कमी होत नाही ही आश्चर्याची गोष्ट आहे. दादोबांनी संस्कृताशीं संबंध राखण्याच्या इच्छेने संस्कृतांतल्याप्रमाणे संबोधनासह आठ विभक्ति मानिल्या. नंतर थोरल्या शास्त्रीबोवांनी द्वितीया व षष्ठी गाळाव्या असें सुचविलें. गोडबोले यांनी मराठींत सप्तमी कांही नामांस मात्र होते म्हणून "मराठींत वास्तविक म्हटलें तर पांचच विभक्ति आहेत" असें म्हटलें आहे. आगरकरांनी मराठींत द्वितियेच्या जागीं चतुर्थी येते असें म्हणून लगेच द्वितीया ठेवणें अवश्य वाटल्यास हरएक प्रकारच्या कर्माच्या विभक्तीस द्वितीया म्हणावें हें बरें असेंहि म्हटलें आहे ! पुन्हा श्री. रा. मि. जोशी, प्रौढबोध व्याकरणांचे कर्ते, यांनी आठ विभक्ति मानाव्या असें ठरविलें व सप्रत्यय व अप्रत्यय द्वितीया असाहि भेद द्वितीयेचा केला ! शास्त्रीय व्याकरणकारांनी फक्त द्वितीया गाळली आहे, व द्वितीयेचें काम प्रथमा व चतुर्थी करितात असें ठरविलें. द्वितीया गाळावी असें ज्ञानेश्वरी व्याकरणकारांचेंहि मत आहे. ते म्हणतात—स, ला, तें हे द्वितीयेचे

प्रत्यय मानणें अनैतिहासिक आहे. दादोबाने आपलें व्याकरण इंग्रजी व्याकणावरून रचिलें आहे. संस्कृत, महाराष्ट्री व अपभ्रंश ह्यांच्या व्याकरणावरूनच मराठी व्याकरण रचिलें पाहिजे. श्री. कुळकर्णी यांनी अगदी अलीकडे म्हणजे १९३३ सालीं असें मत प्रदर्शित केलें आहे की, "वाक्यांत एखाद्या शब्दाचा क्रियापदाशीं 'कर्म'कारकाचा संबंध असला की तो शब्द द्वितीया विभक्तींतच असला पाहिजे. मग त्याला प्रत्यय लागो किंवा न लागो." ह्या त्याच्या मताने प्रत्ययावरून विभक्ति मानाव्या की कारकावरून मानाव्या हाच वाद पुन्हा उत्पन्न केला आहे असेंच म्हणावें लागतें.

व्याकरणसमितीलासुद्धा या बाबतींत निराळीच सूचना करावयाची होती असें दिसतें. परंतु पूर्ववैयाकरणांच्या मताला मान देण्यासाठी किंवा लोकांना अवघड वाटूं नये म्हणून द्वितीया गाळावी किंवा दादोबांचीच व्यवस्था ठेवावी असा निर्णय लागला आहे.

विभक्ति किती या वादांपैकी षष्ठी ही कारकविभक्ति आहे कीं नाही हाहि एक मोठा वाद आहे. परंतु या बाबतींत ती केव्हा केव्हा कारकविभक्ति आहे हें मान्य झालें आहे.

## आख्यातविचार

विभक्तीप्रमाणेच दुसरा महत्त्वाचा प्रश्न आख्यातासंबंधीचा आहे. दादोबांनी आख्यातांची व्यवस्था इंग्रजीचें अनुकरण करून केली. वास्तविक त्यांनी ती संस्कृत व प्राकृत भाषांचा संबंध पाहून करावयास पाहिजे होती हें कृष्णशास्त्री यांनी आपल्या टीकात्मक निबंधांत चांगलें दर्शविलें आहे. या बाबतींत चिपळूणकरापेक्षा गोडबोले यांनी केलेली व्यवस्था बरीच निर्दोष आहे. त्यानंतर रा. जोशी यांनी व्यवस्था करण्याचा आव घातला परंतु तो त्यांस साधला नाही संयुक्त क्रियापदांच्या बाबतींत त्यांनी स्वीकारलेली विचारसरणी मान्य होण्यासारखी नाही. आख्यातव्यवस्थेसंबंधी अगदी नवीन अशी योजना कै. दामले यांनीच सुचविली आहे. विभक्तींना जशीं अर्थहीन नांवें दिलीं आहेत तशींच अर्थहीन नावें आख्यातांना द्यावीं हा त्यांचा महत्त्वाचा मुद्दा आहे. संयुक्त काळांच्या नांवांसंबंधी विवेचन करून तीं नांवें देण्यांत कशी हास्यास्पदता उत्पन्न झाली आहे हें मोठ्या कुशलतेने त्यांनी विशद केलें आहे. ही त्यांची योजना रा. ना. वि. आपटे यांनी स्वीकारलेली दिसते. अगदी नवीं म्हणजे प्रथमाख्यात, द्वितीयाख्यात इ. इ. नच रुचतील तर ताख्यात, वाख्यात असें तरी म्हणावें असेंहि त्यांचें मत आहे.

आख्यातांना नवीं नावें देणें व प्रातिपादिकांप्रमाणे त्यांचें व्याकरण सांगणें ह्या गोष्टी मान्य करण्यासारख्या नाहीत. कारण बरेच दिवस चालत आलेली रूढि मोडणें बहुतेकांना नको आहे. व्याकरण समितीनें ह्या बाबतींत दिलेला निर्णयहि रूढीला चिकटून राहण्याच्या स्वरूपाचा आहे.

## संयुक्त क्रियापदें

संयुक्त क्रियापदें मुळीच मानूं नयेत, मानावयाचीं तर कांही नियमित मानावीं, व मानावयाचीं तर त्यांना मर्यादा न घालतां जेथे इष्टार्थाकरिता मानणें भाग पडेल तेथे तीं मानावीं, मग त्यांची संख्या केवढीहि होवो, तिला भिऊं नये, अशीं मतें या बाबतींतहि आहेत. परंतु आवश्यक तेथे तीं मानावीं हाच पक्ष टिकून राहिला आहे. नको म्हणणारांपैकी कांहींच्या मतें 'संयुक्त क्रियापद' ही संज्ञाच बरोबर नाही, परंतु संयुक्त क्रियापद म्हणजे ज्यामध्ये दोन क्रियापदांचा संयोग झाला आहे तें क्रियापद असा भलता अर्थ करण्याचें कारण नाहीं; तर संयुक्त क्रियापद म्हणजे ज्या पदांत धातु संयुक्त असतो किंवा दोन अथवा अधिक धातु

यांच्या संयोगाने जें क्रियापद तयार होतें तें संयुक्त क्रियापद होय असा अर्थ करावा. ह्या संयुक्त धातूंपैकी एक धातु मुख्य असून एक किंवा अधिक सहाय धातु असतात.

संयुक्त क्रियापदें मानावीं असें ठरल्यावर त्याच्यापुढचा प्रश्न त्या क्रियापदांत धातु कोणता सांगावा हा आहे. ह्या बाबतींतहि शास्त्रीय व्याकरणकारांनी नवीन व्यवस्था सुचवली आहे :—

बसत होता, बसणार आहे, बसलें पाहिजे इ. ठिकाणीं पूर्वीच्या पद्धतीप्रमाणे कृदन्तांतील धातु मानण्यांत येतो; करून टाक, लिहितां येतें, करूं शकला इत्यादि स्थळीं नुसते कर, लिह हे धातु मानणें अर्थदृष्ट्या प्रशस्त नाही. आणि लिहूं दिलें, जाऊं दिलें, जेवूं घातलें या ठिकाणीं तर लिह, जा, जेव हे एकाकी धातु मानणें चुकीचें होय, कारण की, या ठिकाणीं कृदन्तांतील धातु व आख्यातरूपातील धातु ह्यांचे कर्ते भिन्न भिन्न आहेत. तेव्हा या ठिकाणीं लिहूं दे, जाऊं दे, जेवूं घाल असे कृदन्तयुक्त संयुक्त धातु मानणें अवश्य आहे. संस्कृत भाषेचाहि या व्यवस्थेस आधार आहे. प्रमाणीकृ, पयोधरीभू इ. आणि संयुक्त क्रियापदें म्हणजे दोन अथवा अधिक क्रिया म्हणजे धातु यांचा संयोग होऊन झालेलीं क्रियापदें असा जो अर्थ केला आहे त्याच्याशीं प्रकृत व्यवस्था सुसंगत आहे हें उघड आहे.

वरील सूचना मध्यप्रांतांतील व्याकरणकर्ते रा. भावे व कुलकर्णी ह्यांनी आपल्या शालेय व्याकरणांत कृतींत आणलेल्या दिसतात आपल्या इकडे हें म्हणणें मान्य झालेलें दिसत नाही. व्याकरणसमितीनेहि या बाबतींत कांहीच मत दिलेलें नाही.

कांही व्याकरणकार नामापुढे आणि नामाच्या विभक्त्यन्त रूपापुढेहि कांही धातूंचें आख्यात आल्यास त्यांस संयुक्त क्रियापद म्हणावें असें लिहतात; जसें युद्ध करणें, गोंधळ घालणें. मार खाणें, अंगांत येणें, डोकीस घालणें इ. इ. परंतु हे विचार इंग्रजी भाषेच्या दृढ परिचयामुळे येत आहेत परंतु ते ग्राह्य करण्यासारखे नाहीत. मुदलीच संयुक्त क्रियापदें न मानणें हें जसें एक टोंक, तसेंच वर सांगितल्याप्रकारचीं संयुक्त क्रियापद मानणें हें दुसरें टोंक होय. अर्थात् अशा वेळीं मध्यम मार्ग पत्करून अर्थ दृष्टया व रूपदृष्टया आवश्यक तेथेच संयुक्त क्रियापदें मानणें व त्यांची व्यवस्था प्रो. दामले यांनी सुचविल्याप्रमाणे करणें हेंच मत टिकून राहण्यासारखें आहे. संपादन करणें, श्रवण करणें अशा मोजक्या ठिकाणीं नाम व कृदन्त मिळून संयुक्त क्रियापद मानणें भागच पडतें. परंतु हे अपवाद समजून चाललें पाहिजे; सरसहा नाम व क्रियापद मिळून संयुक्त क्रियापद मानणें अग्राह्यच ठरेल.

### संयुक्त काळ

संयुक्त क्रियापदें मानणारांनी संयुक्त काळ किंवा काळांचे पोटभेद कल्पिलेले आहेत. दादोबांनी वर्तमानाचे तीन, भूतकाळाचे सात व भविष्य काळाचे पांच मिळून पंधरा संयुक्त काळ मानिले आहेत. चिपळूणकरांनी तीस पोटभेद तर गोडबोले यांनी एकोणीस पोटभेद मानिले असून त्यांनी ठेवलेलीं नांवें नवीनच आहेत. शास्त्रीय व्याकरणकाराना हे पोटभेद व त्यांचीं नांवें हीं बिलकूल पसंत नाहीत. असल्या संज्ञांसंबंधी ते लिहितात—"संस्कृत व्याकरणांत असली अप्रयोजक, विलक्षण आणि विरोधी भाषा कोठेच आढळत नाही. इंग्रजी व्याकरणापासूनच मराठीस ही जोड प्राप्त झाली आहे. तथापि तिचा मराठीस इतका कांही दृढ सहवास घडला आहे की त्या दोहोंचा आत जवळ जवळ एकजीव होऊन गेला आहे. त्यामुळे आता या अनिष्ट व त्याज्य भागाचाहि यापुढे त्याग करतां येईल कीं नाही ह्याची शंकाच वाटते. म्हणून पदरांत

पडलें आणि पवित्र झालें या न्यायाने त्याचा आता तसाच स्वीकार करून त्यास होतां होईल तितकें पवित्र करून घेतलें पाहिजे."

या बाबतींत गोडबोले यांचीं नावें थोड्याशा फरकाने सरकारी व्याकरण कमिटीने मान्य केलेलीं आहेत. तीं एकंदरीने बरीं वाटतात. प्रत्येक काळाचे अपूर्ण, पूर्ण, रीति व उद्देश असे चार पोटभेद मानावे हें मत बरें दिसतें. हीं नावें परिचयाचीं असल्यावर पुढे इंग्रजी शिकणारांनाहि यांची मदतच होईल.

## प्रयोगप्रकरण

या बाबतींतहि मराठीचें वैशिष्ट्य आहेच. प्रयोगाची व्याख्या निरनिराळ्या व्याकरणकारांनी कशी केली आहे तें पाहा—

(१) वाक्यामध्ये कर्तृप्रधान, कर्मप्रधान आणि भावनाप्रधान या भेदाहींकरून क्रियापदाच्या ठायीं कर्ता, कर्म आणि भाव यांच्या अनुरोधाने विकार होऊन जो वाक्यरचनेचा प्रकार होतो त्यास अथवा त्याप्रमाणे विकार पावलेलें क्रियापद त्यास प्रयोग अशी संज्ञा आहे.

(२) वाक्यांत उद्देश्य आणि विधेय म्हणजे क्रियापद असे दोन शब्द मुख्य असतात आणि उद्देश्य, कर्तृपद, कर्मपद किंवा धात्वर्थ असतो. म्हणून ज्या वाक्यात कर्तृपद उद्देश्य असतें त्यांतील क्रियापद कर्तरि असतें; कर्मपद उद्देश्य असतें त्यातील क्रियापद कर्मणि असतें; आणि धात्वर्थ म्हणजे भाव उद्देश्य असतो त्यांतील क्रियापद भावे असतें. वाक्यरचनेच्या या तीन प्रकारास कर्तरि प्रयोग, कर्मणि प्रयोग व भावे प्रयोग असें म्हणतात. (गोडबोले)

(३) वाक्यांतील क्रियापदाचा त्याच्या कर्त्याशीं किंवा कर्माशीं पुरुष, लिंग व वचन या बाबतींत जो अन्वय किंवा अनन्वय त्यास प्रयोग असें म्हणतात. (दामले)

(४) वाक्यातील क्रियापदाचें त्याच्या कर्त्याशीं किंवा भावाशीं पुरुष, लिंग, वचन या बाबतींत जें साधर्म्य त्याला प्रयोग म्हणतात. (व्याकरणसमिति)

शास्त्रीय दृष्ट्या शेवटची व्याख्या सरस वाटते; परंतु तीत कर्ता शब्द ज्या अर्थाने योजलेला आहे त्याचा अर्थ विशद करणें जरुरीचें आहे. कर्ता ह्या शब्दाचा रूढ अर्थ ह्या व्याख्येंत स्वीकारलेला दिसत नाही. क्रियापदाच्या रूपावर ज्याचा अधिकार चालतो तो कर्ता असा अर्थ येथे दिसतो. कर्ता या शब्दाची ही व्याख्या प्रथम रा. जोशी यांनी केलेली आहे. परंतु ती रूढ अर्थास सोडून असल्यामुळे मान्य झालेली आहे की नाही ही शंकाच आहे. 'क्रियापदाचे रूपावर अधिकार चालविणारी' या अर्थाची 'धातुरूपेश' ही संज्ञा दामले यांनी सुचविली आहे ती रूढ झाली तर बरें. परंतु या व्याख्येकरिताच असल्या शब्दाची आवश्यकता दिसते एरवी तिची जरुरी नाही.

असो. दादोबांनी कर्तरि, कर्मणि, भावे आणि भावकर्तरि असे चार प्रकारचे प्रयोग मानिले आहेत. भावे व भावकर्तरि ह्यांचीं जीं लक्षणें त्यानीं दिलीं आहेत तीं पाहिलीं म्हणजे भावे तोच भावकर्तरि वाटतो. भावकर्तरि हें नांवच योग्य नाही असें थोरल्या शास्त्रीबोवांनी व प्रो. दामले यांनीहि प्रतिपादिलें आहे. प्रो. दामल्यांनी भावकर्तरि प्रयोगास अकर्तृक भावी असें म्हटलें आहे. दादोबांनी 'कर्मकर्तरि' असाहि एक प्रकार मागून सांगितला आहे. शिपायाकडून चोर धरिला जातो हें त्याचें उदाहरण आहे. परंतु यांतील क्रियापद चोर या कर्मपदास अनुसरतें. म्हणून हा कर्मणिच आहे असे दादोबानंतरच्या सर्व वैयाकरणांचें मत आहे. अशा प्रयोगाला शास्त्रीय व्याकरणकारानी गौण कर्तृक नवीन कर्मणि हें नांव दिलें आहे.

प्रो. दामले यांनी कर्मणीचे प्रधानकर्तृक कर्मणि व गौणकर्तृक कर्मणि असे दोन पोट-भेद मानून गौणकर्तृक कर्मणीचे पुन्हा चार भेद ठरविले आहेत. पुराणकर्मणि, नवीन कर्मणि, शक्य कर्मणि व समापन कर्मणि हे उपभेद गौणकर्तृक कर्मणीचे आहेत. यातले मुख्य भेद हे वाक्यपृथक्करणाच्या दृष्टीने उपयोगाचे ठरतील. भावे प्रयोगाचेहि प्रधानकर्तृक भावे, गौणकर्तृक भावे व अकर्तृक भावे असे तीन प्रकार ह्यांनी केले आहेत.

संस्कृत प्रयोगांचीं नांवें मराठीने घेतलीं आहेत पण संस्कृत प्रयोगव्यवस्था ज्या तंत्राने जमलेली आहे तें तंत्र मराठींत संभवण्याचा प्रयत्न प्रथमपासून झाला नाही. मराठींत सर्व काळांच्या रूपावरून कर्मणि प्रयोग होत नाही. ज्ञानेश्वरीच्या मराठींत असे प्रयोग असत. प्रस्तुतच्या मराठींत भूतकाळाच्या व विध्यर्थाच्या प्रत्ययावरून मात्र होतात. ह्या नियमाला कांही अपवाद आहेतच. संस्कृतात भावे प्रयोग केवळ अकर्मक क्रियापदावरून होतो. पण मराठींत सकर्मक भावे प्रयोगहि आहे.

(१) तूं पुस्तक वाचिलें } हे प्रयोग (२) तूं पुस्तक वाचिलेंस
मीं आंघोळ केली मी आघोळ केलों
रामाने फराळ केला रामा फराळ केला

असेहि होतात. ह्यापैकी पहिल्या प्रकारचे प्रयोग शुद्ध होत असें पूर्वव्याकरणकारांनी म्हटलें आहे. परंतु हे दुसरे प्रयोगहि शिष्ट लोकांच्या तोंडीं असल्यामुळे 'प्रयोगशरणाः वैयाकरणाः' ह्या न्यायाने त्यांची व्यवस्था व्याकरणकारांनी लाविली आहे. शिक्षणखात्याच्या कमिटीने यास 'अनियमित कर्तरि' म्हटलें आहे. तसेंच

(१) आईने मुलीस निजविलें ह्याऐवजीं (२) आईने मुलीस निजविली
धन्याने चाकराला पाठवावें ,, धन्याने चाकर पाठवावा

असेहि दोन प्रकार प्रचारांत आहेत. ह्या दुसऱ्या प्रकारच्या प्रयोगास अनियमित कर्मणि प्रयोग असें नांव मिळालें आहे.

साहित्यपरिषदेच्या व्याकरणसमितीने 'वैद्याने रोग्यास बरा केला'. हा प्रयोग कर्मणि असा निर्णय दिला आहे. त्याचें स्वरूप वरच्याप्रमाणेच आहे हें लक्षांत येईल.

येणेंप्रमाणे मराठींतील प्रयोगप्रकरण वैशिष्ट्यपूर्ण असलें तरी संस्कृताप्रमाणेच मराठींत कर्तरि, कर्मणि व भावे हे तीनच प्रयोगाचे प्रकार सर्वमान्य आहेत असें आता सिद्ध झाल्या-सारिखें आहे.

प्रयोगासंबंधी आणखी कांही वाक्यें घेऊन निरनिराळ्या व्याकरणकारांनी पुष्कळच चर्चा केली आहे व पुष्कळ कीस काढिला आहे, परंतु त्याविषयी अधिक कांही न सांगतां मराठी व्याकरणाला ज्या एका नवीन विषयाची जोड मिळाली आहे त्या म्हणजे वाक्यमीमांसेसंबंधाने थोडी चर्चा करून मी आटोपतें घेणार आहें.

## वाक्यपृथक्करण

ह्या विषयाचा विचार दादोबांनी पहिल्या किंवा दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं केला नाहीं ह्यात कांही विशेष नाही, परंतु पुराणिकेंतहि तो त्यांनी केला नाही ही नवलाची गोष्ट आहे. गोडबोले यांनी ह्यासंबंधी थोडें विवेचन केलें आहे. परंतु तें अगदीच त्रोटक असल्याने त्या विषयाकडे कोणाचें लक्ष गेलें नाहीं. पण ही उणीव कै. आगरकर यांनी भरून काढिली. इंग्रजी शिकलेल्या विद्वान लोकांनीच मराठीची सेवा करण्यास सुरवात केल्याने इंग्रजी भाषा-सरणीचा मराठींतील त्यांच्या लिखाणावर परिणाम व्हावा ही गोष्ट अपरिहार्यच होती. त्या

परिणामांपैकी मोठमोठीं वाक्यें येणें हा एक चटकन लक्षांत येणारा परिणाम आहे, व मोठमोठीं अर्थात् गुंतागुंतीचीं वाक्यें भाषेंत आल्यावर त्यांचा अर्थ स्पष्ट होण्यास वाक्यपृथक्करणाची आवश्यकता उत्पन्न झाली हें क्रमप्राप्तच होतें. आगरकरांच्या ग्रंथासंबंधानें शास्त्रीय व्याकरण-कारानी म्हटलें आहे की, "त्या पुस्तकांत या विषयाचा शास्त्रीयरीत्या फारच उत्तम ऊहापोह केला आहे ह्यांत संशय नाही, तेव्हा हा विषय मराठी भाषेच्या परिचयाचा करून देण्याचें बहुतेक श्रेय त्यांसच दिलें पाहिजे हें उघड आहे."

मराठी भाषेची वाक्यरचना कांही विलक्षण असल्यामुळे हा अलंकार मराठी भाषेस चढवितांना विशेष कुशलतेची जरुरी होती आणि या कामीं आगरकरांनी आपल्याकडून होईल तितकी दक्षता ठेवून आपलें काम बरेंच समाधानकारक रीतीने पार पाडलें आहे. तथापि वाक्यपृथक्करणाचा मराठी व्याकरणाशीं सांधा जुळवायाचा असल्यामुळे ज्याप्रमाणे वाक्यपृथक्करण या आंग्लविषयास मराठीच्या स्वभावास साजेसें रूप देणें अवश्य होतें त्याचप्रमाणे मराठीच्या व्याकरणासहि थोडें नवीन वळण लावणें जरूर होतें. ह्या दोन्ही मुद्यांकडे आगर-करांनी लक्ष पुरविलें. परंतु पहिल्या मुद्यावर त्यांचा भर अधिक होता व तें साहजिकहि होतें, कारण ते व्याकरणावर लिहीत नव्हते. त्यामुळे त्यांच्याकडून स्थूल दिग्दर्शन मात्र झालें. पुढे 'प्रौढबोध व्याकरणकारां'नी व्याकरणात या विषयास स्थान दिलें, परंतु त्यांच्या हातून तें नीट-पणें पार पडलें नाही; उलट प्राथमिक शाळांतून या विषयाबद्दल तिटकारा उत्पन्न झालेला आमच्या ऐकण्यांत आहे.

वाक्यपृथक्करणांत उद्देश्य व विधेय या संज्ञा अत्यंत महत्त्वाच्या आहेत. किंबहुना हेच वाक्याचे दोन मुख्य अवयव आहेत. ज्याविषयी वक्ता बोलतो त्यास उद्देश्य म्हणतात आणि उद्देश्याविषयी तो जें बोलतो त्यास विधेय म्हणतात. या व्याख्या मान्य होण्यासारख्या आहेत. पण पुढे उद्देश्य हें नेहमी प्रथमा विभक्तींत असतें असा नियम इंग्रजीप्रमाणे मराठीला रा. जोशी यांनी लाविला ही मोठीच चूक झाली व या बाबतींत आगरकरांनी उत्तम ऊहापोह केला अस-तांहि ती चूक झाली हें आश्चर्यकारकच होय! पुढेहि 'विविधज्ञानविस्तारां'त याबद्दल लेख आले होते परंतु या चुकीच्या गोष्टी शिकविणें शिक्षकांना न पटल्यामुळे वाक्यपृथक्करणाचा प्रसार मुळीच झाला नाही असें म्हणणें भाग आहे.

रा. जोशी यानी उद्देश्य हें प्रथमा विभक्तींतच असावें असें ठरविल्यामुळे कर्तरी प्रयोग असताना कर्ता उद्देश्य, कर्मणि प्रयोग असताना कर्म उद्देश्य व भावे प्रयोगात मुळीं उद्देश्यच नाही असें होत आहे! 'पोपट पेरू खातो' येथे पोपट हें उद्देश्य व 'पोपटाने पेरू खाल्ला' येथे कर्मणि प्रयोग झाल्याबरोबर पेरू हें उद्देश्य हें कोणाला पटेल! ह्या बाबतींत वाक्यमीमांसा-कारांनी पुष्कळ उदाहरणें देऊन उद्देश्य हें प्रथमा विभक्तींतच असलें पाहिजे हा नियम मरा-ठीला लागू होणार नाही हे दाखविलें आहे

उद्देश्याच्या विभक्ति कोणकोणत्या असाव्या ह्या विषयाचा समारोप करताना ते लिहितात : वाक्याचा अर्थ करून त्यांत अमूक एका शब्दाविषयी विधान केलें आहे असें ठरविल्यावर तो कोण-त्याहि विभक्तीचा असला तरी त्याला उद्देश्यस्थानीं ठेवण्यास वाक्यमीमांसकास मोकळीक असली पाहिजे हें जरी खरें आहे तरी ही मोकळीक त्याने कोठपर्यंत भोगावी यालाहि कांही सीमा घातली पाहिजे. ही सीमा हीच की, त्याने वाक्याच्या अर्थावर नजर देऊन उद्देश्याच्या जितक्या थोड्या विभक्ति होतील तितक्या करण्याचा प्रयत्न करावा. मराठी भाषेतील लिंगांच्या व दुसऱ्या अड-चणींमुळे उद्देश्यपदें नेहमी प्रथमा विभक्तींत असलीं पाहिजेत असा नियम जरी घालतां येत नाही

तरी ज्या अर्थी प्रथमेशिवाय इतर विभक्तींस वाक्यांत दुसरीं कामेंहि करावयाचीं असतात त्या अर्थी त्यांच्यावर प्रथमेचें काम जितकें कमी पडेल तितकें बरें. वाक्यपृथक्करणहि ज्या अर्थी वाक्यार्थावरच अवलंबून आहे त्या अर्थी त्यांत विशेषसा गोंधळ होत नसल्यास व्याकरणकारांनी घातलेल्या सीमेचें उल्लंघन कां करावें ? ज्या ठिकाणीं तसें केल्याशिवाय इलाज नसेल त्या ठिकाणीं व्याकरणाचा मर्यादितपणा एकीकडे सारण्यास हरकत नाही. वाक्यपृथक्करण रूढ व्याकरणास धरून चाललें पाहिजे व चालेल तितकें बरें. ज्या ठिकाणीं उभयतात अपरिहार्य तेढें पडेल त्या ठिकाणीं दोघांनी दोन वाटा धरल्या तरी हरकत नाही; पण जर तशी स्थिति नसेल तर एकमेकांनी एकमेकांच्या सलोख्याने असावें हेंच योग्य आहे. अशाने व्याकरणापासून वाक्यमीमांसेला व वाक्यमीमांसे-पासून व्याकरणाला मदत मिळण्याचा व बळकटी येण्याचा संभव आहे. या दृष्टीने विचार करतां प्रथमा, तृतीया व चतुर्थी या विभक्तीशिवाय इतर विभक्ति उद्देश्यस्थानीं फार वेळ येऊं द्याव्या लागतील असें वाटत नाही.

हे विचार श्री. जोशी यांस पटलेले नाहीत. परंतु प्रो. दामले यांना पटले आहेत. त्यांनी ह्या विषयाचा चांगला विचार केला आहे. मराठींतील निरनिराळ्या प्रयोगांच्या वाक्यांचें पृथक्करण कसें करावें हेंहि स्पष्ट केलें आहे. वाक्यपृथक्करणाच्या बाबतींत कै. आगरकर व प्रो. दामले यांच्याकडून झालेली कामगिरी स्मरणीय राहील अशीच आहे.

सरकारी शिक्षणकमिटीने मराठी प्राथमिक शाळांतून पृथक्करणाचा जो भाग ठेविला आहे तो प्रो. दामले यांच्या विचारसरणीला धरूनच आहे.

साहित्यपरिषदेच्या व्याकरणसमितीने हा विषय मराठी व्याकरणात असावा असा मोघम निर्णय दिला आहे तो अधिक स्पष्ट करावयास पाहिजे.

## पदपरिस्फोट किंवा व्याकरण चालविणें

वाक्याचा अर्थ पूर्णपणें ध्यानांत येण्यासाठी व्याकरणशास्त्राचें साहाय्य घ्यावयाचें असतें. वाक्यांतील पदाचें स्वरूप व त्यांचा इतर पदांशीं संबंध स्पष्ट करणें यास पूर्वीच्या व्याकरणकारांनी 'ग्रंथावरून व्याकरण करणें' किंवा 'व्याकरण चालवणें' असें म्हटलें आहे. शास्त्रीय व्याकरणकारानी यालाच पदपरिस्फोट अशी नवी संज्ञा दिली आहे. या बाबतींत निरनिराळ्या व्याकरणकारांमध्ये फारसा मतभेद नाही. काही कांही बाबतींत पुढे सुधारणा सुचविण्यांत आल्या आहेत. व्याकरण चालवताना नामाला अंत्य सांगण्याची पूर्वी चाल होती. क्रियापद चालविताना रूप, भेद हे सांगण्यांत येत, परंतु नामाचा अंत्य सांगण्याची आवश्यकता नाही; तसेंच क्रियापदाचें रूप व भेद सांगण्यांतहि वैशिष्ट्य नाही. तेव्हा या गोष्टी अलीकडे गाळण्यांत आल्या आहेत हें ठीकच आहे.

आतापर्यंत सांगितलेल्या महत्त्वाच्या बाबींखेरीज दुसऱ्या कित्येक किरकोळ गोष्टींतहि पुष्कळ चर्चा होत आली असून तिचा लाभ व्याकरणास झालेला आहे. पूर्वीच्या व्याख्या दुर्बोध तर कित्येक ठिकाणीं अतिव्याप्ति किंवा अव्याप्ति इ. इ. दोषांनी युक्त होत्या. त्यांची सुधारणा पुढे पुढे होत आली आहे हेंहि सांगणें जरूर आहे. तसेंच या मोठमोठ्या ग्रंथकारां-खेरीज शालोपयोगी लहान लहान पुस्तकें लिहिण्याऱ्या लोकांचीहि मदत व्याकरणाचें शिक्षण शाळांतून पद्धतशीर देण्याच्या कामीं झालेली आहे हेंहि आपण लक्षांत ठेवणें अगत्याचें आहे.

असो. अशा रीतीने व्याकरणविषयाच्या महत्त्वाच्या बाबतींत गेल्या शतकांत झालेल्या प्रमुख ग्रंथकारांनी केलेल्या प्रगतीचा व चर्चेचा आढावा आपल्यापुढे विहंगम दृष्टीने सांगण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या परिषदेपुढे यांतलेच कित्येक विषय चर्चेला घ्यावयाचे आहेतच; तेव्हा

यांतील कित्येक बाबींवर विस्तृत ऊहापोह आपणांपुढे होईल अशी उमेद आहे. दादोबांनी रचलेली व्याकरणरूपी इमारत ओबडधोबड असली तरी ती भरभक्कम पायावर उभारलेली असून स्वतः त्यांनीहि पुढे तिला नीटनेटकें व सोयिस्कर असें स्वरूप देण्यांत आळस केलेला नाही. पुढील व्याकरणकारांनीहि अधिकाधिक प्रमाणबद्धता व उपयुक्तता आणण्याचे प्रयत्न केले आहेत हेंहि आपण पाहिलें आहे. परंतु झालेल्या कार्याने आपलें समाधान होत नाही म्हणून तें कार्य पुढे चालविणें आवश्यक आहे. दादोबा, गोडबोले याच्या वेळीं मराठी भाषा नुकतीच वाढीस लागत होती; तिच्यावर इंग्रजी वाङ्मयाचे परिणाम व्हावयाचे होते. तिचा सौंदर्यपूर्ण विकास करण्याच्या कामीं झटणारे विष्णुशास्त्र्यासारखे भाषाभक्त पुढे येऊं लागले तसतसें तिचें स्वरूप पालटत चाललें. पितापुत्र शास्त्रीद्वय, आगरकर, गोळे, आपटे, टिळक ह्यांनी त्या काळीं जें डौलदार, प्रौढ व बाळबोध वळण लाविलें तें फारच उपयुक्त होतें. आपलें लिहिणें न शिकलेल्यालाहि कळावें इतकें सुबोध व प्रसादयुक्त असावें असें प्रथमच्या शास्त्रीलेखकांना वाटत असे, पण पुढे पुढे हें वळण सुटत जाऊन मराठी भाषा संस्कृतप्रचुर होऊं लागली. मराठेशाहीच्या अगोदरचें स्वरूप व पेशवाईच्या वेळचें भाषेचें स्वरूप ह्यात जो भेद होता तोच भेद एकोणीसाव्या शतकांतील लेखक व विसाव्या शतकाच्या प्रथम पदातील लेखक ह्यांमध्ये आहे. असें जरी आहे तरी व्याकरणदृष्टया जे काय परिणाम व्हावयाचे ते आता बहुतेक होऊन गेले आहेत. इंग्रजी वाङ्मयाची व संस्कृत भाषेची जी जोड किंवा छाप मराठीवर पडावयाची ती पडली आहे. थोडक्यांत सांगावयाचें तर आता भाषेला स्थिरता आली आहे असें म्हणण्यास हरकत नाही. अशा वेळीं तिने कोणतीं बंधनें पाळलीं आहेत हें पाहून त्यांचें संकलन करणें व्यर्थ जावयाचें नाही.

भाषेचीं बंधनें म्हणजेच व्याकरणाचे नियम किंवा शास्त्र. मराठीच्या व्याकरणाला स्थिर असें स्वरूप देण्याला ज्या ज्या गोष्टींचें साहाय्य पाहिजे तें तें आता तयार आहे. ऐतिहासिक दृष्टीची जाणीव थोरल्या शास्त्रीबोवानी करून दिली; राजवाडे यांनी तिला निश्चित स्वरूप आणून दिलें; कृष्णशास्त्री गोडबोले यांनी संस्कृत, प्राकृत व इतर फार्सी, हिंदी वगैरे भाषा यांचे व मराठीचे संबंध स्पष्ट केले; कै. आगरकरानी वाक्यमीमांसेची नवीन जोड तिला करून दिली; नंतर प्रो. दामले यांनी पुन्हा सर्वांगांची कसून परीक्षा करून नीटनेटकेपणा आणण्याचा दीर्घोद्योग केला. अशा रीतीने दादोबांनी सुरू केलेलें कार्य या अर्वाचीन ग्रंथकारानी आपापल्या परीने केलें आहे. आता व्यक्तीचें माहात्म्य कमी कमी होऊन संघ, समाज किंवा जनता ह्यांचें माहात्म्य अस्तित्वांत येण्याचे हे दिवस आहेत. अशा वेळीं आपण परिषद् भरवीत आहोंत ही समाधानाची गोष्ट आहे.

## उपसंहार

असो. ह्यापुढे आपला वेळ मी अधिक घेऊं इच्छित नाहीं. गेल्या शतकांत मराठीच्या व्याकरणावर कोणीं कोणीं परिश्रम केले व त्यांचें स्वरूप कसें होतें हें थोडक्यांत आपल्यापुढे निवेदन करण्याचा हेतु आपल्या ध्यानांत आलाच असेल. हा विषय सागरासारखा विशाल व खोल आहे व याचें मंथन होऊन ह्यांतून मूल्यवान् रत्नें पैदा करून तीं भाषासुंदरीच्या अंगावर अलंकारस्वरूपांत घालण्याचें काम किती कष्टसाध्य व कुशलतेचें आहे हें आपल्याला पटलें असेल. राजभाषा भिन्न असल्यामुळे सध्याची परिस्थिति मराठी व्याकरणशास्त्राच्या उत्कर्षाला फारशी अनुकूल नसणार, तेव्हा जें रावाकडून होत नाही तें गांवाकडून झालें पाहिजे ह्या भावनेने ही परिषद् भरविण्यांत येत आहे हें उघड आहे. राजसत्तेचा पाठिंबा असल्यावर जीं कामें

चुटकीसारखीं होतात तींच जनतेने करावयाचीं म्हटल्यास बरीच आटापीट करणें भाग पडतें. परंतु सत्कर्माकरिता केलेले परिश्रम फळास आल्यावाचून राहत नाहीत हेंहि अनुभवाचें आहे. शुद्धलेखनसुधारणेच्या बाततींतला अनुभव ताजा आहे व तो उत्साहवर्धक व आशाजनकहि आहे. एकट्या दुकट्या साहित्याचार्याने केलेली सुधारणा लोकाना फारशी पटत नाही व तिचा प्रसारहि होत नाही पण उलटपक्षी तीच सुधारणा एखाद्या संस्थेने किंवा मंडळाने पुरस्कार केलेली असेल तर तिचा प्रसार होणे शक्य होतें. तेव्हा या विषयासंबंधानेहि अशीच व्यवस्था करण्याची वेळ आता आली आहे असे आम्हांस वाटते. म्हणून आता आपणापुढे जे जे विषय येतील त्याचा शांतपणें व सावधानतेने विचार करावा; तथापि माझ्या समजुतीप्रमाणे वर्ण, शब्द आणि वाक्य या तिहींचा विचार व्याकरणात झाला पाहिजे. वर्ण आणि शब्द हे कसे बनले याची माहिती जशी व्याकरणशास्त्राने दिली पाहिजे तसेंच त्या अनेक शब्दांचें मिळून वाक्य बनतें, त्या शब्दांचा परस्पराशीं कोणता संबंध आहे हें समजून देण्याचे कार्यहि व्याकरणशास्त्राने करावयास हरकत नसावी. असो. अखेरीस विद्वन्मान्य व निर्दोष अशी चर्चा करून ही परिषद् यशस्वी करावी अशी विनंती आहे. आजकाल आपल्या देशात व आपल्या शेजारीं मोठ्या जिव्हाळयाच्या प्रश्नांवर विचार चालू असता आपण ह्या रूक्ष विषयाचा, किंबहुना कांहीच्या मतें निरुपयोगी विषयाचा, विचार करण्यास जमला आहा ह्याबद्दल आपलें अभिनंदन व स्वागत पुन्हा एकवार करून मी आपलें भाषण संपवितो.

---

## नयनबाण

या कादंबरीचे कर्ते रा. ना. वि. कुलकर्णी यांची वाचकाना चांगली ओळख आहे. 'माईसाहेब', 'संत कान्होपात्रा' यांसारख्या प्रसिद्ध नाटकाचे ते कर्ते असून त्यांची 'महाराष्ट्र-कुटुंबमाला' वाचकाना परिचित आहे. तेव्हा अशा प्रथितयश लेखकाची कादंबरी त्याच्या इतर लिखाणाच्या तोडीची असणारच हे बिनवाद आहे. तरी नुसता 'दर्जा' (level) कायम राखल्याने चोखंदळ वाचकांचे कोड पुरवले जातीलच असें नाही हें पूर्णपणें जाणून प्रत्येक पुस्तकाची सजावट, विषय वगैरे बाबतींत बदल करून नाविन्यपूर्ण आधुनिक पिढीला तिला पचेल असें पौष्टिक अन्न ते आजवर पुरवीत आले आहेत.

प्रस्तुत कादंबरीचा विषय अगदी नवीन आहे असेंहि म्हणतां येत नाही. परंतु यातच त्याचें स्वारस्य आहे. कल्पनेच्या भरारींत भविष्यकाळाचीं स्वप्ने खरीं वाटत असलीं तरी तीं फक्त कवींनाच. आणि म्हणूनच विषय आकलन करण्याजोगा असला तरच वाचकांची आवड त्यांत रंगणें शक्य असतें. सुरळित चालेल्या संसारातून कादंबरीचा नायक 'अच्युत' आपल्या अंगांतल्या कांही गुणांमुळेच वाट चुकतो न 'चित्रे'सारख्या रसिक व गुणज्ञ अशा सिनेमासृष्टींत क्वचित् सांपडणाऱ्या एका नटीच्या 'नयनबाणा'ने विद्ध होतो, तिच्यासाठी विपरीत परिस्थितींत स्वतःला गोवून घेऊन चोरीसारखा गुन्हा करण्यास प्रवृत्त होतो व त्याच्या आयुष्याची कादंबरी दुःखांतच आपला शेवट पाहते. माणूस स्वतःच्या कुकर्माने अधोगतीला जावा यात कींव करायलाहि वाव सापडत नाही, परंतु माणूस गुणाधिक्यानेहि त्याच खाचेकडे जावा हें पाहिलें म्हणजे निराशेखेरीज जगात काहीच दिसत नाही.

परंतु वाचकांच्या मनावर कोणता रंग कायम ठेवायचा याचीं सूत्रें लेखकाच्या हातीं

असतात. आणि योग्य तो परिणाम घडवून आणण्यांत रा. कुलकर्णी यांचा हातखंडा आहे. घोड्याला मारलेला चाबूक त्याला न उधळवतां त्याची गति द्रुततर करण्यापुरताच उपयोगी कसा पडेल हें त्यांना ठाऊक आहे. त्यांच्या कादंबरीचा शेवट दुःखांतच आहे. परंतु कादंबरी वाचून मन उद्विग्न न होतां व्यवहाराचें ज्ञान मिळाल्यामुळे किंचित् प्रफुल्लित होतें.

कादंबरीच्या नांवावरून मात्र जुन्या, त्याप्रमाणेच नव्या, लोकांचीहि दिशाभूल होईल. साऱ्या आधुनिक जगाची रचनाच विलक्षण झाली आहे. अंतरंग व बहिरंग यांच्यांत विसंगति असणें हा जणू कायम नियमच होऊन बसला आहे. जुन्या लोकांना वरचें "नयन-बाण" नांव पाहूनच भीति वाटेल व नवीन लोकांना हुरळल्यासारखें होईल. परंतु बहिरंगाचें निरीक्षण सोडून अंतरंगाचा ठाव घेण्यास एकदा सुरवात केल्यावर बहिरंगाशीं विसंगत असणारें पण त्यांच्या त्यांच्या अभिरुचीला पटेल असें खाद्य त्यांना त्यांत सांपडेल. जुन्या लोकांच्या पेढीवर अवश्य लागणारे अभिजात गुण व नव्या लोकांना लागणारें मनोमय काव्य त्यांत आहे. आणि म्हणूनच विसंगतीसारख्या अवगुणाचाहि रा. कुलकर्णी यांना आधुनिक जगाचें प्रतीक म्हणून उपयोग करून घेतां आला आहे.

कादंबरीची रचना अभिनव नाही पण कौशल्यपूर्ण आहे. कादंबरीचें शास्त्र एकदा अवगत असल्यावर कथानकाचे धागे उलटे सुलटे कसेहि गुंतवून कसे सहज सोडवतां येतात हें होतकरू लेखकांना या कादंबरीवरून शिकण्यासारखें आहे. "काळीज कापणारें पत्र" 'स्वतःचें श्राद्ध' पाहण्याचा प्रसंग आणील अशी कल्पना सुद्धा मनांत येत नाही. ओघाबरोबर वाहत जाऊनहि कथानक आटोक्यांत राहिलें आहे. चित्रा व 'तिची करुण कहाणी' ऐकत असतांना भावनांना अगर बुद्धीला हेलकावे न बसतां माणूस उत्सुक राहूं शकतो. 'अच्युत'सारखा माणूस गुणाने साधा नाही व कृतीने असामान्य नाही, आयुष्याची थोडक्याने माती कशी करून घेतो याचें हृद्य वर्णन खरोखरीच अत्यंत बोधप्रद आहे. 'सुधाकरा'सारखीं भडक चित्रें समाजाला वळण लावण्यास नेहमीच असमर्थ असतात. पण 'अच्युत'सारखा नायक केवळ आपल्यांतलाच वाटल्यामुळे समाज त्यापासून शहाणपण शिकूं शकेल.

रा. कुलकर्णी यांना स्त्रियांच्या मनोरचनेचें ज्ञान असून त्यांना त्यांचा खरोखरीच जिव्हाळा वाटतो. स्त्री आधुनिक असो कीं पूर्वीची असो तिची चांगली बाजूच त्यांना दिसते. त्यांची 'मंगला' खरोखरच 'गुणांची गौर' आहे. फार काय पण सिनेमा नटीचें म्हणून काढलेलें चित्र 'चित्रा' ही देखील भांगेंतील तुळस आहे. दोषांचें दिग्दर्शन करून सुधारणा घडवून आणण्यापेक्षा गुणांची पूजा बांधूनच समाजाचें ध्येय त्याच्या अंतःचक्षूपुढे अढळ ठेवण्याचा उपायच त्यांना सध्याच्या आपल्या प्रकृतीस मानवेल असें स्पष्ट दिसत आहे.

साधी, गोड, रसाळ, प्रेमळ व सात्त्विक भाषा हेंच ज्यांचें लेणें आहे त्यांचाच हा काळ आहे. परंतु दुर्दैवाने असे लेखक मराठी भाषेंत फार विरळा आहेत. रा. कुलकर्णी यांना या क्वचित् आढळणाऱ्या गुणाची मुबलक देणगी आहे व त्या देणगीचा उपयोग समाजाच्या मनोरंजनाच्या व सुधारणेच्या कार्यासाठी ते करीत आहेत व पुढेहि असेच करीत राहावेत याहून अन्य अपेक्षा नाही.

श्री. के. क्षीरसागर

# मराठी भाषेला 'पाली'-चा आधार

पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूलमधील पालीभाषाशिक्षक ना. वा. तुंगार, काव्यतीर्थ, हे व्याकरणपरिषदेपुढील आपल्या व्याख्यानांत म्हणाले, "अध्यक्षांनी आपल्या भाषणात त्या वाटेने काटे फार आहेत, हातास फोड झाला आहे, डोक्याला जखम झाली, इत्यादि उदाहरणांत वाटेने, हातास, डोक्याला हीं सर्व अधिकरणें आहेत, तेव्हा अधिकरणार्थी सप्तमी मानली तर या सर्व रूपांचा उलगडा कसा होणार असें सांगितलें. 'त्या वाटेने काटे फार आहेत.' या उदाहरणांत 'वाटेने' या तृतीयेचा अर्थ 'वाटेंत' असा अधिकरणार्थी केल्याशिवाय वाक्याचा बोध होत नाही. मराठी भाषेत सप्तमीच्या अर्थी तृतीया जी वापरतात त्याला पाली भाषेच्या व्याकरणाचा पुढीलप्रमाणे आधार सापडतो—कच्चायन व्याकरणातील 'विभत्त्यत्था' (विभक्त्यर्थाः) या प्रकरणांत 'सत्तम्यत्थे च' असें सूत्र आहे. त्याचा अर्थ 'सत्तम्यत्थे ततिया विभत्ति होति' (सप्तमीच्या अर्थी तृतीया होते); उदाहरणार्थ तेन कालेन, तेन समयेन, तेन मग्गेन सप्पा होन्ति [तस्मिन् मार्गे सर्पाः सन्ति] असें आहे. यावरून पाली, अर्धमागधी वगैरे प्राकृत भाषांच्या व्याकरणांतील 'वाक्यविचार' प्रकरण मराठीच्या वाक्यविचाराला पुष्कळ पोषक होईल असें माझें मत आहे."

---

# मराठी व्याकरणाच्या मांडणीचें वळण*

## हें वळण कोणतें असावें ? —इंग्रजी, संस्कृत, कीं स्वतंत्र ?

१. **प्रास्ताविक**— संस्कृत व्याकरणांत, निदान शाळेंत शिकविलें जातें त्यात, वाक्यातील पदांचा विचार व्यक्तिशः केला जातो; त्याचा विचार साकल्यानें वाक्य म्हणून बहुधा केला जात नाही. कारण संस्कृतांत व्याकरण म्हणजे शब्दशास्त्र, व्यक्तिशः शब्दांचा विचार करणारें शास्त्र, असा अर्थ आहे. संस्कृत पद्धतीहून इंग्रजी पद्धति निराळी आहे. इंग्रजींत (Parsing म्हणजे) शब्दसंमर्शांत शब्दांचा विचार व्यक्तिशः केला जातो व शब्दपुंजांचा विचार (Analysis म्हणजे) वाक्यविमर्शामध्ये केला जातो. शब्दसंमर्शाने वाक्याविषयीची माहिती स्पष्ट होते, तर वाक्यविमर्शाने तीच माहिती स्पष्टतर होते. आपल्या प्रमाणभूत आधुनिक कल्पनेप्रमाणे व्याकरण म्हणजे 'शब्दद्वारा विचार मांडण्याचें शास्त्र.' व्याकरण शिकण्याचा हेतु वाक्याचा बोध विशद व्हावा, हाच मुख्यतः आहे. अर्थात् या बोधास जें जास्त उपकारक तेंच जास्त ग्राह्य ठरणार. म्हणून व्याकरणाच्या मांडणीचा आदर्श सामान्यतः संस्कृतापेक्षा इंग्रजीच पसंत दिसतो. याच गोष्टीचा विचार खाली थोड्या तपशिलाच्या मदतीने करीत आहें.

२. **संस्कृत व इंग्रजी पद्धति**—(क) हुत्वा दत्त्वा च धारयेत्–'यज्ञोपवीत अग्नीस व ब्राम्हणास देऊन (स्वतः) घालावें.' येथील हुत्वा शब्दाचा विचार संस्कृताभ्यासी एवढाच करतो की, हुत्वा हें धातूचें पूर्वकालवाचक अव्यय आहे. वाक्याच्या घटनेंत याचें स्थान कोणतें याचा विचार संस्कृतांत करण्यात येत नाही. इंग्रजीच्या वळणावर मराठीत 'देऊन' याचा शब्दसंमर्श

---

* श्री. गो. कृ. मोडक यांनी व्याकरण-परिषदेंत वाचलेला निबंध.

(Parsing) पुढीलप्रमाणे होतो–'देऊन'–'धातु दा–पासून पूर्वकालवाचक अव्यय, क्रियाविशेषण, घालावें या समानकर्तृक क्रियापदाचें.' ही आंग्लानुकारी पद्धति वाक्यबोधास निःसंशय जास्त उपकारक आहे, हें उघड दिसतें.

(ख) **वाक्याचें स्वरूप** इंग्रजीच्या व्याकरणाच्या धोरणानुसार पुढीलप्रमाणे मराठींत सांगतां येईल,—**वाक्य** म्हणजे 'क्रियापद व त्याचें कुटुंब'. कुटुंबांतील मनुष्याचा परस्परांशीं संबंध असतो, कांहींशीं साक्षात् तर कांहींशीं परंपरेने; व या सर्वांचा संबंध कर्त्या पुरुषाशीं असतो. वाक्यामध्येहि असाच प्रकार आढळतो. सर्व शब्दांचा परस्परांशी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध असतो व या सर्व संबंधाचे पर्यवसान क्रियापदामध्ये होते. ही वस्तुस्थिति इंग्रजी व्याख्येंत दर्शविलेली असते; परंतु संस्कृत व्याकरण या बाबतींत सूक्ष्म विचार करीत नाही. त्यातील व्याख्या 'सुप्तिङन्तचयः वाक्यम्' एवढीच केलेली आढळते. या व्याख्येंत वाक्यांतील पदांच्या परस्परसंबंधाचा विचार मुळीच दिसत नाही. दुसरी व्याख्या 'क्रिया वा कारकान्विता' ही घेतली तरीहि हिच्यात धा. सा. व इतर अव्ययांचा आणि षष्ठीचा विचार येत नाही. अर्थात् संस्कृत व्याकरण व्यक्तिशः शब्दाविषयी जितका सूक्ष्म विचार करितें तितकाच केवळ **ढोबळ** विचार वाक्याच्या संबंधात करितें. अर्थात् वाक्याचा सूक्ष्म बोध व्हावा एतदर्थ इंग्रजी पद्धति उचलणें श्रेयस्कर ठरतें.

येथे एक नम्र सूचना करणें जरूर आहे. तर्कशास्त्र, अलंकारशास्त्र, पूर्वमीमांसा इत्यादि शास्त्रामध्ये वाक्यपदांच्या परस्परसंबंधाची छाननी जरी सूक्ष्मतम रीतीने केलेली असली, तरी तिच्याशीं सामान्य विद्यार्थ्यांचा संबंध येत नाही. उच्च शाळांतून जे संस्कृताचें शिक्षण दिलें जातें व त्यामुळे ज्याशीं सामान्य विद्यार्थ्यांचा परिचय गृहीत धरिता येईल त्याच संस्कृत शिक्षणाविषयी वरचीं विधानें समजावीं. अर्थात् संस्कृतात वरच्या ग्रंथात व्याकरणाचा विचार सूक्ष्मतेने केलेला असला तरी, **विद्यार्थ्यांच्या आटोक्यांत येणाऱ्या संस्कृताध्ययनापेक्षा** इंग्रजीच्या व्याकरणाचें अध्ययनच त्यास वाक्यातील शब्दसंबंध विशद करून सांगण्यास अधिक उपयुक्त आहे, या माझ्या विधानास कोणीहि संस्कृताभिमानी हरकत घेईल असे वाटत नाही.

(ग) **एक उदाहरण**—'यदि लक्ष्मणः मामनुगमिष्यति, ततः वने विरहदुःखं नानुभविष्यामि'—'जर लक्ष्मण मजबरोबर येईल तर मला वनात (स्वजन-)वियोगाचे दुःख होणार नाही'. येथे संस्कृत व्याकरणात **यदि** अव्यय आहे, **ततः** अव्यय आहे, –इतकेंच प्रायः सांगण्यात येतें. कदाचित् **यदि** 'अनुगमिष्यति'–चे क्रियाविशेषण व **ततः** 'अनुभविष्यति'–चें,– इतकेंच फार तर सांगण्यात येत असेल. आंग्लानुसारी मराठी **शब्दसंमर्श** पुढीलप्रमाणे होतो, **जर-तर** जोडउभयान्वयी अव्ययें, 'लक्ष्मण, इत्यादि' हें गौण वाक्य आणि 'मला वनात इत्यादि' प्रधान वाक्य याना जोडणारी. या उत्तरोक्त पद्धतीवरून वाक्यबोध चांगलाच स्पष्ट होतो.

३. **इंग्रजी पद्धति**—या पद्धतीमध्ये **शब्दसंमर्श** व **वाक्यविमर्श** या दोन पद्धति आढळतात. पैकी शब्दसंमर्श संस्कृतातील शब्दसंमर्शाहून वाक्यबोधाच्या दृष्टीने जास्त उपयुक्त आहे हे आपण पाहिलेंच. शब्दसमर्शात एकेक शब्द घेऊन, त्यांची जाति व परस्परसंबंध सांगून, वाक्याची जुळणी स्पष्ट केली जाते; तर वाक्यविमर्शात तेंच कार्य वाक्य मोडून त्याच्या शब्दपुंजांचे परस्परसंबंध दाखवून तद्द्वारा केले जातें. यानेहि वाक्यबोधास चांगलीच मदत होते. येथे एक कल्पना करूं. वाक्य हें एक घड्याळ आहे. त्याची घडण आपणांस समजून घ्यावयाची आहे. एतदर्थ घड्याळाचे भाग घेऊन ते एकत्र जोडून त्याचें घड्याळ बनविणें हें जसें उपयुक्त आहे, तसेंच बनलेलें घड्याळ घेऊन त्याचे भाग व विभाग मोकळे करणें हेंहि उपयुक्त आहे.

पहिल्या पद्धतीस आपण संयोजन म्हणूं, तर दुसरीस विश्लेषण म्हणूं. घड्याळाच्या संबंधांत या दोन्ही पद्धति जशा उपयुक्त, तशाच संमर्श व विमर्श या दोन्ही पद्धति वाक्यबोधास उपयुक्त आहेत. वाक्यांतील शब्दांचे परस्परसंबंध कळणें जसें इष्ट, तसेंच शब्दपुंजांचे व परस्परांशीं संसृष्ट असलेल्या वाक्यांचेहि संबंध जाणणें इष्ट आहे. या वाक्याच्या परस्परसंबंधांचाहि विचार वाक्यविश्लेषणांत केला जातो. हा विचारहि अर्थबोधास उपकारकच आहे. करितां पदसंमर्श व वाक्यविमर्श हीं दोन्ही मराठीने स्वीकारावीं. तीं संस्कृतांत नाहीत, इंग्रजींतून आलीं आहेत, इत्यादि विरोधक शंका घेण्याचें कारण दिसत नाही.

**४. तपशिलाचा विचार**—मराठी व्याकरणाला इंग्रजीचा आराखडा घ्यावा, असें वर सुचविलें आहे. या आराखड्यांत प्रकरणांचा तपशील कसा भरणें ही गोष्ट सोय व तर्कशास्त्र यांच्याच मदतीने ठरविली पाहिजे. उदाहरणार्थ—समास संस्कृतात आहेत, इंग्रजीतहि आहेत. संस्कृतांतील समासांची मांडणी घटकांच्या परस्परसंबंधावर अधिष्ठित व तर्काश्रित आहे; तर इंग्रजींतील मांडणी केवळ उत्तान, रूपाश्रित आहे. संस्कृत समासांत शब्दांच्या परस्परसंबंधांची सूक्ष्म छाननी करण्यात येते, तर इंग्रजींत केवळ त्या शब्दाची जाति पाहिली जाते. अर्थात् इंग्रजी समासांत तर्कबुद्धीला वाव मुळींच मिळत नाही. तींतील समासाचें वर्गीकरण नाम आणि विशेषण, विशेषण आणि नाम, नाम आणि धातु, धातु आणि नाम, अव्यय आणि नाम, इत्यादि प्रकारचें असतें; व याच धोरणाने पुढीलप्रमाणे उदाहरणें दिलेलीं सांपडतात. Milk-white, *Blue-bell, Blue-jacket*, tooth-pick, pick-pocket, in-door, यांतील इंग्रजीप्रमाणे एकाच वर्गांत पडणारीं उदाहरणें २ व ३, घटकांच्या संबंधानुसार संस्कृतांत भिन्नभिन्न सदरांत घातलीं जातील. अर्थात् अवयवांच्या संबंधाकडे डोळेझाक करणारी इंग्रजी पद्धति सोडून या संबंधाकडे जागरूकतेने पाहणारी संस्कृत पद्धतीच आपण येथे आदरिली पाहिजे.

**५. स्वतंत्र वळण** — तपशिलाच्या बाबतींत विचार करतां समासाचा आदर्श संस्कृत हा ठरला; तरी पण कांही-कांही समासभेदांत मराठीस संस्कृतादर्शहि स्वीकार्य नाही. संस्कृत व्याकरणाचें ध्येय वेदार्थबोध हेंच मुख्यतः आहे. 'रक्षार्थं वेदनामध्येयं व्याकरणम्' हें वाक्य प्रसिद्धच आहे. वेदामध्ये शब्द सस्वर उच्चारिले जातात. यांतील स्वर म्हणजे उदात्त, अनुदात्त, स्वरित हे होत; वर्णमालेंतील स्वर नव्हत. वेदाचें अंग म्हणून या स्वरांना महत्त्व येत असल्यामुळे, संस्कृत व्याकरणांत या स्वरासाठी तर्कशास्त्रास कोठेकोठे गुंडाळून ठेवण्यांत येतें. अधनः याचा जो अर्थ तोच अ-किंचनः याचा आहे. दोघांची घटनाहि सारखीच आहे. समासाच्या सामान्य व्याख्या पाहतां, दोन्ही समास नञ्-बहुव्रीहि ठरतात; तरीपण स्वरभेदामुळे अ-किंचनः हा समास व्याकरणात तत्पुरुष म्हणून देण्यांत येतो. यामध्ये सोय आहे ती केवळ वेदार्थ करूं पाहणाराचीच; पण असे विद्यार्थी थोडे, फार तर शेंकडा पाच. यांच्या थोड्याशा सोईसाठी शेंकडा पंच्याण्णव विद्यार्थ्यांची गैरसोय करणें व्यवहार्य नाही. हा झाला संस्कृताभ्यासकांचा विचार. वेद संस्कृतांत; तेव्हा स्वराकरिता संस्कृत व्याकरणांत ढवळाढवळ होणें, हें कदाचित् नितान्त पुराणाभिमानी यांच्या मतें अनुज्ञेय ठरेल; परंतु मराठीच्याच अभ्यासकास वेदांतील 'स्वर म्हणजे काय?' हेंच जाणण्याचें प्रायः कारण नाही; अर्थात् मराठी व्याकरणात वेदांतील स्वरांची लुडबूड चालूं देणें, केव्हाहि योग्य नाही; करता मराठीच्या दृष्टीने अकिंचन हा समास बहुव्रीहींतच गणला पाहिजे. हा स्वराचा खेळ संस्कृतात समासाहून अन्यत्रहि सापडतो. (वृ) वृणोति, (श्रु) शृणोति,—या दोहोंच्या रूपघटनेचा विचार करता, त्यांचा गण एकच असला पाहिजे, असें कोणीहि अभ्यासू म्हणेल; तरीपण स्वरभेदामुळे श्रु-धातु

संस्कृतांत प्रथमगणांत पठित आहे. दिवंगत विद्वद्वर्य भांडारकर यांनी या पुराणपरंपरेस बाजूस सारून, **सोईला** व **तर्कशास्त्राला** महत्त्व देऊन, श्रु धातु प्रथमगणांत न सांगतां, पंचमगणांतच सांगितला आहे. म्हणजे **'संस्कृतपरंपरा ही युक्ति व सोय यांच्या विरुद्ध असेल तर ती परंपरा सोडावी'** या आपल्या विचारसरणीस विद्वानाचाहि पाठिंबा आहे. तेव्हा असा निष्कर्ष निघतो की तपशिलाचा विचार संस्कृत किंवा इंग्रजी यांतून ज्या भाषेंत बोधास उपकारक सांपडेल तींतून मराठीने घ्यावा;—मात्र असें करतांना जेथे युक्ति व सोय यास विरोध येत असेल तेथे मराठीने आपला मार्ग स्वतंत्र आखावा. याच समासासंबंधात पुढील गोष्टीहि विचारणीय आहेत : (१) मीठभाकर याशीं **सदृश घटनेचे** समास संस्कृतांत आहेत, पण त्यांचा अर्थ मात्र भिन्न आहे. मराठीमध्ये मीठभाकर या समासाच्या अर्थात **सदृश अन्य वस्तूंचा समावेश** होतो; तसा समावेश संस्कृत व्याकरणात सांगितला नाही. करिता या दोन्ही समासांच्या संज्ञा एकच ठेवाव्या कीं भिन्न ठरवाव्या, हें विचारणीय आहे. (२) निर्वनः व्याघ्रः आणि वनानिर्गतः व्याघ्रः या दोन्ही ठिकाणचे समास अर्थानुसार तत्पुरुष गणले जातात. समासपदाच्या क्रमात भेद पडल्यामुळे समासाच्या संज्ञेत भेद पडत नाही, हें तत्त्व येथे दिसून येतें. याच तत्त्वानुसार सीतासहितः रामः व **ससीतः** रामः यांतील दोन्ही समास **समान** घटकांचे व **समान** अर्थाचे असल्याने एकाच जातीचे मानले पाहिजेत. पण संस्कृतांत हे भिन्न जातीचे मानले जातात. या विसंवादाचें कारण माझ्या मतें स्वराची अपेक्षा हेंच असावें. मराठीला स्वरविचार अविचार्य आहे. अर्थात् सामान्य व्याख्येनुसार सीतासहितः-प्रमाणे ससीतः हा समास तत्पुरुषच मानणें मराठीला प्राप्त आहे. सारांश—उपयुक्त असल्यास, संस्कृत आदर्श घेणें, तदभावीं इंग्रजी घेणें, व हे **युक्तिविरोधी** असल्यास स्वतांचेंच वळण अनुसरणें, हें त्रिविध धोरण मराठी व्याकरणांत ठेवणें योग्य आहे.

आणखीहि अशा कांही गोष्टी आहेत की ज्यामध्ये मराठीने आपला मार्ग स्वतांच खोखाळला पाहिजे. नमुन्यासाठी येथे एकच देतों. 'लज्जा हें स्त्रियांचें भूषण आहे' यासारख्या वाक्यांतील हें या सर्वनामाच्या उपयोगास तोड संस्कृतात प्राय: व इंग्रजींत मुळींच सापडत नाही. अर्थात् या विशिष्ट उपयोगानुसार या सर्वनामास निराळें नाव मराठीने दिलें पाहिजे. एतदर्थ 'अनुवाचक सर्वनाम' हा शब्द मी सुचवितों.

**६. अवांतर गोष्टी**—येथपर्यंत मराठी व्याकरणाच्या मांडणीची चर्चा झाली व ही मांडणी तर्क, बोध व सोय यास अनुसरून यथासंभव संस्कृताच्या किंवा इंग्रजीच्या वळणावर किंवा स्वतंत्र असावी हें आपण ठरविलें. आता कांही अवांतर गोष्टींचा विचार करूं.

(क) **वचन व विभक्ति**—'विभक्तीचें वचन' असें संस्कृत सांगतें. इंग्रजी म्हणते 'अगोदर वचन, नंतर विभक्ति'; आणि हेंच म्हणणें युक्तीला पटते. **नाम** वस्तु सांगतें, **वचन** त्याची संख्या सांगतें व **विभक्ति** त्याचा उपयोग सांगते. वस्तु व तिची **संख्या निश्चित झाल्यावर**, नंतरच उपयोगाचा अथवा **कारकाचा विचार** येतो या पौर्वापर्यास अनुसरून मराठीने 'पंचमीचें अनेकवचन' न म्हणता 'अनेकवचनाची पंचमी' म्हणावें. अर्थात् येथे इंग्रजीचें अनुकरण योग्य दिसतें.

(ख) **संज्ञा**—यांचे प्रकार दोन आहेत-(functional) कार्याश्रित, व (formal) रूपाश्रित. यांतील कार्यें प्राय: सगळ्याच भाषात सारखींच संभवत असल्यामुळे, तदाश्रित संज्ञा संस्कृतावरून मराठींत घेण्यास हरकत नाही. कर्ता, कर्म, वचन, विभक्ति, प्रयोग, अव्यय इत्यादि संज्ञा यथाप्राप्त मराठींत योजाव्या. पण **रूपाश्रित** संज्ञांचा प्रकार निराळा आहे. संस्कृत

विभक्तिप्रत्यय 'सुप्' या संज्ञेने बोधित होतात; कारण पहिला प्रत्यय सु व शेवटला सुप् यांच्या संयोगाने ही संज्ञा बनली आहे. या सुप् संज्ञेवरूनच विभक्ति-रूपास सुबन्त म्हणतात. पण मराठी-मध्ये सु प्रत्यय नाही, सुप् प्रत्यय नाही. सुप् या प्रत्ययमात्राच्या संज्ञेचा मसाला मराठींत नाही. अशा स्थितींत विभक्तिपद याला सुबन्त म्हणणें म्हणजे केवळ संस्कृताचें अंधानुकरण होय. पडून याच्या तोडीचें संस्कृत रूप पतित्वा असें आहे. पहिलें ऊन-प्रत्ययान्त व दुसरें त्वा-प्रत्ययान्त आहे. या दोही संज्ञा रूपाश्रित आहेत. येथे पडून हें त्वा प्रत्ययान्त म्हणणें किंवा पतित्वा यास ऊन-प्रत्ययान्त म्हणणें कितपत योग्य होईल याचा विचार सुज्ञांनी करावा. हें उत्तरोक्त संज्ञाकरण जितकें अयोग्य, तितकेंच मराठींतील विभक्तीच्या पदास सुबन्त म्हणणें अयोग्य.

(ग) **रूढीचें बल**—पाणिनीच्या पूर्वी पुष्कळ व्याकरणसंज्ञा प्रचारांत होत्या,–कांही युक्त व कांही अयुक्त. अयुक्त संज्ञांचे नमुने समासांच्या नावात सापडतात. बहुव्रीहि, कर्मधारय इत्यादि संज्ञा व त्यांनी सुचविलेले समास यांचा संबंध अर्थद्वारा कांहीच जोडतां येत नाही; यामुळे हे शब्द समासाच्या संज्ञा या दृष्टीने केवळ अर्थशून्य होत. असें असतांहि पाणिनीने त्याच कायम ठेविल्या. याचें कारण सोय हेंच होय. या संज्ञा आपल्या अवयवार्थाच्या द्वारें नव्हे, पण दीर्घकालीन संकेतामुळे, उच्चारतां क्षणींच विवक्षित अर्थाचा बोध अभ्यासूस करून देत असत. विवक्षित अर्थाचा अचूक व शीघ्र बोध करून देणें, हेंच संज्ञेचें मुख्य कार्य. तें कार्य या संज्ञा संकेताने अंशतः करीत असल्यामुळे, पाणिनीने त्याच संज्ञा पुढे चालू ठेविल्या. यावरून असा बोध निघतो की, सोईसाठी शास्त्रशुद्धींत थोडासा उणेपणा आला तरी पतकरावा.

७. **व्युत्पत्ति व व्याकरण**—संस्कृतामध्ये व्याकरण म्हणजे शब्दशास्त्र. त्यात व्युत्पत्तीचाहि समावेश होतो. पण एखाद्या विषयाचे जेवढे विभाग अधिक, तेवढें त्याचें ज्ञान विशेष स्पष्ट होतें; यामुळे, इंग्रजी भाषेच्या उदाहरणाने आपण व्युत्पत्ति (एखाद्या भाषेतील शब्दांचें मूळ **इतर भाषांतून** यथासंभव शोधून काढणें) व्याकरणातून निराळी काढतों. अर्थात् ही निराळी काढल्याने, व्याकरणाचें क्षेत्र कांही कमी होतें. हें कमी झालेलें क्षेत्र स्वीकारून, आपणास असें म्हणतां येईल की, व्याकरणाच्या समीचीन ज्ञानास व्युत्पत्तिशास्त्राची अवश्यकता नाही. एखाद्या भाषेची व्युत्पत्ति न जाणणारा मनुष्यहि तिचें व्याकरण आत्मसात् करूं शकेल. याच्या विशदीकरणासाठी आपण उदाहरणें घेऊं. मराठींत **आणि** हें उभयान्वयी अव्यय आहे. ही गोष्ट व्याकरणाच्या सर्व कर्त्यांस व अभ्यासकांस संमत आहे. ही मान्य करतांना, तिच्या व्युत्पत्तीचा विचार सर्वांनीच केला असेल असें संभवत नाही; तरीपण या व्युत्पत्तीच्या विचाराच्या व अर्थात् ज्ञानाच्याहि अभावीं, **आणि** यास उभयान्वयी अव्यय म्हणणें हें सर्वथा शास्त्रीयच आहे हें कोणीहि कबूल करील. असो. या **आणि**–चें मूळ तरी काय ! संस्कृत—'रामः, अन्यः लक्ष्मणः, वनं गतौ' याची मराठी छाया—'राम **आणि** लक्ष्मण वनांत गेले' अशी स्पष्ट आहे. **अन्य** चें रूपांतर **आणि** हें पटण्यासारखें आहे. 'य–चा इ होणें' ही गोष्ट या दोन वर्णांच्या नात्यामुळे सहज संभवते. य हा अर्धस्वर व इ त्याचाच नातेवाईक पूर्ण स्वर. हें नातें मुखांतील तालु या समान स्थानामुळे आहे, ही गोष्ट सहज लक्ष्यात येईल. **उद्यम** याचें मराठी रूपान्तर उदीम याच नात्यामुळे घडतें. अशा रीतीने **अन्य** व **आणि** यांचें नातें रूपदृष्ट्या सिद्ध होतें. या दोघाचा अर्थहि एकाच गोष्टींत पर्यवसित होतो. ही गोष्ट म्हणजे **आधिक्य**. अन्य शब्द पूर्वोक्त गोष्टींत भर सुचवितो.; व **आणि** शब्दसमुच्चयाचा बोध करून तेंच कार्य करतो. असो. हें **आणि**-च्या व्युत्पत्तीचें ज्ञान 'तें उभयान्वयी अव्यय आहे' या बोधास आवश्यक नाही, ही गोष्ट सिद्ध आहे. मात्र **आणि** या शब्दाला प्रस्तुत अर्थ कसा आला !–याचें

अधिक ज्ञान व्युत्पत्ति करून देते. अशा रीतीने शब्दाचा अर्थ स्पष्ट करून व्याकरणास साहाय्य करते, म्हणून व्युत्पत्ति व्याकरणास उपकारक आहे एवढेंच ठरतें; व्युत्पत्तीचें ज्ञान व्याकरणास आवश्यक नाही हेंच मी येथे प्रतिपादूं इच्छितों. इंग्रजीचा' दाखला He stayed *during* the winter. येथे during यास preposition म्हणतात, व तें योग्यहि आहे. पण, हें म्हणतांना त्याची जातकुळी सर्वांनाच ठाऊक असते, असें समजण्याचें कारण नाही. शेवटच्या ing या प्रत्ययाने सुचविल्याप्रमाणे, during हें धातुसाधित आहे. dure या अकर्मक धातूवरून ते निघालें आहे. मूळ वाक्यरचना He stayed, the winter during अशी होती. तेव्हा during हें Nom. absolutive मधील participle होतें. परंतु कालांतराने शब्दक्रम बदलला गेल्याने, आता during हें शब्दयोगीच मानणें प्राप्त आहे. अशा रीतीने इंग्रजींतहि व्युत्पत्तिज्ञान व्याकरणबोधास आवश्यक नाही ही गोष्ट कोणासहि पटेल. (येथे भार्षेतल्या भार्षेत एका शब्दापासून दुसरा शब्द साधणें म्हणजे शब्दसाधन व्युत्पत्तीहून निराळें, हें सांगणें नकोच.)

८. महत्त्वाचे प्रश्न—मराठी व्याकरणाचा विचार करतां पुढील प्रश्नांवर आजपर्यंत रणें माजलीं आहेत. हे प्रश्न म्हणजे विभक्ति, प्रयोग, संयुक्त क्रियापद, संयुक्त काळ, शब्दांचे प्रकार व नामाच्या पोटजाति हे मुख्यत्वें होत. त्यांतहि मूर्धन्य प्रश्न विभक्ति हा होय. या प्रश्नाचा उलगडा करण्याचा प्रयत्न करणें प्रत्येक व्याकरणसमितीचें कार्य आहे; व प्रस्तुत व्याकरणसमिति तो क्रमशः करीलहि अशी आशा आहे. हा विशिष्ट विचार प्रस्तुत निबंधाचा विषय नसल्यामुळे येथे करण्याचें कारण नाही; तरीपण त्याच्या महत्त्वास्तव तत्संबंधीं एक दोन गोष्टी सांगणें इष्ट वाटतें. (क) संस्कृतामध्ये हृदिस्पृग्भिः (अद्भिः)—असा प्रयोग आढळतो. याचा अर्थ 'छातीला भासेल इतक्या' (पाण्याने). येथील समास 'हृदि स्पृशन्ति ताः हृदिस्पृशः' असा सोडवितात. व हा विग्रह व्याकरणसंमतहि आहे. यांत स्पृश् धातु सकर्मक आहे. हृद् त्याचें कर्म आहे. या न्यायास अनुसरून हृदि हा शब्द द्वितीयेचें कार्य करणारा दिसतो. अर्थात् 'कारकावरून विभक्ति' हें गृहीत धरल्यास हृदि ही विभक्ति द्वितीया मानिली पाहिजे. पण येथे सर्वच वैयाकरण एकस्वराने सांगतात की हृदि ही द्वितीया-स्थानीं सप्तमी आहे. तिचे सप्तमीत्व कधीच नाकबूल करीत नाहीत. यावरून संस्कृत काय साक्ष देते ! उत्तर— रूप म्हणजे विभक्ति. ती कारकावरून ठरत नाही. आता इंग्रजीची साक्ष घेऊं. Than whom none higher sat हें प्रसिद्ध वाक्य वैयाकरणांस मान्य आहे. Than हें conjunction आहे, ही गोष्टहि ते प्रमाण मानितात. तदनुसार whom हें रूप प्रथमा असलें पाहिजे. असें न घेतल्यास than चे उभयान्वयित्वास बाध येईल. पण हा बाध टाळण्यासाठी कोणीहि वैयाकरण whom ही प्रथमा मानीत नाही. रूपाकडे पाहून whom द्वितीयाच मानितो; व तदर्थ than-चें उभयान्वयित्व सोडून, त्यास preposition म्हणतो. म्हणजे रूपासाठी शब्दजाति बदलतो, जातीसाठी रूपाची संज्ञा बदलीत नाही. यावरून इंग्रजी व्याकरण रूपालाच विभक्ति म्हणते, कारकाला नव्हे, हें स्पष्ट आहे.

९. निगमन—येथपर्यंतच्या विचारावरून ठरतें की, (१) मराठी व्याकरणाचा सांगाडा इंग्रजीवरून घ्यावा. (२) त्यांतील प्रकरणें संस्कृताच्या धर्तीवर, इंग्रजीच्या धर्तीवर किंवा स्वतंत्रपणें रंगवावीं, अर्थात् शास्त्रशुद्धि, युक्ति व सोय या उत्तरोत्तर बलवत्तर गोष्टींस अनुसरून. (३) मराठींतील ज्या गोष्टी संस्कृतांत आढळत नाहीत त्यांची व्याकृति सर्वथा

मराठीप्रमाणे होणार, हें सांगणें नकोच. (४) परंपरा व सोय यांत लढा पडल्यास, सोईलाच महत्त्व दिलें पाहिजे. (५) शास्त्रशुद्धि व रूढि यांत शास्त्रशुद्धीस विशेष बाध येत नसल्यास, रूढीचाच आदर करावा. **सारांश**—मराठीच्या व्याकरणाची मांडणी **यथासौकर्य** संस्कृतावरून किंवा इंग्रजीवरून किंवा स्वतंत्रतः यथासंभव करावी. अमुकच एक पद्धति सर्वत्र अनुसरणें, असा आग्रह धरूं नये.

**१०. निबंधसार**—अन्वाङ्ग्लीं कोष्ठसंस्था स्यात् तत्पूर्तिरनु संस्कृतम् ।
सा चेन्मराठीं विरुन्द्धेऽसौ स्वैरं मार्गमाश्रयेत् ॥

कोष्ठसंस्था=आराखडा. स्वैर=स्वतंत्र.

—— ——

# उजेडांतील अंधार

[ ले. **दत्त रघुनाथ कवठेकर**, प्र. सुरस ग्रंथमाला प्रकाशन, ८९२ शुक्रवार, पुणें. किं. १॥ रुपाया ]

या लघुकथासंग्रहांत चवदा भिन्न सामाजिक दृश्यें श्री. कवठेकरांनी रेखाटिलीं आहेत. **'विस्कुरलेलें प्रेम'** ही नवनीतीला उत्तरादाखल लिहिलेली मनोविश्लेपणात्मक कादंबरी आणि **'गुलाबाच्या पाकळ्या'** हा लघुकथासंग्रह यापूर्वी प्रसिद्ध करून, लेखकाने नांव कमावलेंच आहे. खाष्ट लष्करी कारकुनी नोकरीचा पेशा असून इतकी अंतर्मुखता लेखकामध्ये आहे याचें कौतुक वाटतें. त्याचें समाजात अवलोकन सूक्ष्म आणि चौफेर कसे आहे व त्यासवेंच ग्रामीण जीवनाशींहि त्याचा निकट परिचय किती आहे, हें या कादंबरी-कथांतून स्पष्ट प्रतीत होतें.

या कथासंग्रहांतील पहिलीच गोष्ट 'उजेडांतील अंधार !' हींत एक 'नीतिनिरपेक्ष-सौंदर्यसमीक्षका'चा आपल्या मेव्हणीवर कसा डोळा असतो व आपल्या वासनातृप्तीसाठीं तो काय काय मोहजाळ तिच्यावर पसरतो, पण ही वृद्धपतिका (जुन्या जमान्यांतील !) पतिव्रता मेव्हणी शेवटीं त्याचें खरें रूप ओळखून निमूटपणे कशी आपल्या घरीं परतते, या प्रसंगाची फार नाजूक आणि शृंगारिक रीतीने मांडणी केली आहे. 'मेव्हणी म्हणजे अर्धी बायको' अशी आपल्यांत एक सूचक म्हण आहे; मेव्हणा मेव्हणीच्या प्रेमाच्या कथाहि अनेक आहेत. तेव्हा मानसशास्त्री संशोधकांनी पुरुष्याच्या ठिकाणीं असलेली मेव्हणीसंबंधी सुप्त वासना फ्राइड-प्रमाणे अभ्यासण्याजोगी आहे. दुसऱ्या गोष्टींत मातृवात्सल्य आणि पितृवात्सल्य यांमध्ये असणारा मूलभूत फरक स्पष्ट केला आहे. 'नवऱ्यांनी आपल्या ऐपतींत बायकांना कितीहि सुख देण्याचा प्रयत्न केला तरी त्या नेहमी असंतुष्टच असतात,' हें दाखविण्यासाठी **'चाळींतील वैभव'** ही कथा रेखाटिली आहे. बायकोचा हांवरेपणा नाहीसा करण्यासाठी गोपाळरावानी योजलेली क्लृप्ति प्रत्यक्ष व्यवहारांत कितपत परिणामकारक होईल याची शंका आहे. भावंडांतील निःस्वार्थी प्रेम **'नाहीं तरी चोरच !'** व **'भावनाप्रधान'** या दोन गोष्टींत चटका लावील असें चित्रित केलें आहे. आईचे बापाशीं लग्न होण्यापूर्वी त्याच्याच पोटचा मुलगा जगांत आपला भाऊ म्हणून उघड सांगतां न आल्या कारणाने भावनेवर व्यभिचाराचा आरोप

येतो व प्रत्यक्ष नवरा त्या जाराचा (मेव्हण्याचा) खून करण्याचा प्रयत्न करतो. भावनेने प्रथमच नवऱ्याला या कानीन भावाविषयी सांगून टाकलें असतें तरच तें स्वाभाविक होतें.'दगडावरची रेघ!' यांत बंधुप्रेम फार उशीरां प्रकट होते. तथापि ही गोष्ट फारच हृदयद्रावक आहे. कजाग भावजया कशा असतात याचा उत्कृष्ट नमुना आहे. याच्या उलट 'जिथें तिथें स्वार्थ–' यात भाऊबंदकी उत्तम साधली आहे. संशयावरून एखाद्याला आपण कसें दुर्वर्तनी ठरवितों· याचें सुंदर उदाहरण 'तरी सांगत नव्हतों–' यांत दिसून येईल; तर 'हे बंध असतात म्हणून–' ही कथा कारकुनी जीवनावर सत्य प्रकाश पाडते. सर्व कथांत ही पहिल्या दर्जाची म्हणता येईल. श्री. कवठेकर यांच्या अंगीं विनोदी छटा देण्याचा गुण नाहीच कीं काय, असा संशय जर आला तर त्याचें चांगलें निरसन 'रक्ताची गुळणी!' ही प्रसंगनिष्ठ विनोदी कथा वाचून होईल. बेपत्ता नवऱ्याचें प्रेत म्हणून झालेला गैरसमज आणि इकडे तंबाकूची गुळणी रक्ताची उलटी समजून रावजीची इस्पितळात उगाच रवानगी, हे प्रसंग फार हास्यास्पद पण स्वाभाविक वाटतात. शीलाचें महत्त्व लहान मुलांनाहि कसें वाटतें व पांढरपेशापेक्षा मराठमोळ्यांत नीतीची चाड कशी असते याचें चित्र 'बोलूं तरी नकोस–' मध्ये काढलें आहे. रम्य ग्रामीण जीवन आणि खेडवळांतील अविचल दांपत्यप्रेम 'वेडी रखमी' दाखविते. तिच्याविषयी कोणालाहि कींव वाटूं लागते. 'हवं असतं तें हें–' ही शेवटची कथा अर्वाचीन तरुणांना आपली बायको नेहमी आकर्षक राहणीची, संसारांत नावीन्य आणि वैविध्य आणणारी अशी पाहिजे असते व तशी नसल्यास ते कसे 'बाहेरख्याली' (चांगल्या अर्थाने—म्हणजे बाहेर आपली करमणूक करून घेणारे) बनतात याचा आदर्श पाठ आहे.

श्री. कवठेकरांची लेखनशैली सुबोध आणि भावनापोषणाला हवी तशी आहे. त्यांचें वैशिष्ट्य म्हणजे, जुने अन्वर्थक शब्द हुडकून काढून वापरणें व नवीन अर्थसूचक शब्द आटपशीर बनविणें. उदा० महारकचकच, लंकाढाण, उगीदुरी, आवळस तावदारकी, उमाडा, दारें व जित्राब, इ०. पण पुढील प्रयोग पाहा :— आग्रहून शिफारसल्या; आग्रह निष्कारण डावलतां येईना; सद्गदून; वक्षस्थळ हेलावीत; तिचीं नसंन् नसं फुलारलीं—हे कानाला चमत्कारिक वाटतात. स्त्रियांची वेषभूषा, त्याचे हावभाव, मनोविकार आणि चालीरीति या नाजूक कुंचलीने चित्रित करण्यांत लेखकाचा हातखंडा आहे. पण कथेंतील गुपित किंवा रहस्य शेवटपर्यंत टिकविणें त्याला साधत नाही. प्रथमपासून अखेर-परिणामाची छाया दिसूं लागते. त्याच्यांत संभाषणकौशल्यापेक्षा भावनाचित्रणकौशल्य फार अधिक आहे. एक दोन ठिकाणीं वर्णनांत उत्तान शृंगार आहे. तथापि साकल्याने वाचकावर जो परिणाम होतो तो इष्ट आणि चांगलाच असतो, यांत शंका नाही. श्री. कवठेकरांच्या 'उमाडलेल्या भावना' या आगामी कादंबरीबद्दल उत्सुकता जागृत होईल, असाच त्याचा हा कथासंग्रह आहे.

चिंतामण गणेश कर्वे

# खरा उद्धार

[ ले० रामतनय, मूल्य कागदी १॥ रुपाया, कापडी २ रु., प्र. आर्यसंस्कृति मुद्रणालय. ]

'खरा उद्धार' ही कादंबरी निवळ मनोरञ्जनासाठी लिहिलेली नाही. आपल्या निवेदनांत लेखक रामतनय हे म्हणतात की, वाचकांना खेड्यांच्या खऱ्याखुऱ्या समाजस्थितीचा बोध होण्यास साह्य होईल; अशा ठिकाणच्या अत्यन्त निकडीच्या विधायक कार्यांची बरीचशी कल्पना येईल; सध्याच्या मतमतान्तरांचा परिणाम अशा ठिकाणीं कोणता होऊं शकतो हें अस्पष्ट का होईना पण ध्यानीं येईल; नगरांतील नवशिक्षितांच्या नि खेड्यांतील निरक्षर जनतेच्या विशिष्ट विचारांची नि भावनांची थोडीबहुत तुलना करितां येईल; आणि वर, आबालवृद्धांची करमणूक होऊन त्यांना सात्त्विक आनन्द वाटेल अशा प्रकारें या कादंबरीची मांडणी करण्याच्या प्रयत्न केला आहे. या प्रयत्नाला चांगलेंच यश आलें आहे. 'खरा उद्धार' ही कादंबरी जशी चटकदार तशीच उद्बोधक झाली आहे.

खेड्यातील जीवनाचें चित्र काढणाऱ्या ज्या कादंबऱ्या पूर्वीच झालेल्या आहेत त्यात या कादंबरीने एक महत्त्वाची भर टाकिली आहे; कारण, रामनतयांची भूमिका एखाद्या विशिष्ट ऐकान्तिक मताच्या प्रचारकाची नाही. त्यांच्यांत समतोलपणा आहे. सध्या ग्रामोद्धाराची एक राजकीय टूम सोडून देण्यात आली आहे. अशा वेळीं खरा उद्धार करण्यासाठी समाजसेवेचें व्रत घेतलेल्या एका त्यागी तरुणाला खेड्यांत कोणते बरेवाईट अनुभव आले त्यांचें या कादंबरींत सरळ, वास्तविक आणि हृदयस्पर्शी वर्णन आहे. परंतु ग्रामोद्धाराच्या मार्गांत येणाऱ्या अडचणींचा प्रश्न साप्रत कितीहि निकडीचा वाटला तरी वाङ्मयाच्या दृष्टीने तो तात्कालिक महत्त्वाचाच आहे. यामुळे अरविन्दाचे पात्र कितीहि धीरोदात्त असलें तरी तें तितकेंसें भरदार नि मानुष वाटत नाही. तो 'देवमाणूस'च वाटतो ! त्याच्याविषयी आम्हा मानवांना कितीहि आदर वाटला तरी तितकासा आपलेपणा वाटूं शकत नाही. श्रीपति हें पात्रहि असेंच धीरोदात्त आहे. पण त्याच्यात मानवता अधिक दिसते. शेटजी, बळीराम पाटील, आणि कष्टाळु पापभीरु भोळा सखाराम हीं पात्रें जवळ जवळ ठरीव ठशाचींच वाटतात. परन्तु विमल, जिजा, चिमा, बच्चा आणि गोप्या महार हीं पात्रें कशीं जिवंत ओळखीचीं वाटतात ! रामतनयांनी पात्रांची निर्मिति अशा कुशलतेने केली आहे की श्रीपति नि बच्चा, मधुकर नि अरविन्द, वा अरविन्द नि भाई भय्यासाहेब, विमल नि जिजा, चिमा नि राधा यांची एकमेकांशीं तुलना होऊन त्यांचे स्वभावविशेष परस्परविरोधाने उठून दिसावेत. जिजेचें अव्याज निष्पाप माधुर्य जितकें हृदयङ्गम तितकेंच सुसंस्कृत विमलचें दोलायमान झालेलें प्रेम कुतूहलजनक वाटतें. प्रेमळ सहिष्णुता हीच राधेची वृत्ति, तर आपल्या सङ्कुचित दृष्टीला जें योग्य वाटेल तें भोळेपणाने पण निश्चयी धडाक्याने करून टाकणें ही चिमाची वृत्ति असते. श्रीपति जितका निष्काळजी तितकाच शूर नि शहाणा, तर बच्चा हा जितका अजाण तितकाच आडदांड आडमाडू असतो. या विविध पात्रांत जिजा हें पात्र कितीहि ललित नि हृदयङ्गम वाटलें तरी चिमा हें पात्र अत्यंत संस्मरणीय वाटतें; कारण तें वैशिष्ट्यपूर्ण आहे.

पाटलाच्या गडी पाणी भरायला येतो तो प्रसंग, शेटजींच्या दुकानांत बस्त्याचा सौदा ठरविण्याचा प्रसंग, इत्यादि अनेक प्रसंग कादंबरीकाराने चटकदार रीतीने वर्णिले आहेत.

"प्रेमावांचुन सर्व सुनें । जग भासें बापुडवाणें" असें बालकवींनी म्हटलें आहे; परन्तु श्रीपति नि जिजा यांना कविप्रिय असा प्रणयानुनय करायला फारशी सवडच नव्हती. तीं आपआपल्या परी महत्त्वाच्या कार्यांत मग्न होतीं. पण त्यांचें एकमेकावर तारुण्यसुलभ नि उत्कट प्रेम होतें; आणि त्याच्या प्रेमाचा ओघ हा हिरवळींतून लपत छपत जाणाऱ्या निर्झराप्रमाणे निर्मल नि आल्हादकारक वाटतो. या कादंबरींतील संवाद हे पात्राच्या स्वभावविशेषांचा परिपोष करतील असेच आहेत. पण एरव्हींची वर्णनाची भाषा अगदीच साधी आहे. ती आहे तितकीच प्रसन्न पण अधिक रमणीय असती तर वाङ्मयदृष्ट्या तें अधिक श्रेयस्कर झालें असतें. 'मोहित्यांची मञ्जुळा' या कादंबरीपेक्षा 'खरा उद्धार' या कादंबरींत लेखनकौशल्य कितीतरी अधिक प्रतीत होतें. पात्रें कळसूत्री बाहुल्यांप्रमाणे न वाटता जिवंत माणसे गमतात. ज्या जीवनाचें त्यांना अन्तर्बाह्य ज्ञान आहे त्या जीवनावर अधिष्ठित असलेल्या कादंबऱ्या रामतनय जर अशा सरस रीतीने लिहीत जातील तर आजच्या सुप्रतिष्ठित कादंबरीकारात ते अधिक नामवन्त होतील, याविषयी मला शंका वाटत नाही. खेड्यातील जीवनाचें सम्यग्ज्ञान त्यानी सखोल सहानुभूतीने आत्मसात् करून घेतलेलें दिसते; आणि शाश्वत वाङ्मयाचा उगम अशाच सम्यग्ज्ञानांतून होत असतो.

या कादंबरींत दोष नाहीत असें नाही. ते लेखकालाच दिसायला हवे होते. परन्तु येथे काही दाखवून ठेवतो. अरविन्दासङ्गतीं जिजा निघून जाते आणि गाडी सुटल्यावर चिमा नि बळीराम पाटील धक्क्यावरच चडफडतात. पाटील म्हणतात, "आता पोलीसना वर्दी देतों व त्या भामट्यांच्या माग भुङ्गा लावतों." बळी पाटील पुढे गप्प बसतो; पण तें त्याच्या भित्र्या स्वभावाला धरूनच होतें. पण चिमाने आपल्या पाल्य तरण्या ताठ्या पोरीच्या प्रकरणीं अरविंदावर विश्वासावें—तो काही अद्याप 'देवमाणूस' ठरला नव्हता—आणि स्वस्थ राहावें हें तिच्या तडफदार कर्त्या स्वभावाला धरून मुळीच नाही. त्याचप्रमाणे भय्यासाहेबांची प्रेम-याचना पूर्णपणें निष्फळ झाल्यावर ते जर सोनगावाहून आणि कादंबरीतूनहि चालते झाले असते तर कांहींच बिघडलें नसते. त्याना विलक्षण दुखणें आणून, आणि त्यांची नि त्यांच्या आईची अकल्पित भेट करवून ते दुखणें बरें करून, एक अनवश्यक अद्भुत घटना कादंब-रींत वर्णन करण्यापलीकडे कादंबरीकाराने काय साधलें तें काही ध्यानात येत नाही. त्याच-प्रमाणे बाळासाहेबाची पत्नी मरून त्यानी जिजाला मागणी घालावी आणि जिजाने मामलेदारीण होण्याची घरीं चालून आलेली सन्धि दवडून श्रीपतीला वरावें, हें सारें शेवटीं शेवटीं सांगून जिजाची अव्यभिचारिणी भक्तीच व्यक्त करावयाची होती, तर ती सुस्पष्टच होती. विमलचें मन चळलें तसें तिचें चळणें शक्यच नव्हते आणि एखादा मोह तिच्यापुढे ठेवावयाचाच होता तर त्या कामीं भय्यासाहेबाचाच उपयोग का नाही करून घेतला ? भय्यासाहेबाचें पात्र रंगविण्याला त्या प्रसङ्गाचें साह्यच झालें असतें.

पण मीं या दाखविलेल्या दोषाविषयी मतभेद सम्भवेल. एकंदरीने पाहतां रामतनय याची ही कृति खरोखरीच अभिनन्दनीय आहे. त्याना विद्यापीठाची पदवी नसेल पण तेवढ्या-साठी त्यानी आपला आत्मविश्वास ढळूं देऊं नये. उलटपक्षी काय आहे विद्यापीठाच्या पद-व्यात ? असेहि तुच्छतेने पुसूं नये. कारण, विद्यापीठाच्या परीक्षांसाठी का होईना पण निर-निराळ्या भाषातील आदर्शभूत कृतींचा जो परिचय होतो त्याचें मूल्य उपेक्षणीय नाही. पण जगातील उत्तम वाङ्मयीन कृतींचा अभ्यास करून आपली अभिरुचि नि कृति यांना सु-संस्कृत करायला काही विद्यापीठाची अनुज्ञा वा मुद्रा लागत नाही. पदव्यामुळेच वा वैयक्तिक

ओळखींच्या प्रभावाने मिळणारी सभास्थानांतील खुर्ची खेड्यांतील लेखकाला मिळावयाची कदाचित् राहील; पण जिवन्त वाङ्मयाला जनतेच्या हृदयात अढळपद मिळतेंच मिळतें, हें त्याने ध्यानांत धरावें. विलायतेला जाऊन आलेला ज्याप्रमाणे विलायतेला जाऊन आलेल्याची तळी उचलून धरतो—कारण तसें न केल्यास त्याचें स्वतःचेंच महत्त्व राहत नाही—त्याप्रमाणे विद्यापीठी पदवीधर हे अपदवीधरांना शाश्वत वाङ्मय निर्माण करतां येणार नाही असें आपलें मत जरी आपल्या वागण्याने सूचित करीत असले, तरी अपरा सृष्टि निर्माण करण्याचें ज्यांच्या अंगांत सामर्थ्य आहे अशा लेखकांनी अशा लब्धप्रतिष्ठ पण्डितांची निवळ कींवच करावी. ज्यांच्या तोडीचा कादंबरीकार महाराष्ट्रात अद्यापि झाला नाही असे हरि नारायण आपटे हे विद्यापीठाच्या सर्वोच्च परीक्षेचे परीक्षक झाले तरी स्वतः शेवटपर्यंत पदवीहीनच राहिले ! याचें त्यांना फार वैषम्य वाटावें असे प्रसंग केव्हा केव्हा घडत असें म्हणतात. वैषम्य वाटणें स्वाभाविक आहे. परन्तु त्या काळापेक्षा आजचा काळ अधिक उदारमतवादी आहे हें हरि नारायण आपटे, नारायण विनायक कुलकर्णी, रामतनय इत्यादिकांनी विसरूं नये. कांही लोक स्वयंस्फूर्तीने कादंबऱ्या विकत घेऊन आवडीने वाचतात याहून अधिक तात्कालिक नि प्रामाणिक प्रशस्तिपत्र तें दुसरें कोणतें !

कोल्हापूर, ता. २४ जुलै १९३७ माधवराव पटवर्धन

---

**शाक्यमुनि गौतम** (श्री. सयाजी बालज्ञानमाला, पुष्प १२२, चरित्रगुच्छ २९ —लेखक व प्रकाशक : चिंतामण विनायक जोशी, पाली भाषाध्यापक, बडोदें कॉलेज ; किंमत सहा आणे.)

हें छोटेखानी पुस्तक लिहून प्रो. चिं. वि. जोशी ह्यांनी बालवाङ्मयांत उपयुक्त भर टाकली आहे. शाक्यमुनि गौतम बुद्ध ह्याच्या चरित्रासंबंधीची माहिती तेरा प्रकरणांत दिली असून चौदाव्या प्रकरणांत लेखकाने आपल्या एकपानी प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणे बौद्धधर्मासंबंधाची माहिती लहान मुलांना समजेल एवढीच ठोकळ मानाने दिली आहे.

पुस्तकाच्या शेवटीं परिशिष्टें जोडलीं असून त्यांत 'विशाखा' नांवाच्या उपासिकेची सुंदर गोष्ट असून सारिपुत्त, मोग्गल्लान, महाकाश्यप, आनंद, महाकात्यायन ह्या शिष्यांचीं अल्पचरित्रें, बुद्धाशीं स्पर्धा करूं पाहणारा त्याचा चुलतभाऊ देवदत्त, शिष्यीण किसा गोतमी व बुद्धकालीन मगध देशाचे राजे बिंबिसार व अजातशत्रु, व कोसल देशाचा राजा पसेनदी ह्यांचीं त्रोटक चरित्रें दिलीं आहेत.

पुस्तकांत बुद्ध गयेच्या मंदिराचें चित्र देऊन बुद्धचरित्रांतील अद्भुत चमत्कारासंबंधीचीं चित्रेंहि जोडलीं आहेत मूळ पुस्तकातहि अद्भुत चमत्कारांच्या प्रसंगांचें वर्णन करून कांही ठिकाणीं ह्या अलंकारिक भाषेंत वर्णन केलेल्या अद्भुत प्रकाराचें बुद्धीस पटेल असें स्पष्टीकरणहि केलेलें आहे. उदाहरणार्थ पान ४७ पाहा. येथे 'मार म्हणजे अनेक प्रकारचे मोह व अडचणी' असें म्हटलें आहे.

एकंदरींत पुस्तक वाचनीय झालें असून किंमतहि पुस्तकाच्या आकाराच्या मानानें (पृष्ठें सुमारें १२० ) सहा आणे म्हणजे स्वल्पच आहे.

पु. वि. बापट

# कांही मनोरंजक चाली

वडाऱ्यांत पुरुषाचें प्रेत खळग्यांत ठेवल्यावर खळगा भरतांना पहिली माती टाकण्याचा अधिकार बायकोचा आहे. मुलगा मागून माती टाकतो.

* * *

कांही झारेकरी जातींत प्रत्येक जण आपलें निराळें जेवण करतो. दुसऱ्याच्या हातचें खात नाही.

* * *

कांही यजुर्वेदी लोकांत राणादेवीच्या (वडील मुलाच्या) मुंजीला आरंभ रविवारींच करावा लागतो.

* * *

वारली लोकांत बायको लग्न लावते, म्हणजे उपाध्याचें काम करते.

* * *

वडनगर ब्राह्मणांत एक बायको जिवंत असतां दुसरी करीत नाहीत.

* * *

मांजरीची वार शुभदायक मानतात म्हणून ती प्रयासाने मिळवून उंबरठ्याखाली पुरतात.

* * *

पालमांडु कोल्हाटी ह्यांच्यांत लग्नसंस्थाच नाही.

* * *

प्रसूतीनंतर तिसऱ्या दिवशीं कित्येक जातींत मोरीची पूजा करतात. ह्याला न्हाणीपूजन म्हणतात.

* * *

लग्न झालेली मुलगी पदर येण्यापूर्वी बापाकडे असतांना मेली तर तिच्या बापाला जांवयाचें दुसरें लग्न करून द्यावें लागतें. ही चाल कोल्हाटी लोकांत आहे.

* * *

ठाकूर घोडा अपवित्र समजतात; म्हणून गेल्या निवडणुकींत ज्यांचें चिन्ह घोडा होतें त्यास ठाकुरांचीं मतें मिळालीं नाहीत.

* * *

देव-देवकांत कुंभारणीचीं शस्त्रें ठेवून तीं पुजण्याची चाल कित्येक ब्राह्मणांत आहे.

* * *

आडिवऱ्यास देवदिवाळीच्या दिवशीं महार देवीच्या पायरीपर्यंत येऊन गुरवाने तेथे ठेविलेली तरवार उचलून घेऊन जातो.

* * *

रड्डी जातींत नवरा नवरी बैलावर बसून गृहप्रवेश करतात.

* * *

रड्डी जातींत एकदाच पुनर्विवाह करण्याची बायकांना परवानगी आहे.

* * *

कित्येक ब्राह्मण वर्षांतून आठ दिवस मुसलमान होतात. तेव्हा ते मशिदींत जाऊन राहतात.

* * *

मद्रास इलाख्यांत कित्येक ब्राह्मणांत दररोज दुपारीं १२ ते १ पर्यंत घराबाहेर राहून अस्पृश्यत्व पाळण्याची चाल आहे.

* * *

वांई प्रांतांत नागपंचमी सांगण्यास न्हावी नग्न होऊन गांवांत हिंडतो.

* * *

कांही वन्य जातींत नवऱ्यानें कोणाला तरी मारल्याशिवाय त्याच्याशीं स्त्री लग्न करीत नाही. मारलेल्या माणसाचें बोट वाळवून तें बायको आपल्या गळ्यांत बांधते.

* * *

सयामामध्ये बायकोचे पैसे घेतले नसल्यास तिला विकतां येतें.

* * *

मोताळा ब्राह्मणांत विवाहित मुलगी मेल्यावर तर्पणांत तिच्या नांवाचा उच्चार बापाच्या गोत्राने करतात.

* * *

आटपाडी महालांत लक्ष्मीला जोडे (पायपोस) वाहण्याची चाल आहे. चांभाराच्याच देवाला खेटरें मिळतात असें नाही.

* * *

रत्नागिरीच्या सांवतांत निजतांना गादीखाली कांही तरी घातल्याशिवाय निजूं नये अशी समजूत आहे. म्हणून गवताची काडी निजण्याच्या गादीखाली घालून ते निजतात.

* * *

कर्नाटकांत माणसाच्या ढुंगणाची पूजा करतात.

* * *

कित्येक जातींत एक दिवस बायका नागव्याने स्वयंपाक करतात.

* * *

ना. गो. चापेकर

---

चुकीची दुरुस्ती— 'पत्रिके'च्या एप्रिल १९३७ च्या अंकांत पृष्ठ २८ वरील मजकुरांतील १ ल्या ओळींत 'genitive' हा शब्द चुकीने पडला आहे. या शब्दाऐवजी 'Instrumental' हा शब्द पाहिजे. तसेंच पृष्ठ २९ वरील शेवटच्या ओळींत 'Local' हा शब्द आहे. त्याऐवजी 'Logical' असें वाचावें.— संपादक

क्षणचित्रें--[ले. भ. दि. गांगल; प्र. द. म. सुतार, अग्यारी रोड, ठाणें; किं. १ रु.]

या लघुकथासंग्रहाला 'क्षणचित्रें' हें नांव फारच शोभतें. क्षणोक्षणीं नजरेस पडणारीं किंवा स्मृतिपटलावर क्षणभर टिकणारीं चित्रें म्हणजेच लघुकथा. अशीं नऊ चित्रें प्रथितयश कथालेखक श्री. गांगल यानी बारीक कुंचलीनें रेखाटून, १ भाबडी श्रद्धा, २ कुलीन स्त्रीला सिनेमानटीचें काम करण्याचा होणारा कलात्मक मोह, ३ खऱ्या धर्मशीलतेशिवाय श्राद्धादि धर्म-कृत्यें करणें, ४ कुटुंबासाठी केलेल्या स्वार्थत्यागाचें चीज न होणें, ५ पहिलें अविचारी लेखन (नवशिक्या लेखक), ६ नवीन रूढ होणाऱ्या प्रेमविवाहांतील अपुरेपणा (प्रियाराधन आणि विवाहयाचना यांचा), ७ डॉक्टर-नर्सेस यांचें अभक्ष्य प्रेम, ८ विधवांची कुचंबणा, व ९ स्त्रीस्वभावजन्य दोष (सावत्रपणा), या समाजजीवनातील व्यंगाचें नाजूक आविष्करण केलें आहे. कोणावरहि (कथातील पात्रांवर सुद्धां) टीका न करता नुसते प्रसंग आणि एकापुढे एक होत जाणाऱ्या क्रिया वर्णिल्या आहेत.

शृंगार आणि नर्मविनोद याच्या जागजागीं सहज रीतीनें ज्या छटा उमटतात त्यांमुळे वाच-तांना आनंद होतो; हंसू येतें. त्याबरोबरच आत्मीयता आणि प्रेमलाघव यांनी वाचक पात्रांशीं एकरूप होतो व त्याच्या ठिकाणीं त्यांचेच विकार उठतात. पात्रमुखी आत्मकथापद्धति अवलं-बिल्याकारणानें सत्याचा चागलाच आभास उत्पन्न होतो. तेव्हा या नवकथा किती मनोरंजक आणि उद्बोधक झाल्या आहेत हें सागावयासच नको.

प्रसंगाची पार्श्वभूमि आणि भावी घटनाची सूचना हीं देण्यांत लेखकाचें कौशल्य प्रतीत होतें (उदा. पृ. २०, ५२, ११४). कथानकाचा मागील धागा पुढे आणण्यासाठी पत्राचें साहाय्य घेतलें आहे तें जास्त झालेलें दिसतें. पत्रें अशीं नसतात (उदा. वसंताचें पत्र). या कथांतील सारेच स्त्रीपुरुष श्रीमंत किंवा वरच्या मध्यम वर्गातील आहेत, तेव्हा ते समा-जाच्या एका लहानशा क्षेत्रातच आपणांस भेटतील. पुष्कळास त्याच्या जीवनाचा परिचयहि नसणार खरें. तथापि असलें उच्च प्रतीचें लघुकथावाङ्मय ज्यांना कळेल असे वाचकहि थोडेच असणार. आणा दोन आणे मालांतील गोष्टीच बहुजनाना प्रिय! असो. लघुकथा-प्रातात श्री. गागल हे बरेच पुढे जाऊन बिनीवाल्यांचा रांगेंत उमे आहेत. तेव्हा विस्तृत अनुकूल परीक्षणानें त्यांना प्रोत्साहन द्यावें असें नाही. भिन्न जीवनव्यवसाय सांभाळून फावल्या वेळीं हौशीखातर ते अशीं चित्रें काढतात तेव्हा उपजत गुणच त्यांनी वाढीला लाविला आहे हें खास. तेव्हा सुशिक्षित कथावाचकवर्ग त्यांच्याकडून आणखी कथांची अखंड अपेक्षा करीत राहणार यांत शंका नाही.

प्रस्तावनेंत श्री. के. नारायण काळे यांनी साहित्यातील विरोध-विकासवाद आणि लघुकथां-तील भिन्न प्रकार यांविषयी मांडलेले विचार वाचनीय आहेत.

चिंतामण गणेश कर्वे

# परिषद्वार्ता



## नियामक मंडळाची सभा

नियामक मंडळाची सभा १ जून १९३७ या तारखेस परिषदेच्या कार्यालयांत सायंकाळीं ५॥ वाजतां भरली होती. परिषदेचे अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर हे अध्यक्षस्थानीं होते. सभेस पुढील ३० सभासद आले होते :—

शांताबाई कशाळकर, ग. गं. जांभेकर, वा. वि. जोशी, वा. गो. मायदेव, श. वा. रानडे, ना. के. बेहेरे, मा. दा. अळतेकर, न. चिं. केळकर, शं. पु. आघारकर, वा. म. जोशी, ना. के. भागवत, भा. रा. पटवर्धन, प्र. के अत्रे, रा. दा. देसाई, अ. ना. भालेराव, न. का. घारपुरे, कृ. ग. लिमये, ध. रा. गाडगीळ, मो. शा. शहाणे, मथुराबाई द्रविड, के. ना. काळे, शं. दा. पेंडसे, द. वा. शिंदोरे, लालजी पेंडसे, मा. वि. किबे, मा. त्रिं. पटवर्धन, कमलाबाई किबे, दि. वि. काळे, कृ. पां. कुलकर्णी व र. लु. जोशी.

२. मागील सभेचा वृत्तांत वाचून झाल्यावर निश्चित करण्यात आला. लिपिसमिति व व्याकरणसमिति यांच्या अहवालांसंबंधी अद्याप सूचना आल्या नाहीत त्या मागविण्याची पत्रिकेच्या येत्या अंकीं व्यवस्था होईल असें चिटणिसांनी आश्वासन दिलें. श्री. श्री. म. वर्दे व श्री. य. रा. दाते यांजकडून सभेस येणें शक्य नसल्याबद्दल दिलगिरीवजा पत्रें आल्याचें चिटणिसांनी सांगितलें.

३. कार्यकारी मंडळाने सादर केलेला परिषदेचा १९३६-३७ चा वृत्तांत मान्य करावा अशी सूचना प्रो. वा. म. जोशी यांनी केली व श्री. कृ. ग. लिमये यानी त्यास अनुमोदन दिलें. खालील शाब्दिक फेरफारानंतर ही सूचना सर्वानुमतें मान्य करण्यांत आली :—

शेवटच्या पृष्ठावरील ४ थी ओळ—'दिली' हा शब्द गाळून 'देऊं केली आहे' हें शब्द घालावे.

४. १९३६-३७ या वर्षाचा जमाखर्च व ताळेबंद मंजूर करण्यांत यावा असें प्रि. ध. रा. गाडगीळ यांनी सुचविलें व श्री. द. वा. शिंदोरे यांनी त्यास अनुमोदन दिल्यानंतर पुढील फेरफारांसह सूचना सर्वानुमतें मान्य करण्यांत आली :—

जमाखर्च, स्तंभ १ ला—'संमेलन देणगी' या शब्दापूर्वी 'इंदूर' हा शब्द घालावा.

जमाखर्च, स्तंभ २ रा—'पारितोषिक' हा शब्द गाळून 'कारकुनास देणगी' हे शब्द घालावे.

जमाखर्च, स्तंभ ३ रा—'प्रचार' या शब्दाऐवजी 'प्रचाराकरिता प्रवासखर्च' हे शब्द योजावे.

५. चालू वर्षासाठी जुन्या कार्यकारी मंडळाने तयार केलेलें अंदाजपत्रक नवीन कार्यकारी मंडळाने सुचविलेल्या दुरुस्तीसह (उपसमितीचा खर्च रु. २५ ने वाढवून) सभेपुढे मांडण्यात आलें. साधारण सभासदांच्या वर्गणीसंबंधी अंदाजी उत्पन्न रु. ६०० याऐवजी रु. ७५० दाखवावें अशी डॉ. शं. पु. आघारकर यांनी सूचना केली व त्यास श्री. के. ना. काळे यांनी

अनुमोदन दिलें. सूचना मतास घालतां सभेस मान्य झाली नाही. नवीन सभासदांच्या वर्गणी-दाखल अंदाजी उत्पन्न रु. ५६५ अधिक असून रु. १८५ हा आंकडा अंदाजपत्रकांत दाखवावा अशी सूचना श्री. के. ना. काळे यांनी सभेपुढे मांडली व डॉ. शं. पु. आघारकर यांनी त्यास अनुमोदन दिलें. ही सूचनाहि सभेने मान्य केली नाही. तहहयात सभासदांच्या वर्गणीची रकम ट्रस्टींकडे लागलीच का पाठविली नाही असा प्रश्न डॉ. आघारकर यांनी उप-स्थित केला. खजिनदार प्रि. गाडगीळ यांनी डॉ. आघारकर यांचें तत्त्व मान्य करून परिस्थिती-मुळे तसें कां करतां आलें नाही याजबद्दल सविस्तर खुलासा केला. या विषयावरील चर्चा लांबल्यामुळे ती आता थांबविण्यांत यावी अशी सूचना प्रि. प्र. के. अत्रे यांनी केली व सभेस ती मान्य झाली. यानंतर सादर केलेलें अंदाजपत्रक मान्य करावें असें प्रि. गाडगीळ यांनी सुचविल्यावरून व प्रो. जोशी यांनी अनुमोदन दिल्यानंतर सूचना सर्वानुमतें मान्य करण्यांत आली.

६. गतवर्षी आलेल्या तहहयात सभासदांच्या वर्गणीपैकी निम्म्या वर्गणीइतकी रकम, म्हणजे रु. २१२-८-०, त्या वर्षाच्या चालू खर्चाकरिता मंजूर करावी अशी सूचना प्रि. गाडगीळ यांनी सभेपुढे माडली व त्यास श्री. कृ. पां. कुलकर्णी यांनी अनुमोदन दिलें. डॉ. शं. पु. आघारकर यांनी या सूचनेस विरोध केला. मतास घालता डॉ. आघारकर यांचें एकच मत विरुद्ध पडून सूचना मान्य करण्यांत आली.

७. घटना नियम ४९ यांत निर्दिष्ट केलेलें संपादकमंडळ खालील सभासदांचें निवडण्यांत आलें :—

प्रो. द. वा. पोतदार, प्रो. ना. के. बेहेरे, श्री. श्री. म. वर्दे, प्रो. मा. त्रिं. पटवर्धन, व श्री. लालजी पेंडसे.

८. श्री. मो. शा. शहाणे यांनी २६-५-३७ या तारखेस भरलेल्या जाहीर सभेंत झालेला आक्षिप्त वाङ्मयसंबंधी ठराव वाचून दाखविला, तो असा :—

(१) "ज्या पक्षीं, मुद्रणनिर्बंधक जे कायदे सांप्रत जारी आहेत त्यांमुळे वाङ्मयप्रसारास व ज्ञानप्रसारास निष्कारण अडथळे उत्पन्न होत आहेत असा अनेकपरी अनुभव आला आहे, आणि ज्या पक्षीं सर्व लोकतंत्र देशांप्रमाणे हिंदुस्थानांतहि मुद्रणप्रकाशन स्वतंत्र असलें पाहिजे असें या सभेचें ठाम मत आहे, त्या पक्षीं, पुणेकर नागरिकाची ही जाहीर सभा असा ठराव करीत आहे की, मुद्रणप्रकाशनाविषयक सर्व जाचक निर्बंध ताबडतोब दूर करून व जप्त झालेल्या वाङ्मयाचा फेरविचार करून विचार व उच्चार यांचें स्वातंत्र्य स्थापित करण्यांत यावें.

(२) या ठरावाची प्रत मुंबई सरकार, हिंदुस्थान सरकार, भारतमंत्री व मुंबई कायदे मंडळाचे सभासद यांचेकडे पाठविण्यांत यावी व ती सर्वत्र प्रसिद्ध करण्यांत यावी."

या ठरावासंबंधी खालील सूचना श्री. शहाणे यांनी सभेपुढे मांडली व त्या सूचनेस प्रि. अत्रे यांनी अनुमोदन दिल्यानंतर ती मान्य करण्यांत आली :—

"(१) विशेष सभेंत झालेला ठराव परिषदेच्या शाखासभा व संलग्न संस्था यांनीहि पुन्हा करून सरकारकडे पाठवावा.

(२) आक्षिप्त वाङ्मयासंबंधी सरकारकडे शिष्टमंडळें पाठविण्याचें ठरल्यास त्यांशीं परि-षदेने सहकार्य करावे; त्यामध्ये परिषदेतर्फे अध्यक्ष, कार्याध्यक्ष, व त्या त्या प्रांतांतील शाखा-सभेचे अध्यक्ष याचा अंतर्भाव व्हावा."

९. इमारतफंडास देणग्या देणाऱ्यांस सभासदत्वाचे हक्क देण्याविषयी कार्यकारी मंडळाने केलेल्या शिफारशीवर चर्चा झाल्यानंतर प्रि. ध. रा. गाडगीळ यांनी खालील सूचना सभेपुढे

मांडली व या सूचनेस श्री. ग. गं. जाभेकर यांनी अनुमोदन दिलें :—

"नियामक मंडळ पुढीलप्रमाणे साधारण सभेस शिफारस करीत आहे :—

परिषदेच्या इमारतफंडास ५० किंवा अधिक रुपये देणगी देणाऱ्यास देणगीच्या रकमे-प्रमाणे परिषदेचे सभासद समजण्यात यावें."

श्री. मो. शा. शहाणे यांनी अशा देणगी देणाऱ्यास मात्र तहहयात सभासद समजण्यांत यावें अशी उपसूचना केली; परंतु चर्चेनंतर ती परत घेण्यात आली. मतांस घालतां प्रि. गाडगीळ याची सूचना मात्र ५ सभासदाचीं मतें विरुद्ध पडून मान्य करण्यांत आली.

१०. यानंतर चिटणिसांनी श्री. मो. शा. शहाणे याजकडून ३०-५-३७ या तारखेस आलेलें पत्र वाचून दाखविलें. या पत्रात प्रो. चिं. वि. जोशी यांनी कार्यकारी मंडळावर केलेल्या असत्य आरोपांचा निषेधवजा ठराव मांडण्याबद्दलची विनंती होती. हा वादग्रस्त प्रश्न असल्यामुळे पूर्वसूचनेच्या अभावीं असला ठराव विचारात घेतां येत नाही असा अध्यक्षांनी निर्णय दिला. श्री. शहाणे यांनी हीच पूर्वसूचना समजून हा ठराव पुढील सभेपुढे मांडण्यांत यावा अशी विनंती केली.

११. मागच्या कार्यकारी मंडळाचे व अधिकाऱ्यांचे आभार मानण्यांत आले.

हीं कामें झाल्यानंतर अध्यक्षांनी सभा विसर्जन केली.

## कार्यकारी मंडळाच्या सभा

**ता. २५ एप्रील १९३७**—डॉ. श्री. व्यं. केतकर यांच्या निधनाबद्दल ठराव करण्यांत आला तो असा— "महाराष्ट्रातील पहिल्या दर्जाचे साहित्यिक ज्ञानकोशकार डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर याच्या अकाली निधनाबद्दल परिषदेच्या कार्यकारी मंडळास अतिशय दुःख होत आहे. डॉक्टरसाहेबांची अचाट बुद्धि, कल्पकता, संस्थासंघटनाकौशल्य आणि अपूर्व आणि अफाट ग्रंथकर्तृत्व यांमुळे महाराष्ट्राच्या साहित्यात फार नवीन व मोठी भर पडली आहे. त्यांच्या निधनामुळे महाराष्ट्राची झालेली हानि लवकर भरून निघण्यासारखी नाही."

परिषदेच्या ग्रंथालयास कै. हरि नारायण आपटे यांचें नाव देण्याविषयी ठराव करण्यांत आला.

**ता. ११ मे १९३७**–१९३६–३७ चा परिषदेचा अहवाल व हिशेब व पुढील वर्षा-साठी तयार केलेलें अंदाजपत्रक यास मान्यता देण्यात आली.

**ता २३ मे १९३७**—नवीन कार्यकारी मंडळाच्या निवडणुकीबाबत मतपत्रिकांची तपासणी होऊन सभासद निवडून आले ते याप्रमाणे— र. लु. जोशी, मा. त्र्यं. पटवर्धन, यं. रा. दाते, कृ. पां. कुळकर्णी, मा. दा. अळतेकर, ग. गं. जाभेकर, कृ. ग. लिमये व ना. के. बेहेरे.

**ता १ जून १९३७**—या नवीन कार्यकारी मंडळाच्या पहिल्या सभेंत चिटणीस म्हणून प्रो. ना. के. बेहेरे व रा. सा. र. लु. जोशी याम निवडण्यात आलें. माजी कार्याध्यक्षासंबंधी पुढील ठराव करण्यांत आला—

"श्री. नानासाहेब चापेकर यांनी साहित्यपरिषदेच्या कार्याध्यक्षाची सूत्रें आपल्या हातांत १९२७ सालीं घेतलीं, व ता. १ जून १९३७ या दिवशीं तीं तदनंतरच्या कार्याध्यक्षाच्या स्वाधीन केलीं. दहा वर्षांच्या या अवधींत त्यांनी आस्थेने, निरलसपणें व संस्थेच्या हिताकडे

व प्रगतीकडे स्वार्थत्यागपूर्वक लक्ष ठेवून बहुमोल कार्य केलें आहे. औंधचे अधिपति श्रीमंत राजे बाळासाहेब पंतप्रतिनिधि यानी परिषदेस अत्यंत सवलतीच्या अटीवर जागा दिली त्यास नानासाहेबांचे प्रयत्न पुष्कळ अंशीं कारणीभूत झाले आहेत; त्याचप्रमाणे या जागेवर संस्थेच्या मालकीची लहानशीच पण दुमदार इमारत झाली आहे त्यालाहि त्यांचेच अविश्रांत प्रयत्न पुष्कळ अंशीं कारणीभूत झाले आहेत. त्यांच्या अधिकाराच्या कालावधींत संस्थेच्या उपयुक्तेत आणि कीर्तीत संस्मरणीय भर पडली आहे हें त्याना भूषणावह आहे आणि परिषदेच्या सर्व हितचिंतकास आनंददायक आहे. त्यांच्या अनेकविध सेवेबद्दल परिषद् त्यांची सदैव ऋणी राहील. त्यांच्या सल्लामसलतीचा आणि सहकारितेचा आणखी पुष्कळ वर्षे लाभ मिळेल अशी परिषदेस आशा आहे."

परिषदेने योजिलेल्या वार्षिक परीक्षा अवधि थोडा असल्यामुळे दसऱ्याऐवजीं पाडव्याच्या सुमारास घ्याव्या असें ठरून परीक्षासंबंधी सविस्तर योजना करण्यास पुढील समिति नेमण्यांत आली —

प्रो. ना. के. बेहेरे (संयोजक), प्रो. वा. म. जोशी, प्रो. मा. दा. अळतेकर, प्रो. मा. त्रिं. पटवर्धन व श्री. कृ. पां. कुलकर्णी.

पुढील साहित्य संमेलनासाठी मुंबई मराठी साहित्यसंघ या संलग्न संस्थेचें आमंत्रण स्वीकारण्यांत आलें. यानंतर आक्षिप्त वाङ्मयविषयक ठराव करण्यांत आला तो असा —

"(१) विशेष सभेंत झालेला ठराव परिषदेच्या शाखासभा व संलग्न संस्था यांनीहि पुन्हा करून सरकारकडे पाठवावा;

(२) आक्षिप्त वाङ्मयासंबंधी सरकारकडे शिष्टमंडळें पाठविण्याचें ठरल्यास त्यांशीं परिषदेने सहकार्य करावें; त्यामध्ये परिषदेतर्फे अध्यक्ष, कार्याध्यक्ष व त्या त्या प्रांतातील शाखासभेचे अध्यक्ष यांचा अंतर्भाव व्हावा."

ता १८ जुलै १९३७:—संमेलनाध्यक्षासाठी परिषदेच्या सभासदानी सुचविलेलीं १३ नांवें सभेंत सादर करण्यात आलीं.

**संमेलन**—जळगाव संमेलनाने परिषदेस १०१रु. ची देणगी दिली. पुढील संमेलन ईस्टरच्या सुट्टीच्या सुमारास मुंबई येथे मुंबई मराठी साहित्यसंघातर्फे भरण्याचे निश्चित झालें आहे. संघाने संमेलनाचें कार्य चालवण्यासाठी नियम केले आहेत ते खाली दिले आहेत. संमेलनाच्या कार्यासाठी डॉ. अ. ना. भालेराव, श्री. दि. वि. अभ्योणकर, श्री. लालजी पेंडसे व श्री. श्री. म. वर्दे यास सरचिटणीस व डॉ. भा. सी. सुकथनकर यास खजिनदार नेमण्यात आलें आहे.

## मुंबई मराठी साहित्यसंघाचे संमेलनविषयक नियम.

म. सा. परिषदेच्या संमेलनविषयक ५२ ते ७६ नियमाप्रमाणे संमेलन भरविणारी संस्था या नात्याने २२ व्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाकरिता मुंबई मराठी साहित्यसंघाची त्या कामाकरिता भरविण्यात आलेली खास साधारण सभा पुढील नियम करीत आहे.

(१) म. सा. परिषदेचे संमेलनविषयक विद्यमान असलेले नियम, व संघाने त्याकरिता केलेले नियम मान्य करून, तीन रुपये वर्गणी देणाऱ्या १८ वर्षांवरील कोणाहि मराठी भाषा बोलणाऱ्या व्यक्तीस प्रतिनिधि होता येईल.

(२) पांच किंवा अधिक रुपये देणारास स्वागतमंडळाचा सभासद समजण्यांत येईल. स्वागतमंडळाचे सभासद प्रतिनिधि असतील.

(३) म. सा. परिषदेच्या संमेलनविषयक ५५, ५८ (इ) व ६२ नियमांप्रमाणे संघास प्राप्त झालेल्या अधिकारापैकी संमेलनाध्यक्ष निवडणें, स्वागताध्यक्ष निवडणें व विषयनियामक मंडळावर १० सभासद निवडणें हे अधिकार संघ स्वागतमंडळास पुढीलप्रमाणे देत आहेः—

(अ) स्वागतमंडळाच्या कोणत्याहि सभेच्या दिवसापर्यंत पटावर स्वागतमंडळाचे सभासद असतील त्यांस त्या सभेत मत देण्याचा अधिकार प्राप्त होईल.

(आ) स्वागतमंडळाची १ ली सभा ता. १ नोव्हेंबर १९३७ नंतर भरेल, व त्या सभेत स्वागताध्यक्षाची निवडणूक होऊन संमेलनाचे दिवस, जागा व वेळ ठरविणें वगैरे कामाचा विचार होईल. (म. सा. प. पत्र एप्रील ३८ अखेरच्या आत, शक्य तर ईस्टरमध्ये भरवावे)

(इ) संमेलनाध्यक्ष निवडण्यासाठी भरावयाची स्वागतमंडळाची सभा ३१ डिसेंबर १९३७ नंतर भरेल.

(ई) संघातर्फे व स्वागतमंडळातर्फे विषयनियामक मंडळावर निवडून द्यावयाचे सभासद संमेलनाच्या तारखेपूर्वीच्या १५ दिवसांचे आंत निवडण्यांत येतील.

(४) संमेलनाचे प्रतिनिधि झालेले संघाचे कार्यकारी मंडळाचे सभासद, व वाटल्यास संमेलनाच्या कामाकरिता त्यानी स्वीकृत केलेले प्रतिनिधींपैकी २० पर्यंत सभासद मिळून स्वागतमंडळाचें व संमेलनाचें कार्यकारी मंडळ असेल. स्वीकृत सभासदांपैकी निम्मे सभासद स्वागतमंडळाच्या सभासदांतून स्वीकृत केले जातील.

(५) संमेलनाच्या कार्यकारी मंडळाने आपल्या कामकाजाकरता, म. सा. परिषद् व मुं. म. सा. संघ याच्या संमेलनविषयक नियमाना अविरुद्ध असे पोटनियम करावे.

(६) कोणत्याहि कारणाने संघाच्या कार्यकारी मंडळाच्या सभासदाचें त्या मंडळावरचें सभासदत्व रद्द झालें तर संमेलनाच्या कार्यकारी मंडळावरचें त्याचें सभासदत्वहि आपोआप रद्द होईल व त्याच्या जागीं येणारा सभासद ती जागा घेईल.

(७) स्वीकृत सभासदांपैकी रिकामी झालेली जागा भरून काढण्याचा अधिकार संमेलनाच्या कार्यकारी मंडळाला राहील.

(८) संमेलनाचे अंदाजपत्रक, जमाखर्च, पैशासंबंधी सर्व व्यवहार, अहवाल व संमेलनाबाबतचे संघाकडे असलेले इतर सर्व अधिकार संघाच्या कार्यकारी मंडळाकडे सोंपविण्यांत येत आहेत. संमेलनाच्या जमाखर्चांतून शिल्लक राहिलेल्या पैशाचा विनियोग करण्याचा व तूट आल्यास ती भरून काढण्यासाठी योग्य ती व्यवस्था करण्याचा अधिकार संघाकडे राहील.

(९) संघाचे दोन चिटणीस व संमेलनाच्या कार्यकारी मंडळाने आपल्या सभेत निवडलेले आणखी तीन कार्यकारी मंडळाचे सभासद, संमेलनाचे सर चिटणीस राहतील. यांखेरीज संमेलनाच्या निरनिराळ्या कार्यांकरिता संमेलनाच्या कार्यकारी मंडळाला शाखापरत्वें चिटणीस नेमता येतील.

---

**इतर वृत्त—**

अष्टपैलू साहित्यिक व ज्ञानकोशकार डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर हे ता. १० एप्रील शनिवारी रात्रीं ससून इस्पिताळांत दिवंगत झाले. त्यांचें शव दुसऱ्या दिवशीं परिषदेच्या लहानशा सभागृहात ठेवण्यांत आलें होतें. लोकास सूचना देण्यास अवसर नसताहि त्यांचें अंत्यदर्शन घेण्यास गर्दी लोटली होती. गुणवर्णनपर भाषणें झाल्यानंतर प्रेतयात्रा परिषदेच्या इमारतीपासून काढण्यांत आली. परिषदेच्या पुढाकाराने ता. १९ एप्रील सोमवारीं सायंकाळीं नगराध्यक्ष श्री. भगत यांच्या अध्यक्षतेखाली नागरिकांची दुखवट्याची सभा भरविण्यांत आली. डॉ. केतकरांचे योग्य स्मारक करण्यास व त्याच्या अप्रकाशित ग्रंथांचें प्रकाशन करण्यास समिति नेमण्यांत आली-

ता. २५।६।३७ शुक्रवारीं बॅ. विनायकराव सावरकर यांचा परिषदेच्या इमारतींत सत्कार करण्यांत आला.

परिषदेच्या ग्रंथालयास कै. हरि नारायण आपटे यांचें नाव देण्यांत येऊन नामशिलेचा अनावरणसमारंभ ता. १५।७।३७ गुरुवारीं झाला. या प्रसंगीं श्री. अ. वि. पटवर्धन, पुणें, यांनी हरिभाऊंच्या सर्व ग्रंथांचा कापडी संच या ग्रंथालयास देणगीदाखल दिला.

इमारतफंडास श्रीमती रमाबाई आपटे यांनी आपल्या देणगीचा पहिला हप्ता म्हणून रु. ५००, मुंबईचे श्री. विठ्ठल दत्तात्रेय घाटे यांनी रु. २०० व श्री. कों. म. ऊर्फ दादासाहेब कुमठेकर यांनीं रु. ५० दिले.

परिषदेच्या कार्यालयास ता. २१ जून १९३७ सोमवारीं लखनौ विद्यापीठाचे कुलगुरु रँ. डॉ. र. पु. परांजपे यांनी भेट दिली व ते परिषदेचे तहहयात सभासद झाले.

## नवीन सभासद

### साधारण

१ श्री. श्रीकृष्ण रंगनाथ देशपांडे, मोमिनाबाद
२ ,, पुरुषोत्तम भास्कर भावे, नागपूर
३ ,, त्र्यंबक गंगाधर घनेश्वर, अहमदनगर
४ प्रो. राजाराम विनायक ओतूरकर, पुणें
५ कु. वेणूबाई पानसे, ,,
६ श्री. नीळकंठ वासुदेव किंकर, ,,
७ ,, रामचंद्र भास्कर भागवत, ,,
८ ,, श्रीपाद बाजी जोग, ,,
९ ,, गोविंद दत्तात्रेय जोगळेकर, ठाणें
१० ,, वामन दामोदर गाडगीळ, हैद्राबाद
११ श्री. यशवंत रघुनाथ आगाशे, सातारा
१२ प्रो. अवधूत महादेव जोशी, उज्जयिनी
१३ श्री. वि. मा. दि. पटवर्धन, पुणें
१४ प्रो. रघुनाथ श्रीधर जोगळेकर, नाशिक
१५ श्री. जनार्दन गोविंद पुंडलीक, पुणें
१६ प्रो नरहर गणेश दामले, ,,
१७ श्री. अनंत विनायक पटवर्धन, ,,
१८ ,, वासुदेव वामन हर्डीकर, हैद्राबाद
१९ बॅ. श्रीनिवास भीमराव शर्मा, ,,

### तहहयात

डॉ. रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे, लखनौ

# महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या परीक्षा

मराठी भाषेचा अभ्यास वाढावा या दृष्टीने म. सा. परिषदेने प्रतिवर्षी तीन परीक्षा घेण्याची योजना केली आहे. पहिल्या परीक्षेस प्राज्ञ, दुसरीस विशारद व तिसरीस आचार्य अशा पदव्या देण्यांत येतील. या परीक्षा प्रतिवर्षी दसऱ्याच्या सुमारास घेतल्या जातील. यंदा मात्र पुरेसा अवधि नसल्याने जानेवारी १९३८ व ऑक्टोबर १९३८ या महिन्यांत पहिली व दुसरी या दोनच परीक्षा घेण्याची व्यवस्था झाली आहे. १९३९ पासून तिन्ही परीक्षा घेण्यात येतील.

परीक्षांसंबंधी अटी व इतर माहिती खाली दिली आहे :—

## तारखा

### प्राज्ञपरीक्षा

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सोमवार ता. १७ जानेवारी १९३८... | १० ते १ | गद्य............ | प्रश्नपत्रिका | १ |
| ,, ,, | २ ते ५ | पद्य .......... | ,, | २ |
| मंगळवार ता. १८ जानेवारी १९३८... | १० ते १ | भाषा, व्याकरण, निबंध | ,, | ३ |

### विशारद परीक्षा

| | | | | |
|---|---|---|---|---|
| बुधवार ता. १९ जानेवारी १९३८... | १० ते १ | गद्य............ | प्रश्नपत्रिका | १ |
| ,, ,, | २ ते ५ | गद्य............ | ,, | २ |
| गुरुवार ता. २० जानेवारी १९३८... | १० ते १ | पद्य............ | ,, | ३ |
| ,, ,, | २ ते ५ | भाषा-साहित्य...... | ,, | ४ |
| शुक्रवार ता. २१ जानेवारी १९३८... | १० ते १ | निबंधलेखन...... | ,, | ५ |

**केंद्रें** — अमरावती, कोल्हापूर, नागपूर, पुणें व मुंबई. पुरेसे उमेदवार मिळाल्यास इंदूर, बडोदें, औरंगाबाद किंवा हैद्राबाद (दक्षिण) या शहरींहि केंद्रें ठेवण्यांत येतील.

**शुल्क** — प्राज्ञपरीक्षा—रुपये पाच; विशारदपरीक्षा—रुपये दहा. उमेदवारांनी पाठवावयाच्या अर्जाचा तक्ता परिषदेच्या कार्यालयातून मागवून घ्यावा. तक्ता व शुल्क (म. ऑ. ने) ही १ नोव्हेंबर १९३७ पूर्वी कार्यालयात पाठवावीं. या तारखेनंतर आलेल्या अर्जाचा विचार करण्यांत येणार नाही.

जानेवारी १९३८ मध्ये कोणत्याहि उमेदवारास प्राज्ञ व विशारद या दोन्ही परीक्षास एकाच वेळीं बसतां येईल. मात्र प्राज्ञ परीक्षेस बसल्याशिवाय कोणालाहि विशारद या परीक्षेस बसूं दिलें जाणार नाही. ज्याना दोन्ही परीक्षास बसावयाचें नसेल त्याना प्राज्ञ परीक्षेस बसतां येईल.

अभ्यासक्रम पूर्वीच प्रसिद्ध झाला आहे. त्यासंबंधी विशेष खुलासा खाली देत आहों :—

प्राज्ञपरीक्षा, प्रश्नपत्रिका २

(१) नवनीत-वेंचे:— एकनाथ – अंगदशिष्टाई
तुकाराम – शिवाजीराजास पत्र
वामन – नृसिंहावतार
रामदास – मनाचे श्लोक
मुक्तेश्वर – नारदनीति
श्रीधर – अभिमन्युवध
महिपति – एकनाथचरित्र
मोरोपंत – नलोपाख्यान, संशयरत्नमाला

विशारदपरीक्षा, प्रश्नपत्रिका ३

मोरोपंत – कर्णपर्व
महाराष्ट्र सारस्वत-भाग १ व २ (तृतीयावृत्ति)

परीक्षांसंबंधी अधिक माहिती पाहिजे असल्यास उत्तरादाखल पोस्टाचें तिकिट पाठवून ती प्रो. ना. के. बेहेरे, कॉंग्रेसनगर, नागपूर, यांजकडून मागवून घ्यावी.

ना. के. बेहेरे
र. लु. जोशी
चिटणीस, म. सा. परिषद

---

**आजकालच्या थोर विभूति**— [ले. गोपीनाथ गणेश तळवलकर; प्र. गोपाळ बळवंत जोशी, आनंद कार्यालय, पुणें; किं. ८ आणे ] 'आनंद' या बालमासिकातील (पुरवणीतील) चरित्रलेखमाला संपादकांनी जी गुंफिली होती ती आता पुस्तकरूपाने पुढे येत आहे. आजच्या जगातील थोर मंत्री-मुत्सद्दी, शास्त्रज्ञ, साहित्यिक आणि देशभक्त यांचीं एकतीस लहान चरित्रें–शब्दचित्रे यात आहेत. जपानातील कागावा, इंग्लंडातील बर्नार्ड शॉ, फ्रान्समधील रोमा रोला आणि जर्मनीतील ह्न्स्टिन यांची माहिती प्रौढ वाचकांना नव्याने होईल. इतरांची माहिती बहुधा असतेच. चरित्रें कंटाळवाणीं होत नाहीत. अशीच माला चालू ठेवून सामान्य प्रौढांना ज्यांची ओळखहि नसते अशा थोर व्यक्तींची ठळक माहिती देण्याचें उपयुक्त कार्य श्री. तळवळकरांनी करावें, अशी आग्रहाची विनंती आहे.

चिं. ग. कर्वे

# महाराष्ट्र साहित्य परिषद्, पुणें

# १९३६-३७ चा वृत्तांत

१९३६-३७ सालचा अहवाल नियामकमंडळास सादर करताना कार्यकारी मंडळास विशेष आनंद होत आहे. या आनंदाचीं मुख्य कारणें दोन : १ परिषद्संमेलनवाद मिटून सर्वानुमतें नवीन घटना जळगावास करण्यात आली व तिचा अंमल जानेवारी १९३७ पासून सुरू आहे. २ परिषदेला आतापावेतो स्वतःची अशी जागा आणि इमारत नव्हती ती या सालांत लाभून सध्या परिषदेची कचेरी स्वतःच्या इमारतींत आहे.

## नवीन घटना

नवीन घटना करण्यासाठी परिषदेने नेमलेली घटनासमिति आणि संमेलनाने नेमलेली समिति यांच्या स्वतंत्र आणि जोडबैठकी होऊन बराच विचारविनिमय झाला. आणि या समित्यांनी केलेल्या घटनेच्या खर्ड्यांना विचार जळगावी भरलेल्या साधारण सभेनें करून जी नवीन घटना बनविली तिचा जळगाव संमेलनाने स्वीकार केला व यामुळे परिषद्संमेलनवाद एकमतें मिटला. नवीन घटनेप्रमाणें नव्या निवडणुकी झाल्या असून नवीन नियामक आणि कार्यकारी मंडळे जूनपासून अधिकारावर येतील.

## इमारत

परिषदेच्या इमारतीचा वृत्तान्त वेळोवेळी म. सा. पत्रिकेंतून येत गेलाच आहे. या इमारतीला एकंदर खर्च सहा हजारावर आला. यांपैकी ट्रस्टीकडे इमारतनिधींत सुमारे निम्मी रक्कम होती व बाकीची देणग्या मिळवून उभी केली. आज इमारतींत फक्त एक कचेरीची खोली आणि एक लहानसे सभागृह एवढीच बांधलेली जागा आहे. ग्रंथालय आणि मोठें सभागृह करण्यासाठी, योजलेल्या एकंदर इमारतींतील दुसरे पाखें लवकर बांधणे अवश्य आहे. त्याला देणगीरूपानें पंधरा वीस हजार रुपये मिळवावे लागतील. सबंध इमारत सर्व साधनानी सज्ज अशी पाहण्याचा योग लवकर यावा अशी आमच्याप्रमाणे सर्वांची इच्छा असणार.

इमारतीचा उद्घाटन समारंभ ता. ७ फेब्रुवारी रोजीं श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर यांच्या हस्तें झाला. समारंभाची हकिकत पत्रिकेंत दिली आहेच (वर्ष १० अंक १).

## देणग्या

इमारतनिधीसाठी सांगली, मिरज, बुधगाव, कुरुंदवाड, जमखंडी, भोर येथे संस्थानिकांच्या भेटी घेण्यांत आल्या. जेजुरीस श्रीमंत सौ. इंदिराराणीसाहेब होळकर आल्या असतां त्यांचीहि भेट घेण्यात आली. या भेटी सफल होऊन आतापर्यंत एक हजारावर देणग्या मिळाल्या व आणखी काही मिळतील अशी आशा आहे. यांशिवाय दोन हजारापावेतो देणग्या बहुंशीं पुण्यांतच मिळाल्या.

## व्याकरणपरिषद्

अहवालच्या सालीं आणखी विशेष झालेली गोष्ट म्हणजे कै. दादोबा पांडुरंग याच्या शतःसांवत्सरिक उत्सवार्थ भरलेली पहिली मराठी व्याकरण परिषद् होय. म. सा. परिषदेनेच ही परिषद् भरवून व्याकरणविषयास चालना दिली. या व्याकरणपरिषदेचें कार्य सतत चालू राहावें म्हणून एक समिति नेमण्यांत आली आहे.

## उपसमित्या

उपसमित्यांपैकी परिषद्-संमेलनसमितीच्या अहवालाचा घटनासमितींत विचार झाला. परीक्षासमितीच्या शिफारसींप्रमाणे येत्या दसऱ्याच्या सुमारास परीक्षा घेण्यांत याव्यात असें साधारण सभेनें ठरविलें आहे. लिपिसमिति, व्याकरणसमिति आणि वाङ्मयनिर्बंधनिवारकसमिति यांचे अहवाल आले असून त्यावर आणखी सूचना मागविण्याचें ठरलें आहे. भारतीय साहित्य-परिषद्समितीच्या अहवाल मान्य करण्यात येऊन भारतीय साहित्यपरिषदेच्या महाराष्ट्रशाखेला परिषदेने मान्यता दिलेली आहे. त्या शाखेचें कार्य नागपूरास चालू आहे. कोकण-अहिराणी-समितीचें काम मात्र संपलें नसून पुढील साधारण सभेपर्यंत तिला मुदत देण्यांत आली आहे.

## संमेलन ठराव

इंदूर संमेलनाने मंजूर केलेल्या ठरावांची जी अंमलबजावणी करण्यांत आली, तिचा वृत्तांत गेल्या साधारण सभेस सादर करण्यांत आलेलाच आहे. तो व त्यानंतरचा पुरवणी वृत्तात त्रैमासिकाच्या ३६ व ३७ या अंकांतून प्रसिद्ध केलेला आहे. जळगांव संमेलनांतील ठरावांची बजावणी करण्यास कार्यकारी मंडळास निवडणुकीच्या कामामुळे फुरसत मिळाली नाही.

## संमेलन

जळगांवला संमेलन प्रो. माधवराव पटवर्धन याच्या अध्यक्षतेखाली यशस्वी रीतीनें पार पडून तेथें संमेलन आणि परिषद् याचा एकोपा झाला ही आनंदाची गोष्ट होय.

## सभा

अहवालाच्या सालीं साधारण सभेच्या तीन बैठकी ज्या झाल्या त्यांपैकी दोन विशेष होत्या. २ ऑगस्टची बैठक बडोदें येथे झालेले संमेलनविषयक पोटनियम स्थगित करण्यासाठी व ता. ६ फेब्रुवारीची नवीन घटनेच्या अंमलबजावणीसंबंधी होती. वार्षिक साधारण सभा जळगावीं ९ नोव्हेंबरला भरली. नियामक मंडळाच्या सभा दोन झाल्या : एक ५ जुलैची व दुसरी जळगांवीं भरलेली. या सभांचे सविस्तर वृत्तांत पत्रिकेंत दिलेलेच आहेत. कार्यकारी मंडळाच्या १३ सभा झाल्या; पैकी मागच्या कार्य मंडळाच्या २ सभा झाल्या. व बाकीच्या नव्या अमदानींतल्या होत. ता. ६ जूनपासून नवीन कार्यकारी मंडळाचा कारभार सुरू झाला; तो या जूनपावेतों आहे. आता नवीन घटनेप्रमाणें नवीन निवडणुकी झाल्याच आहेत. नवीन कार्यकारी मंडळ लवकरच अधिकारावर येईल.

## सभासदवाढ

या सालीं बरेच नवीन सभासद परिषदेला लाभले. ११०साधारण सभासद व २ तहहयात सभासद झाले. कांही सभासदांचीं नांवें बाकी न आल्यावरून किंवा त्यांच्या इच्छेप्रमाणे काढावीं लागलीं. यंदा परिषदेच्या पटावर पुढीलप्रमाणें सभासद आहेत. आश्रयदाते १, उपकर्ते १, हितचिंतक ४, तहहयात सभासद ८९, साधारण सभासद ३३३; एकूण ४२८.

## शुद्धलेखन

या सालीं परिषदेच्या शुद्धलेखनाचा जास्त प्रसार झाला हें कळविण्यास आनंद वाटतो. मध्यप्रांत सरकारच्या विद्याखात्याने हें शुद्धलेखन आपल्या मराठी नॉर्मल स्कूल मधून चालू केलें असून, प्राथमिक शाळांतूनहि तें लवकरच चालू होईल अशी आशा आहे. तसेंच ग्रंथप्रकाशकांचेंहि त्याकडे लक्ष वेधलें आहे. बडोदें सरकारनेहि सामान्यतः मान्यता दिली आहे. पुस्तकाची दुसरी आवृत्ति संपल्यामुळे तिसरी काढली. तिचाहि चांगला खप होत आहे. हे निय-

मांचें पुस्तक अहवालवजा जें सध्या आहे तें क्रमिक पुस्तकाप्रमाणें रचणें आता आवश्यक झालें आहे. शुद्धलेखनसमितीस या बाबतींत लक्ष घालण्यास विनंती करण्यांत येईल.

**हिशेब**

१९३५-३६ सालचे ट्रस्टफंडाचे हिशेब डिसेंबरमध्यें कचेरीकडे आले असून ते जानेवारीच्या पत्रिकेच्या अंकात प्रसिद्ध केले आहेत.

चालू सालचा जमाखर्च मागील कोणत्याहि सालात झाला नाही इतका झाला आहे. याचें कारण इमारतीकरिता मिळविलेल्या देणग्या व झालेला खर्च होय. या जमाखर्चाचीं कोष्टकें आणि खुलासा हीं स्वतंत्र दिलेलीं आहेत.

अहवालाच्या सालची पत्रव्यवहाराची अनुक्रमे १६७२ आवक ११३१ जावक होती.

येणेंप्रमाणे परिषदेचा अहवाल सादर करीत आहों. तो मान्य करून घेण्याविषयी विनंती आहे.

चिं. ग. कर्वे }
र. लु. जोशी } चिटणीस
११-५-३७

ना. गो. चापेकर
कार्याध्यक्ष

---

# १९३६-३७ सालच्या जमाखर्चासंबंधी खुलासा

१९३६-३७ सालासाठी तयार केलेलें अंदाजपत्रक नियामक मंडळाने ता. ५ जुलै १९३६ च्या सभेत मंजूर केलें होतें; त्यात जमा व खर्च २८०२-६-० इतका धरला होता.

जमेकडील बाजूवर असलेली पण अंदाजपत्रकात न धरलेली मोठी रक्कम म्हणजे २३४१ रु. ची इमारतनिधीची जमा. १ एप्रिल १९३७ नंतरहि इमारतनिधींत भर पडली आहे. पण ती पुढील सालांत दिसेल. नवीन तहहयात सभासदांची वर्गणी ४२५ रु. झाली; ती अंदाजीं नव्हती. रु. २३-१३-११ व्याजहि अंदाजाबाहेरचें आहे.

आता अंदाजपत्रकांत धरलेल्या बाबींपैकी पत्रिकावर्गणी आणि ट्रस्टींकडील व्याज अनुक्रमें १८-२-० आणि ३९-७-३ इतक्या रकमेनें जास्त आलें आहे. ग्रंथविक्री १,३७-१३-३ ने वाढली. याचें कारण नवीन शुद्धलेखननियमांचीं पुस्तकें मध्यप्रांत सरकारने प्राथमिक शाळांना शिफास केल्यामुळे अपेक्षेबाहेर खपलीं व लगेच तिसरी आवृत्ति काढावी लागली. साधारण सभासदांची वर्गणी ११२-१० ने कमी झाली. याचें कारण बरीच बाकी राहिल्याने कांही सभासद गळले, तर काही सालोसाल वर्गणी देत नाहीत. संलग्न संस्थांकडूनहि कमी वर्गणी आली (१५-८-०) व किरकोळ जमा म्हणून मोघम २५ रु. धरले होते पण इतर खात्यांतून वर्गीकृत केल्यानंतर कोठे पडत नाहीं अशी ११-४-३ इतकी रक्कम या खातीं पडली.

आता खर्चासंबंधी खुलासा देतांना प्रथम असें सुचविले पाहिजे की, निवडणुकी आणि इमारतबांधणी या खर्चाच्या दोन नवीन गोष्टी उद्भवल्यामुळे अंदाजपत्रकास न घातलेला असा बराच मोठा खर्च करावा लागला. ५५१५-१-० इतकी मोठी रक्कम इमारतखर्चखातीं पडली व अद्याप एक हजारावर चालू सालीं पडेल. पण इमारतीबाबत सर्व खर्च इमारतनिधींतून भागेल याविषयी खात्री आहे. देणग्यांचे पैसे अद्याप येणें आहेत. इमारतीच्या उद्घाटनसमारंभाला १४१-१२-० हा खर्च नवीन करावा लागला. कार्यकारी मंडळाने याला

मंजुरी दिलेली होती. दुसरा नवीन पण आवश्यक खर्च म्हणजे इमारतींत ठेवण्यासाठी लांकडी सामान, सतरंज्या इ.चा होय. तो ११३ १५-६ रु. इतका आला. पण ऐकण्यास आपणाला आनंद वाटेल की, आपले खजिनदार प्रि. ध. रा. गाडगीळ यानी जी एवढीच देणगी देऊं केली आहे ती या कामी खर्च करावी अशी त्यांची इच्छा आहे.

अंदाजपत्रकातील खर्चाकडील ज्या बाबींत जास्त खर्च झाला ती मोठी बाब म्हणजे छपाई होय. अंदाजपत्रकात पत्रिकेसाठी ८०० रु. धरले होते, पण प्रत्यक्ष लागले ८३४-१५-० रुपये. हे पस्तीस रुपये जास्त लागण्याचे कारण उपसमित्यांचे अहवाल, घटनेसंबंधीचा मजकूर आणि परिषद्वार्ता ही जास्त द्यावी लागली. पत्रिकेत त्या मानाने लेख कमीच आले. पण पत्रिका ही परिषदेचें मुखपत्र म्हणून चालवीत असल्याने वरील मजकुराला प्रथम व लागेल तितकी जागा देणें प्राप्त आहे. किरकोळ कचेरी छपाईसाठी ५० रु. अंदाजपत्रकांत होते; पण खर्च झाला १५४ १-०. याला कारणें अशीं: (१) नवीन शुद्धलेखन नियमाच्या प्रती संपल्याने तिसरी आवृत्ति काढणें भाग पडले व ते फायद्याचेंहि होते. त्याला खर्च ७६-८-० आला. या शुद्धलेखनाच्या प्रती १००० वर शिल्लक आहेत. (२) कै. भिडे यांच्या 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' या ग्रंथाचा पहिला फर्मा नवा छापावा लागला याला ३०-१२ ० लागले. (३) नवीन घटनेच्या कच्च्या व पक्क्या प्रती छापून काढल्या त्याला ६८-११-० खर्च करावा लागला; व इतर छपाई (कचेरी दप्तरासंबंधी) नवीन कार्य. मंडळ आल्याने ७८-१ ० इतकी झाली. या खुलाशावरून छपाईखर्च फार अधिक जो लागला तो करणें कसे जरूर होतें हे दिसून येईल.

यानंतर निवडणुकींचा खर्च. मागच्या निवडणुकींबाबत ५१ रु. शिलकी देणें होतें, तेवढेच अंदाजपत्रकात धरले. कारण नवीन निवडणुकी होण्याचे काही कारण नव्हतें. पण अगदी अनपेक्षित रीतीने याबाबत पुन्हा खर्च सुरू झाला. या साली तो १५० १ ६ इतकाच पडला आहे; पुढील सालीं राहिलेला पडेल.

इतर बाबतींत फारसा खर्च झालेला नाही. किरकोळ १६-४-३, टपाल ११ रु., कोनशिलासमारंभाचे राहिलेले ५ रु., भत्ता ५ रु. हेच ते जास्त खर्च होत. अंदाजपत्रकात हे अगदी तंतोतंत धरणें शक्य नसते तेव्हा थोडे कमीजास्त या बाबींत खर्च व्हावयाचेच.

शेवटचा पण मोठा आणि अनपेक्षित खर्च म्हणजे मराठी व्याकरणपरिषदेचा होय. कार्य. मंडळाने अशी परिषद् भरविण्याचे ठरवून एक समिति नेमिली, व या परिषदेला लागणारा खर्च समितीने वर्गण्या जमवून भागवावा असेंहि ठरविले. पण प्रत्यक्ष परिषदेचे काम म. सा. परिषद कचेरीमार्फत होत असल्याने लागेल तो खर्च करावा लागला. एकंदर खर्च १६७ १४-३ आला व जमले ५४-४-० च फक्त. तेव्हा ११३-१०-३ ही बाकी तूर्त परिषदेच्या पैशांतून भरावी लागली आहे. खर्चात १०९-६-० इतका अध्यक्षीय भाषणाच्या व इतर छपाईचाच असल्याने तो पत्रिकेपैकींच समजला गेल्यास हरकत नाही.

याप्रमाणे जमाखर्चाचा खुलासा केला आहे.

चिं. ग. कर्वे } चिटणीस
र. कु. जोशी }
११।५।३७

ना. गो. चापेकर
कार्याध्यक्ष

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## जमाखर्च (एप्रिल १९३६ ते मार्च १९३७)

| | |
|---|---|
| १०७६–९–९ | शिल्लक-मागील सालअखेर |
| ११३७–६–० | साधा. सभा. वर्गणी |
| ४२५–०–० | तह. सभा. वर्गणी |
| ३५–८–० | संलग्न संस्था वर्गणी |
| ११–४–३ | किरकोळ |
| ११८–२–० | पत्रिका वर्गणी |
| २०१–०–० | इंदूर संमेलन देणगी |
| ६६३–५–२ | व्याज { ट्रस्टी ६३९-७-३, खजिनदार २३-१२-१, चिटणीस ०–१–१० } |
| २४४३–८–० | इमारत-निधी देणगी { ट्रस्टी १०१–८–०, इमारत निधी २३४२–०–० } |
| १६२–१३–३ | ग्रंथविक्री |
| ८२७४–८–५ | एकूण जमा |
| ८२७४–८–५ | एकूण तोंडमिळवणी |

| | |
|---|---|
| १८–५–६ | सादिल |
| २०१–२–६ | निवडणूक |
| १०-१०-३ | लिखाई |
| १०८९–१–० | छपाई |
| २५–०–० | कारकुनास देणगी |
| ५०–०–० | संमेलनखर्च |
| ६१-१०-३ | किरकोळ खर्च |
| २७१–४–० | टपालखर्च |
| ९०–०–० | प्रचाराकरिता प्रवासखर्च |
| ४१५–०–० | पगार |
| ११३-१०-३ | व्याकरणपरिषद् |
| १४२-१२-० | उद्घाटनसमारंभ |
| ११०–०–० | कचेरीभाडें |
| ३४–४–६ | व्याकरणसमिति |
| ५–०–० | भत्ता |
| ५–०–० | कोनशिलासमारंभ |
| २६४२-१२-३ | एकूण खर्च |
| ५६३१-१२-२ | शिल्लक पुढील वर्षासाठी |
| ८२७४–८–५ | एकूण तोंडमिळवणी |

३१।३।३७ — चिं. ग. कर्वे, चिटणीस

हिशेब तपासले. बरोबर आहेत

द. दा. देशपांडे,
कार्पोरेटेड अकौंटंट. ३।५।३७

## महाराष्ट्र साहित्य परिषद् (ताळेबंद १९३६-१९३७)

| देणें | | येणें | |
|---|---|---|---|
| ५६३१-१२-२ | शिल्लक | ३७०-१४-० | खजिनदार (पुणें सें. को. बँ.) |
| २५०-०-० | अनामत (श्री. करमरकर इंजीनीअर) | ०-१५-४ | चिटणीस ( ,, ,, ) |
| २८४-७-० | आर्यसंस्कृति मुद्रणालय | ९-६-९ | अनामत |
| १२४-९-६ | इमारत (श्री. करमरकर इंजीनीअर) | २३९-७-३ | ट्रस्टी (तहहयात वर्गणी) |
| | | ५५२५-१-० | इमारत |
| | | १-१४-० | ग्रंथ |
| | | १२७-१२-० | शिलकी सामान |
| | | १५-५-९ | रोकड शिल्लक (१९३७ मार्च अखेर) |
| ६२९०-१२-८ | एकूण | ६२९०-१२-८ | एकूण |

चिं. ग. कर्वे, चिटणीस

सन १९३६-३७ सालचे हिशेब तपासले. हिशेब चांगल्या पद्धतीने ठेविले गेले आहेत. मला पाहिजे असलेली सर्व माहिती मिळाली. मला दाखविण्यांत आलेल्या जमा-खर्चाच्या वह्यांप्रमाणे व व्हाउचर्सप्रमाणे हिशेब बरोबर आहेत. हिशेब ठेवण्यासंबंधी स्वतंत्रपणे चिटणिसांना तपशीलवार कांही सूचना केल्या आहेत त्याप्रमाणे हिशेब ठेवण्यांत यावेत. रोज-कीर्द (कॅशबुक) प्रमाणे असलेली शिल्लक चिटणिसांनी निदान महिनाअखेरीस तरी एकदा तपाशीत जावी, व प्रत्येक महिन्याची शिल्लक काढून त्यावर चिटणिसांनी सही करीत जावी. गेलीं २-३ वर्षे ही सूचना करीत असूनहि ती अंमलात येत नाही त्यामुळे यंदा विस्मरणामुळे कांहीं रकमा जमेस घ्यावयाच्या राहिल्या व नंतर त्या वर्षी अखेरीस जमा करून घेण्यांत आल्या. तरी मे. चिटणिसांनी ही सूचना ह्यापुढे अवश्य अमलांत आणावी. गेले सालीं करंट अकौंट बँकेंत उघडून, ५ तारखेपुढे जमा होणाऱ्या रकमा त्या खातीं भरून व्याजाचें नुकसान न होऊं देण्याबद्दल सूचना केली होती तिच्याकडेहि लक्ष दिले गेलें नाही. परिषदेची साधारण वर्गणी, तहहयात सभासदाची वर्गणी, पत्रिका वर्गणी मिळून बरीच रक्कम ५ तारखेपुढे जमा होत असते व ही रक्कम पुष्कळ वेळां दरमहा १०० ते ३०० पर्यंत असते. तरी एवढी रक्कम करंट खातीं ठेवल्यास थोडें तरी व्याज मिळत राहील. योग्य वाटल्यास सूचना अंमलांत आणावी. ट्रस्टीकडील हिशेब, ह्या हिशेबांत सामील होऊन, परिषदेचा यथार्थ वस्तुस्थिति दर्शक ताळेबंद व्हावयास पाहिजे, परंतु ट्रस्टीकडून हिशेब न मिळाल्यामुळे यंदाहि, फक्त कचेरी (परिषद्) चाच ताळेबंद द्यावा लागला.

द. दा. देशपांडे, बी. ए., एफ्. सी. आर. ए.
कार्पोरेटेड अकौंटंट.
३।५।१९३७,

# महाराष्ट्र साहित्य परिषद्:—१९३६-३७ च्या हिशेबाचें तुलनात्मक कोष्टक

| खातें | जमा (अंदाजीं) | प्रत्यक्ष जमा | तफावत |
|---|---|---|---|
| शिलक-मागील सालअखेर | ३६४-१३-३ | ३६४-१३-३ | ... |
| साधा. सभासद वर्गणी | १२५० | ११३७- ६-० | -११२-१०-० |
| आह. सभासद वर्गणी | ... | ४२५- ०-० | +४२५ |
| संलग्न संस्था वर्गणी | ५१-०-० | ३५- ८-० | -१५- ८-० |
| किरकोळ | २५-०-० | ११- ४-३ | -१३-११-९ |
| पत्रिका वर्गणी | १००-०-० | ११८- २-० | + १८-२- ० |
| संमेलन देणगी | २०१-०-० | २०१- ०-० | ... |
| व्याज { ट्रस्टी ६३९-७-३<br>खजिनदार २३-१२-१<br>चिटणीस ०-१-१० } | ६००-०-० | ६६३- ५-२ | +६३- ५-२ |
| ग्रंथविक्री | २५-०-० | १६२-१३-३ | +१३७-१३-३ |

| खातें | अंदाजीं खर्च | प्रत्यक्ष खर्च | तफावत |
|---|---|---|---|
| मादील | २५ | १८- ५-६ | - ६-१०-६ |
| निवडणूक | ५१ | २०१- २-६ | +१५०-२-६ |
| लिखाई | ५० | १०-१०-३ | - ३९-५-९ |
| छपाई { किरकोळ | ५० } ८५० | | |
| पत्रिका } | ८०० | १०८९- १-० | +२३९-१-० |
| पारितोषिक | २५ | २५- ० ० | ... |
| संमेलन खर्च | ५० | ५०- ०-० | ... |
| किरकोळ खर्च | ४५- ६-० | ६१-१०-३ | +१६- ४-३ |
| टपालखर्च { पत्रिका | १६० } २६० | २७१-४-० | +११- ४- |
| कचेरी } | १०० | | |
| प्रचार | ९० | ९०-० -५ | ... |
| पगार | ४२० | ४१५- ०-० | - ५०- ० ३ |
| व्याकरणपरिषद् | ... | ११३-१०-३ | +११३-१०-० |
| उद्घाटनसमारंभ | ... | १४२-१२-० | +१४२-१२-० |
| कचेरी भाडे | १२०-०-० | ११०- ० ० | - १०-०-० |
| व्याकरणसमिति | ... | ३४- ४-६ | + ३४-४-६ |
| भत्ता | ... | ५- ०-० | + ५- ९-० |
| कोनशिलासमारंभ | .... | ५- ० ० | + ५- ०-० |
| ग्रंथ | ... | १-१४-० | + १-१४-० |
| शिलकी सामान | ... | ११३-१५-६ | +११३-१५-६ |
| | ... | | |

चिं. ग. कर्वे, चिटणीस.

# अंदाजपत्रक

## ( एप्रिल १९३७ ते डिसेंबर १९३७ करिता )

### उत्पन्न

| गतवर्षी झालेले उत्पन्न (नऊमाही आकार) | उत्पन्न | | |
|---|---|---|---|
| | १३७-३-८ | शिल्लक (१ एप्रिल १९३७) | |
| | | खजिनदार (बँक) | १२०-१४-७ |
| | | चिटणीस ,, | ०-१५-४ |
| | | ,, (हातीं) | १५-५-९ |
| | | | १३७-३-८ |
| | ९-६-९ | येणें (चिटणीस, परीक्षासमितीकडून) | |
| | ११३-१०-३ | येणें-शिल्की सामानाबद्दल देणगी | |
| | २१२-८-० | तहहयात सभासद वर्गणीचा भाग (गतवर्षी झालेल्या जादा खर्चाच्या अंशतः भरपाईकरितां नियामक मंडळानें मंजूर करावयाचा) | |
| | ६००-०-० | व्याज (ट्रस्टींकडून) | |
| ६५३-०-० { | ६००-०-० | साधारण सभासदांची वर्गणी | |
| | ५६५-०-० | नवीन सभासदांची वर्गणी | |
| ८८-०-० | ५०-०-० | पत्रिका वर्गणी | |
| २४-८-० | २५-०-० | सलग्न संस्था वर्गणी | |
| १३२-०-० | २५-०-० | ग्रंथविक्री | |
| ८-८-० | ८-१-१ | किरकोळ | |
| | २३४५-१३-९ | | |

### खर्च

| खर्च | | | गतवर्षी झालेला खर्च (नऊमाही आकार) |
|---|---|---|---|
| ४२५-०-० | देणें—तहहयात सभासदांची गतवर्षी झालेली वर्गणी (ट्रस्टींकडे भरावयाची) | | |
| २८४-७-० | देणें—मुद्रणालयाची गतवर्षाची बाकी | | |
| २५-०-० | निवडणुकीच्या खर्चाचा भाग | | |
| ९-६-९ | परीक्षासमितीच्या खर्चाबद्दल | | |
| ५४७-०-० | कचेरीखर्च | | |
| | पगार | ३६० ... | ३१५-०-० |
| | जागाभाडें | १५ ... | ८२-०-० } |
| | म्युनिसिपल कर | १७ .. | |
| | विजेच्या दिव्यांचा आकार | १२ ... | |
| | टपाल | ७५ ... | ७८-१२-० |
| | लिखाई | ८ ... | ८-०-० |
| | किरकोळ छपाई | ५० ... | ५८-८-० |
| | सादिल | १० ... | ७-८-० |
| | | ५४७ | ५५०-४-० |
| ६४०-०-० | पत्रिका खर्च | | ७५०-१४-० } |
| | छपाई | ५१० | |
| | टपाल | १२० | |
| | किरकोळ | १० | |
| | | ६४० | |
| ५०-०-० | प्रवास प्रचार | | ६७-८-० |
| २००-०-० | परिषद् इतिहास | | |
| ७५-०-० | उपसमित्या व संपादकमंडळ | | २५-११-० |
| ४५-०-० | शिलकी सामान | | ९३-४-० |
| ४५-०-० | किरकोळ | | ४१-४-० |
| २३४५-१३-९ | | | |

वा. गो. चापेकर, कार्याध्यक्ष.

# सभासदांस सूचना

१. मुंबई व नागपूर येथील सभासदांस सोयीचें वाटल्यास त्यांनी आपली वर्गणी डॉ. अ. ना. भालेराव, नारायण मॅन्शन, विठ्ठलभाई पटेल रस्ता, व परिषदेचे चिटणीस प्रो. ना. के. बेहरे, काँग्रेस नगर, याजकडे भरावी. कार्यालयातून रीतसर पावती त्या त्या सभासदांकडे जाईलच.

२. ऑक्टोबर १९३६च्या पत्रिकेच्या अंकात लिपिसमिति व व्याकरण समिति यांचे अहवाल प्रसिद्ध झाले आहेत. साधारण सभेने या अहवालाविषयी सभासदांकडून सूचना मागवाव्या असें ठरविलें आहे. तरी सभासदांनी या सूचना अवश्य कराव्या अशी विनंती आहे.

चिटणीस

म. सा. परिषद्

## साभार स्वीकार

१ छन्दोरचना— रचणार : माधव त्रिंबक पटवर्धन, एम. ए.; प्रकाशक : मंगेश नारायण कुलकर्णी, कर्नाटक हाऊस, गिरगावबाजार, मुंबई २; किंमत ४ रुपये.

२ विजयनगर स्मारक ग्रंथ— संपादक : द. प. करमरकर, रा. वि. ओतुरकर; प्रकाशक : द. वा. पोतदार व ग. ना. मुजुमदार, भा. इ. सं. मंडळ, पुणें २; किंमत ४ रुपये.

३ मुसलमानी अमलांतील गोमन्तक— लेखक : दत्तात्रेय व्यंकटेश पै.

४ हिंदुस्थानची नवी राज्यघटना-- लेखक : अर्थस्वामी; प्रकाशक : य. गो. जोशी, ७२३ सदाशिव पेठ, पुणें २; किंमत १ रुपाया.

५ व्यावहारिक ज्ञानकोश-- (भाग २ रा)-प्रकाशक : ग. रं. भिडे, मॅने. डायरेक्टर, व्याव. ज्ञानकोशमंडळ, लिमि., कोल्हापूर; किंमत १० रुपये.

६ उजेडांतील अंधार-- लेखक : दत्त रघुनाथ कवठेकर; प्रकाशक : सुरस ग्रंथमाला; किंमत १॥ रुपाया.

७ बालरोग व त्यांची होमिओपाथिक चिकित्सा-- लेखक व प्रकाशक : गो. स. पळसुले, २२ बुधवार, पुणें २; किंमत ४ रुपये.

# डॉ. केतकर यांचें शोचनीय निधन

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर ता. १०।४।३७ रोजीं रात्रौ आपल्या वयाच्या ५४ व्या वर्षी कालवश झाले व त्यामुळे महाराष्ट्राची जी हानि झाली तिचें वर्णन "महाराष्ट्रांतील एक हिरा हरपला, ज्ञानकोशानी भरलेलें एक सरोवर बुजलें, नवीन विचारांचा झरा आटला, वाङ्मयात्मक साहसाचा महामेरु गडप झाला, मराठी भाषेचा अभिमानस्तंभ खचला, प्राचीनेतिहाससंशोधनाचा स्फुलिंगोद्गारी अग्नि विझला, राजकारणातलि लोकाविलक्षण व मंगल भविष्य सुचविणारा धूमकेतु दिसेनासा झाला", इत्यादि अनेक प्रकारानी अनेकानी केलेलें आहे. डॉ· केतकरांनी वाङ्मयाच्या अनेकविध क्षेत्रांत जी प्रचंड कामगिरी केली आहे तिची थोडीबहुत कल्पना 'प्रतिभे'च्या विशेषाकांत त्याच्या ग्रंथाचीं व लेखाचीं जीं तीन पानें भरून यादी दिली आहे ती वरून येईल· त्यांच्याबद्दल वाङ्मयभक्ताना जो आदर वाटत होता तो त्यांना हैदराबाद येथील साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान देऊन त्यानी व्यक्त केला. त्यांच्या स्वतंत्र व मूलगामी विचारशक्तीचीं, त्यांच्या बहुशास्त्र विद्वत्तेचीं, त्यांच्या साहसयुक्त कर्तृत्वाचीं, त्यांच्या निर्भय वृत्तीचीं, त्यांच्या गोड व आनंदी स्वभावाचीं उदाहरणें देण्याचें कारणच नाही, कारण त्याचे हे विशेष सर्वमान्यच आहेत. त्यांच्या निधनानें साहित्य-परिषदेची जी हानि झाली आहे ती पुष्कळ काळपर्यंत भरून येणें कठीण. साहित्य-परिषद् आणि साहित्यसंमेलन यामधील तेढ म्हणा किंवा मतभेद म्हणा, काढून टाकण्याविषयी त्यानी कांहींसे कडक उपाय हैदराबादच्या संमेलनप्रसंगीं योजिण्याचा विचार केला होता, परंतु तो वाद त्याच्या व इतराच्या सदिच्छाप्रेरित व सहानुभूतिपूर्ण प्रयत्नांनी गेल्या वर्षी जळगाव येथे पूर्णपणे मिटलेला पाहिला तेव्हा त्याना निरतिशय आनंद झाला. त्यांनी प्राचीनेतिहासविषयक जे ग्रंथ लिहिण्याचें योजिलें होतें त्यांपैकी काहींचीं हस्तलिखितें व कांहींच्या टिप्पण्या त्याच्या पत्नी शीलवतीबाई यांचेजवळ आहेत. ही सामुग्री व इतर महत्त्वाचीं हस्तलिखितें प्रसिद्ध करण्याचें द्रव्यविषयक सामर्थ्य शीलवतीबाईजवळ असणें शक्य नाही. तरी डॅा. केतकरांच्या सर्व चाहत्यांनी त्याना या बाबतींत योग्य तें साहाय्य करणें कर्तव्यप्राप्तच आहे. डॉ. केतकरांचें शव त्याच्या इच्छेला अनुसरून पेटिकेंत घालून जेथे भूमिसमर्पित झालें आहे तेथे त्याच्या योग्यतेस अनुरूप असें काही स्मारकहि होणें आवश्यक आहे. डॉ. केतकरांचे चाहते सर्व धर्मांत, जातींत, पक्षांत व उपपक्षांत आहेत, त्यांपैकी कांहींना आर्थिक अनुकूलता चांगली आहे. तेव्हा त्याच्या स्मारकाकरिता नेमल्या गेलेल्या समितीकडून वर निर्दिष्ट केलेलीं दोन कामें तरी अल्पावधींत पार पडतील अशी आशा व्यक्त करून हा मृत्युलेख पुरा करतों.

# निवेदन



**आभार**

संपादकाचे जागीं माझी निवडणूक झाल्यानंतरचा पत्रिकेचा हा दुसरा अंक निघत आहे. तथापि प्रत्यक्ष माझ्या देखरेखीखालचा मात्र हा पहिलाच होय. अपरिहार्य कारणांमुळे मागील अंकाची मला कोणतीच व्यवस्था करतां आली नाही. माझ्या अनुपस्थितींत परिषदेच्या अधिकाऱ्यांनी मागील अंक काढला व त्यांची प्रत्यक्ष जबाबदारी नसता सर्व खटपट केली याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे हें कृतज्ञबुद्धीने नमूद करतों.

**हा अंक**

या अंकामध्ये कांही नवीन सदरें सुरू केलीं आहेत त्याजकडे वाचकाचे लक्ष मी वेधूं इच्छितों. **वाङ्मयवार्ता** या सदरात पत्रिका निघण्याच्या कालखंडातील महत्त्वाचें वाङ्मयीन वृत्त देण्याचा विचार आहे. **साहित्यिकांचे विचार** या सदरांत याच काळातील महत्त्वाच्या भाषणातील व लेखांतील वाङ्मयविषयक निवडक उतारे एकत्रित केले आहेत. हीं दोन्ही सदरें नमुन्यादाखल देण्यांत आलीं आहेत. वाचकांस तीं पसंत पडलीं नाहीत तर पुढील अंकांत तीं येणार नाहीत.

  

**साहित्यिकांचे विचारांवरून** गेल्या तीन चार महिन्यांत वास्तववाद व कलेचें सामाजिक कर्तव्य या विषयावर बहुतेकाचें लक्ष केंद्रित झाले आहे असें दिसून येईल. 'कलेसाठी कला' या ढोंगाचें जें कांही वर्षांपूर्वी स्तोम माजविण्यात आलें होतें त्याविरुद्ध विचारवंताच्या मनांत कोणत्या भावना आहेत याजबद्दल आता संशयास जागा नाही. केवळ स्वात्मप्रगतींत रममाण होऊन जगाबाहेर गिरिकुहरात ध्यानस्थ बसणाऱ्या तपस्व्याची जगात आज जी प्रतिष्ठा, तीच भोवतालच्या जीवनप्रवाहापासून अलिप्त राहूं पाहणाऱ्या वाङ्मयाची प्रतिष्ठा हें तत्त्व हळू हळू सर्वमान्य होत आहे.

  

हिंदुस्थानांतील ज्या विश्वविद्यालयांत उच्च पदव्यांकरता मराठी हा विषय नियोजित आहे त्यांशीं पत्रव्यवहार करून पीएच. डी. वा एम्. ए. करता मराठी घेतलेल्या विद्यार्थ्यांचीं नांवें, विषय व त्यांना विश्वविद्यालयाकडून मिळत असलेली—असल्यास—शिष्यवृत्ति यांची माहिती पत्रिकेंत यावी असा विचार केला होता. त्याप्रमाणे पत्रव्यवहार करतां कांही विश्वविद्यालयांकडून उत्तरें आलीं. त्यावरून बनारस, पंजाब, अलाहाबाद येथे मराठी हा विषयच नाही असें कळतें. आग्रा विश्वविद्यालयामध्ये मराठी बी.ए.पर्यंतच घेता येतें व मद्रासमध्ये उच्च पदवीकरता विद्यार्थी नाही. बनारस हिंदु विश्वविद्यालयांत मराठीची सोय नसावी हें इष्ट नाही. कारण तेथे बरेच महाराष्ट्रीय विद्यार्थी, विशेषतः वऱ्हाड, मध्यप्रांतांतील असतात. मुंबई

विश्वविद्यालयाकडून मोठे मासलेवाईक उत्तर आलें. "विश्वविद्यालयाचा अहवाल फेब्रुवारींत केव्हातरी प्रसिद्ध होईल त्यांत ही माहिती पहा" !

* * *

या अंकांत छापलेला श्री. व. वे. सुब्रह्मण्यम् यांचा लेख मद्रासच्या त्रिवेणी मासिकाच्या सप्टेंबरच्या अंकातून घेतलेला आहे. माझ्या विनंतीवरून श्री. जाखडे यांनी त्याचा मराठींत सुंदर अनुवाद केला याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. माझी निकड येतांच ज्यानी त्वरित लेख दिले त्यांचा नामनिर्देश मी इथे करू इच्छित नाही; परंतु पत्रिकेच्या संपादकांस दरिद्री याचकाच्या मनस्थितीचा सहानुभव इतक्या लवकर येईल अशी मला कल्पना नव्हती. हा अनुभव देण्यांत ज्या स्नेहाळ साहित्यिकांनी भाग घेतला नाही त्यांबद्दल कृतज्ञता व्यक्त करणें मी माझें कर्तव्य समजतों.

## कांही योजना

परिषदेच्या मुखपत्रांत कालप्रवाहाच्या गतीचें प्रतिबिंब पडावें अशी प्रस्तुत लेखकाची इच्छा आहे. देशभाषा ही देशजीवनाच्या अंगोपांगांशीं निगडित असल्याने एकाच्या घटनाविघटनेचा परिणाम दुसऱ्यावर होणें स्वाभाविक आहे. आज नभोवाणी व बोलपट हीं दोन जबरदस्त साधनें भाषेच्या संसारांत घुसलीं आहेत आणि स्वभाषेच्या पुरस्कारार्थच जिचा अवतार त्या परिषदेस व तिच्या मुखपत्रास या साधनांमुळे मराठी भाषेवर काय सुपरिणाम वा दुष्परिणाम होत आहेत, तिच्या पोषणाकडे त्यांचा कितपत व कसा उपयोग करतां येईल, व त्याबाबत आपलें कर्तव्य काय याचा विचार करणें अवश्यक आहे. बोलपटाकडे मराठी साहित्यिकाचें लक्ष आधीच वेधले आहे व खांडेकर, अत्रे, फाळे, वाशीकर वगैरे साहित्यिकांच्या पराक्रमानें कथा व भाषा या बोलपटांच्या दोन अंगांमध्ये झपाट्याने इष्ट फरक पडत आहेत. परंतु नभोवाणीकडे मात्र साहित्यिकांचें जावें तितकें लक्ष अद्याप जात नाही हें खास. वरेरकर, घाटे, रानडे इत्यादि साहित्यिकांचा नभोवाणीशीं थोडा संबंध आलेला आहे, तथापि या साधनावर त्याना हुकमत चालवितां येत नाही हें उघड आहे. परकी संस्कृतीच्या पाखरीखाली हें साधन फार दिवस राहील तर पुढे त्याचा खेड्यापाड्यांतून प्रसार झाल्यावर देशभाषाचा फार मोठा तोटा होणार आहे. लोकशिक्षणाचें हें प्रभावी साधन त्या त्या भाषाविभागाप्रमाणे स्थापन केले जावें व त्याच्या व्यवस्थामंडळावर त्या त्या विभागांतील साहित्यिकाचे कांही प्रतिनिधि असावेत अशी चळवळ करणें इष्ट आहे. केवळ मराठी प्रांताबद्दलच लिहावयाचे झाले तर मुंबई नभोवाणीकेंद्राचा दररोजचा कार्यक्रम पाहिला तरी त्यात लोकशिक्षणाच्या दृष्टीने अनेक भाषाची खिचडी झाल्याने किती कमी वेळ मराठीच्या वाट्यास येतो हें स्पष्ट होईल. या तोटक्या वेळात मराठी संगीत, कथा, नाट्य, व्याख्यान यास या नवीन क्षेत्रात कितीसा वेळ मिळणार ? इंग्लंडातील नभोवाणीकेंद्रावर ज्याप्रमाणे उच्चार व विचार या बाबतींत मोठ्या साहित्यिकाची देखरेख असते व भाषाभिन्नत्वाची अडचण नसल्याने एकाच भाषेतील कलावंतास भरपूर उत्तेजन देतां येतें, तसेंच हिंदुस्थानांतहि केंद्रें प्रांतविभागापेक्षा भाषाविभागावर वांटली गेल्यास होईल व त्या त्या भाषेतील कलोपासकास व कलावंतांस पराक्रमाचें एक मोठें क्षेत्र खुलें होईल यांत मला तरी शंका वाटत नाही.

या विषयावर आपले विचार व्यक्त करा म्हणून मी कांही साहित्यिकांस विनंती केली

होती तथापि मजकडूनच उशीरा पत्रें गेल्याने त्यांचीं उत्तरें वेळेवर हातीं आलीं नाहीत. ज्यांचीं मतें वेळेवर आलीं तीं या विषयास चालना देण्याची कामगिरी करतीलच.

### विभाग संमेलनें

सोलापूर, विदर्भ, उज्जैन, हैद्राबाद इत्यादि ठिकाणीं संमेलनें भरविल्याबद्दल स्थानिक कार्यकर्त्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. तथापि अमरावतीस भरलेल्या संमेलनाने विदर्भ-साहित्यसंघाच्या शाखा खानदेश, मोगलाई व मराठी मध्यप्रान्त येथे स्थापन करण्याचें ठरविलें आहे हें तितकेंसें उचित अगर इष्टहि दिसत नाही. महाराष्ट्रभाषाविषयक सर्व चळवळींत एकसूत्रता असणें यशाच्या दृष्टीने अत्यंत अवश्यक आहे. मध्यप्रान्तांत परिषदेची शाखा रीतसर स्थापन झाली आहे व मोगलाई, खानदेश इत्यादि विभागांतहि भाषा व वाङ्मयविषयक कार्य करणाऱ्या संस्था आहेत व स्थापन होत आहेत. या संस्था आपापल्या स्थलमर्यादेंत नेटाने कार्य करीत आहेत. असें असता विदर्भसाहित्यसंघाने आपलें कार्यक्षेत्र वऱ्हाडापुरतेंच मर्यादित ठेवणें कार्यक्षमतेच्या दृष्टीने इष्ट आहे अशी त्यास प्रेमभावाची सूचना आहे. नाहीपेक्षा अशा आक्रमणयुक्त चळवळीमुळे तिला भाषिक वा वैयक्तिक चुरशीचें स्वरूप येऊन मागील इतिहासाची पुनरावृत्ति होऊन, संमेलनाचा उत्साह ओसरल्यानंतर पुन्हा पूर्वील दशकाची स्थिति येण्याची भीति वाटते. मराठीच्या संसारांत सहकाराची शीतलता आधीच कमी असल्याने प्रस्तुत संमेलनातील उत्साही कार्यकर्ते माझे मित्र श्री. कोलते व श्री. वाळके आणि सौ. द्रविड या सूचनेचा रोष मानणार नाहीत अशी आशा आहे.

### आक्षिप्त वाङ्मय

लोकछंदानुवर्ती सरकारचे कांही फायदे महाराष्ट्रसाहित्याच्या वांट्यास आले आहेत. आक्षिप्त वाङ्मयावरील बंदी उठावी म्हणून आज बरींच वर्षे प्रयत्न सुरू आहेत. त्या प्रयत्नास अलिकडे संघटित स्वरूप येऊन मुंबई सरकार व मध्यप्रान्त सरकारकडे साहित्यसंस्थातर्फे शिष्ट-मंडळें गेलीं. मध्यप्रान्त सरकारचें उत्तर अतिशय सहानुभूतीचें व आशादायक मिळालें. श्री. ना. के. बेहेरे यानी प्रधान मन्त्री ना. डॉ. खरे यास स्वतः श्रमपूर्वक तयार केलेली मराठी आक्षिप्त वाङ्मयाची यादीहि दिली. कर्मधर्मसंयोगाने डॉ. खरे हे विदर्भ साहित्यसंघाच्या अधिवेशनाच्या उद्घाटनास थोड्याच दिवसात जाणार होते. शिष्टमंडळाच्या सूचनेप्रमाणे त्या प्रसंगीं पांच पुस्तकांवरील बंदी उठवून त्यांनी आपला महाराष्ट्रभाषेचा जिव्हाळा व्यक्त केला व त्याचबरोबर अधिवेशनाचाहि गौरव केला. डॉ. खरे याच्या सक्रिय सहानुभूतीबद्दल महाराष्ट्र-साहित्यिकांतर्फे मी त्यांस धन्यवाद देत आहें.

**मुंबई सरकारचें धोरण** मात्र या बाबतींत अद्याप निश्चित झालेलें दिसत नाही. साहित्यिकाच्या शिष्टमंडळास ना. मुन्शी यानी सहानुभूतीचें आश्वासन दिलें व आतापर्यंत बऱ्याच मराठी, हिंदी व इंग्रजी पुस्तकांवरील बंदी उठविण्यातहि आली. तथापि वाङ्मयदृष्ट्या बहुमोलाचे असे मराठी ग्रंथ त्यात फारच थोडे आहेत. कै. शिवराम महादेव परांजपे यांचें वाङ्मय अद्याप आक्षिप्तच आहे. त्यांच्याच पक्षाचें हल्लीचे सरकार ही बंदी उठवून त्याच्या आठव्या स्मृति-दिनास शोभा आणील अशी आशा होती; पण ती फोल ठरली.

कै. परांजपे यांच्या कांही वाङ्मयावरील मध्यप्रान्तांतील बन्दी उठल्याने एक अडचण उपस्थित झाली आहे. मध्यप्रान्तांतील पत्रात त्यांतील उतारे आल्यास व तीं पत्रें मुंबई प्रान्तांत

आल्यास त्या पत्रांवर नसतेंच संकट उद्भवण्याचा संभव आहे. मुंबई सरकार या दोन प्रान्तांतील हा भेद लवकरच नष्ट करील अशी अपेक्षा आहे. कारण ज्या मंन्त्र्यांच्या अधिकारांत ही बाब आहे ते ना. कन्हय्यालाल मुन्शी स्वतः विख्यात साहित्यक व देशभापांचे चाहते आहेत. या प्रश्नाचा इष्ट निकाल करण्यांत त्यांना ज्या अडचणी आहेत त्या लवकरच दूर होतील व देशी भापांचे अनेक बहुमोल अलंकार आज संदुकींत पडून आहेत ते प्रकाशांत येतील अशी मी उमेद बाळगतों.

'आशावादी हितगुज'

पत्रिका यंदा नागपुरास न्यावी असा बऱ्याच नागपुरस्थांचा आग्रह होता व माझी स्वतःचीहि तशी तीव्र इच्छा होती. मला पुण्यास यावें लागेल अशी अंधुक जरी आगामी कल्पना असती तरी मी या निवडणुकीस तयार झालों नसतों हें खास. भारतसेवकसमाजाच्या वार्षिक अधिवेशनाच्या शेवटच्या दिवशीं, ता. २९ जून १९३७, ज्या दोन तीन सदस्यांच्या कार्यक्षेत्रात बदल करण्यात आला त्यात दुर्दैवाने मीहि होतों. दुर्दैवाने म्हणण्याचें कारण ज्या भरंवशावर माझी या जागीं योजना करण्यास बऱ्याच साहित्यिकानी साहाय्य केलें, त्या भरंवशासच धोका पोचला व परिषदेच्या जुन्या अधिकारी वर्गावर रोष असणाऱ्या कांहीजणांस, माझी बदली होणार हें जाणूनच बुद्धया मला निवडून आणल्याचा दोष त्यांना देणें सुकर झालें. वस्तुस्थिति अशी आहे की भारतसेवकसमाजाच्या याच अधिवेशनात मजकडे मध्यप्रांत, बिहार, आसाम वगैरे प्रातातील जंगली लोकाची पाहणी करण्याचें काम सोपविण्यांत आलें होतें व या बेतात आकस्मिक फरक करण्यात आल्यामुळेच मला पुण्यास यावें लागले. आज जवळ जवळ दहा वर्षे नागपूर प्रांताने मला प्रेमाने जवळ केलें व माझ्या अल्प कामगिरीसहि आपल्या स्नेहभावाची भर टाकून मोठें मानलें. तो प्रांत सोडतांना मला स्वतःस किती कष्ट होत आहेत हें सांगणें आवश्यक नाही. तथापि माझी नागपूरकर म्हणून निवडणूक होणें व त्यानंतर मी, अनिच्छया का होईना, पुणेकर होणें हें पूर्वसंकेताप्रमाणेच झालें व त्यांत परिषद्-चालकांचा काही 'डाव' होता हा वृथारोप त्यांजवर केला जात आहे तो किती निराधार आहे हें परिषद्सभासदांस कळणें जरूर असल्याने या वैयक्तिक गोष्टींचा येथे उल्लेख करीत आहें.

* * *

माझी बदली झाली व ती फिरवणें आज तरी अशक्य आहे असें समजताच पुढील गैरसमज अपेक्षून मीं नागपूर शाखाधिकाऱ्यांकडे व परिषदेकडे माझा राजिनामा जरूर असल्यास स्वीकारावा अशी विनंती केली. परंतु माझी बदली परत नागपुरास होण्याच्या संभवावर विश्वसून नागपूरकरांनी व मी सर्व परिषदेतर्फे निवडला गेलों आहें त्यांत परिषदेच्या कार्यकारी मंडळाने ढवळाढवळ करण्याचें कारण नाही अशा विचाराने कार्यकारी मंडळाने माझा राजिनामा निकालात काढला. नागपुरकरांच्या सदिच्छेस यश लाभो एवढेंच मी इच्छितों. कारण माझें मन मध्यप्रांताकडे ठेवूनच मी इथे आलों आहें.

पुणें, ता. २-१०-३७ मोहन श्रा. शहाणे

# भास्करभट्ट बोरीकर यांचा मराठी पूजावसर

**प्रास्ताविक :— पाठसमुदायांतील पूजावसर कोणाचा ?**

पूजावसर म्हणजे पूजेचा प्रसंग. श्रीचक्रधरस्वामींच्या उपस्थितींत त्यांचे भक्तजन प्रत्येक दिवशीं त्यांची त्रिकाळ पूजा नित्यनियमाने करीत. तो सोहळा अत्यंत भक्तिभावोद्दीपक असल्यामुळें चित्तवेधक अतएव संस्मरणीय असे. विशेषतः भाविक भक्तांच्या दृष्टीनें तर त्याचें महत्त्व फार होतें व तसें तें आजहि आहे. श्रीचक्रधराच्या या पूजाप्रसंगाचें स्मरण करणें हें एक पुण्यकृत्य असल्यामुळे त्यावर पूर्वीपासून बऱ्याच महानुभाव लेखकानी आपली कल्पनाशक्ति वेंचून अनेक सरस रमणीय गद्यपद्य प्रबंध निर्माण केले आहेत. त्या सर्वांना 'नित्यादिनी लीळा' अथवा 'पूजावसर' अशीं नांवें आढळतात. अशा अनेक पूजावसरांपैकी बाई देवबासाचा म्हणून प्रसिद्ध असलेला गद्य पूजावसरच महानुभावपंथीयाच्या व महाराष्ट्रीयाच्या विशेष परिचयाचा आहे. प्रस्तुत प्रकरण प्रथम कै. वि. ल. भावे यांच्या 'महाराष्ट्र सारस्वता'च्या तृतीयावृत्तींत [ भाग १ पा. ९६] प्रसिद्ध झालें. त्या ग्रंथात या पूजावसराचें कर्तृत्व 'भावेव्यासीं'कडे दिलेलें आहे. श्री. य. खु. देशपांडे[3] आणि इतरें महानुभावीवेतर लेखक यांनी सुद्धा हा गद्य पूजावसर बाइदेवबासाचाच असल्याचें नमूद केले आहे. मला स्वतःला हें मत मान्य नाही. बाई-देवबासांचा म्हणून प्रसिद्ध असलेला 'पूजावसर' त्याचा नसून सिद्धांते हरिबास याने लिहिलेला असावा असें मला वाटतें. कै. भावे, श्री. देशपाडे वगैरेनी प्रस्तुत ग्रंथ बाई-देवबासाच्या नांवावर नमूद करताना कोणताच आधार दिला नाही. त्या प्रकरणाच्या आरंभीं "म्हणौनि बाइदेवोबा नित्यादिनी लीळा डोंबेग्रामीं बोलेती" या वाक्याने सर्वांची दिशाभूल झालेली दिसते, कारण तेवढ्याच एका वाक्याच्या साह्याने ह्या पूजा-वसराचें कर्तृत्व बाइदेवबासास दिलेले असावेंसें दिसतें. परंतु त्याच उल्लेखावरून डोंबेग्रामीं-ची नित्यदिनी लीळा बाइदेवबासानी सांगितली आहे असें सांगणारा हा लेखक त्यांच्याव्यति-रिक्त दुसरा कोणीतरी असावा हें उघड दिसतें. याशिवाय लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी की, नागदेवाचार्यचरित्र म्हणजे स्मृतिस्थळ, वृद्धाचार वृद्धान्वय इत्यादिकांपैकी एकाहि ग्रंथांत बाईदेवबासाच्या नांवावर पूजावसराचें कर्तृत्व नमूद केलेलें नाही. 'महाराष्ट्र-कवि-काव्य-सूची'त हा उल्लेख आहे पण तो निराधार असल्यामुळे विश्वसनीय मानतां येत नाही. एके ठिकाणीं मात्र "भटोबासीं बाईदेवोबासासी नित्यादिनी लीळा घोकविली होती" (नागदेव स्मृति० २८) असा निर्देश आढळतो. पण त्यावरून, आचार्यांजवळून बाइदेवबासांनी हा पूजावसर नुसता घोकला होता एवढेंच कळतें. तो त्यांनी स्वतः ग्रंथस्वरूपांत लिहून ठेवलेला होता असें त्या-

---

१ तत्पूर्वी १९०७ सालीं ओंकारदादा परंडेकर यांनी तें प्रसिद्ध केलें होतें. पण तें सकळ लिपींत होतें. कै. राजवाडे यांनी भा. इ सं. मंडळाच्या शके १७३७ च्या इतिवृत्तांतहि हें प्रसिद्ध केलें आहे. गेल्या वर्षी श्री. नेने यांनीहि तें छापून काढलें. २ कै. भावे यांच्या पुस्तकांत 'बाइदेवबासाचा' 'भावे' व्यास झाल्याचा चमत्कार दृष्टीस पडतो. ३ म. म. बा. पा. २२. ४ ल. रा. पांगारकर म. वा. इ. खंड १ पा. ४५२.

वरून दिसून येत नाही. आणि म्हणतां आलें तरी त्याचें कर्तृत्व बाईदेवबासाला देण्याचें कारण नाही. आचार्यांनी जसें सांगितलें तसेंच बाइदेवबासांनी पाठ केलें म्हणून वस्तुत: त्याचें कर्तृत्व नागदेवाचार्यांकडेच द्यावयास पाहिजे. आता आचार्यांनी बाइदेवबासाला घोकविलेला हा पूजावसर बाइदेवबासांनी तर लिहून ठेवला नाही हें त्याच्या आरंभीं "बाईदेवबास म्हणती" या शब्दांवरून आपणांला दिसून येतें. मग तो कोणीं लिहिला असावा?

## सिद्धांते हरिबास व नागदेवाचार्य

या प्रश्नाचें उत्तर सोंगोबासाच्या अन्वयस्थळांत सांपडतें -"धारासीव ओंकारवासी स्मृति गेलिया आन वेगोवादी: आन त्याचाचि शिष्यीं **सिद्धांते हरिबासीं पाठसमुदाया आंतुले तिन्ही पूजावसरें केले**" असा त्यांत स्पष्ट उल्लेख आढळतो. बाइदेवबासाच्या नांवावरील पूजावसर पाठसमुदायातलिच[2] आहे आणि तो बाइ देवबासाचा नसून सिद्धाते हरिबासाचा असल्याचें, अन्वयस्थळातील वरील लेखावरून स्पष्ट होतें. कृष्णमुनि कवीने लिहिलेल्या 'अन्वयमाला'[3] नामक ग्रन्थांतसुद्धा "पाट समुदाय : पूजावसर बोलिले सुंदर : हरिराज" (१९५) असा स्वच्छ निर्देश आहे. यावरूनसुद्धा माझ्या विधानाला बळकटी येते. अर्थात् पाठसमुदायातील पूजावसर बाईदेवदासाचा नसून सिद्धांते हरिबासाचा आहे असें म्हणण्यास हरकत दिसत नाही.




तथापि त्याचें कर्तृत्व सिद्धाते हरिबासालासुद्धा पूर्णतया देतां येत नाही. सिद्धांते हरिबासांनी लिहिलेला पाठसमुदायांतील त्रिकाळ पूजावसर ( नित्यदिनी लीला ) डोबेग्रामचा असून तो बाईदेवबानी वर्णन केलेला आहे. तथापि बाईदेवबासाना सुद्धा तो नागदेवाचार्यांनी

१ श्रीगोपीराजग्रंथसंग्रहालय पोथी १७०. २ ओंकारदादा परडेकरांच्या 'पाठसमुदायां'तच तो आहे. हस्तलिखित पोथींत देखील तसेंच आढळतें. ३ गो. ग्रं. संग्रहालयांतील उतारा.

घोकाविलेला होता (स्मृति २८) हें आपण पाहिलेंच. अर्थात् त्याचें मूळ कर्तृत्व नागदेवाचार्याकडेच देणें आवश्यक आहे. आता या पूजावसरांत नागदेवाचा अनेकवार उल्लेख येतो तो स्वतः आचार्यांनी घातलेला असणें अर्थात् शक्य नाही. त्यांच्या मृत्यूनंतर त्या पूजावसराचें स्मरण करीत असतांना स्वतः बाईदेवबासांनी किंवा त्यांच्याजवळून त्या पूजावसराचा घोक घेतलेल्या महानुभावांनी तो उल्लेख घातला असणें शक्य आहे. परंपरेने हा घोक आल्यानंतर शेवटीं सिद्धांते हरिबासाने त्याला ग्रंथस्वरूप दिलें असावें. सारांश नागदेवाचार्य हे या पूजावसराचे मूळकर्ते तर सिद्धांते हरिबास हा त्याचा "ग्रंथलेखक" असावा असें मानणें सयुक्तिक दिसतें. नागदेवाचार्यांचा आणि सिद्धांते हरिबासाचा संबंध मागील वंशावळीवरून कळून येईल.

## इतर अनेक पूजावसरांचें लेखन

पाठसमुदायांत असलेल्या गद्य पूजावसरासंबंधी झाला एवढा विचार पुरे झाला. आता इतर लेखकांनी लिहिलेल्या पूजावसरांकडे दृष्टि वळवूं. नागदेवाचार्यांनी अनुभवलेला श्रीचक्रधरांच्या पूजेचा प्रसंग त्याच्या अनुपस्थितींत ते स्वतः नेहमी आठवीत असत व आपल्या शिष्यवराना घोकवीत असत. त्याच्या त्या अनेक शिष्यांनी तो सर्व संस्मरणीय देखावा आपापल्यापरी ग्रंथनिर्विष्ट करून ठेविला. बाईदेवबासाच्या पूजावसरासंबंधी वर विवेचन केलेंच आहे. त्याशिवाय नागदेवाचार्यांचे शिष्य राघोबास, केसोबास, कवीश्वरबास (भास्करभट्ट बोरीकर), पंडितबास, मल्लेकोयबास इत्यादि अनेकानी पूजावसर लिहिलेले आहेत. "आन भटाच्या राघोबासीं पूजावरसर द्वादश श्लोक केले : आन गीतेची टीका : आन पूजावस्वर साटि ओवीबद्ध केला" असा राघोबासाच्या श्लोकबद्ध व ओवीबद्ध पूजावसरासंबंधी उल्लेख सोंगोबासाच्या अन्वयस्थळांत आढळतो. "श्लोकबद्ध केले : पूजाअवस्वर : वोव्या सुंदर : साटी संख्या ॥ इत्यादि हें कृत्य : राघवपंडतीं : अन्वयपद्धती : ऐसी असे" (कृष्णमुनिकृत अन्वयमाला १८०, १८१); आणि "भटाचे शिष्य राघोभट तेही पूजावसरावरी द्वादश श्लोक बांधले आन नित्यदिनी लीलेचिया साटी ओवीया केलीया" (उपाध्ये आम्नायाचा अन्वयस्थळ)[१] असे राघोबासाच्या कर्तृत्वाविषयी आणखी दोन उल्लेख आढळतात. यांत राघोबासाने साठ ओव्यांचा पूजावसर केल्याचा वृतान्त लक्षांत घेण्यासारखा आहे. 'पारिमांडल्य अम्नाय उक्तार्थ' या पोथींतील "केसोबासीं...... : आन तिन्ही पूजावसर ऐसे आठरा बद केले" असल्याचें कळतें. पाठसमुदायातील पूजावसरावरील एका[३] टीकेवरून केसोबासाचे तिन्ही पूजावसर असल्याचें दिसतें. केसोबासाचे परमप्रिय मित्र 'वत्सहरण'कर्ते दामोदर पंडित यानी सुद्धा पूजावसराच्या ओव्या लिहिल्या होत्या. "एक वेळ पंडितबासीं तिन्ही पूजावस्वरू वोवीरूप बाधले : ते ऐसे 'गोसावी आरुणोदयावसरी । उदहुडौनि आले बाहेरी' ते भटोबासापुढं म्हणित : ते आइकुनी भटोबास तोखले" (२९९) हा उल्लेख नागदेवाचार्यांच्या चरित्रात आहे. "मल्लेकोयबासी पूजावसर केलें पै सुंदर श्लोक साट" कृष्णमुनीची अन्वयमाळा (२२४) आणि "वैद्याचे मल्लेकोयबास तिन्ही पूजावसर बोलिले असे" (पारिमांडल्य माम्नाय उक्तार्थ). यावरून मल्लेकोयबासांनी (वरील वंशावळीवरून हा मल्लेकोयबास कोण हें कळेल) सुद्धा पूजावसर लिहिला होता असें दिसतें. "खळोबासी पूजावसर केले तेही आपुलीय लिपीवरी लिहिले" (उपाध्ये

---

१ गोपीराजग्रंथसंग्रहालय पो. १७. २ गो. ग्रं. संग्रहालय पोथी उतारा. ३ गो. ग्रं. स. पो. १७ उपाध्ये आम्नायाच्या अन्वयस्थळांतील आरंभीचा भाग. ४ गो. ग्रं. स. पोथी उतारा.

आम्नायाचा वृद्धान्वय) या निर्देशावरून 'सह्याद्रिवर्णन'कार खळोबास यांनी लिहिलेल्या पूजावसराची कल्पना येते. याशिवाय भास्करभट्ट बोरीकर यांनीहि संस्कृत व मराठी पूजावसर लिहिल्याचा वृत्तांत सापडतो तो वेगळाच. वरीलव्यतिरिक्त इतर अनेक लेखकांनी हा पूजाप्रसंग वर्णन केलेला असणें संभवनीय आहे. मला आढळलेले उल्लेख तेवढेच मीने वर नमूद केले आहेत. त्यावरून नागदेवाचार्य (व सिद्धान्ते हरिबास), राघोबास, केसोबास, दामोदर पंडित म्हेइकोयबास, कवीश्वरबास उर्फ भास्करभट्ट बोरीकर यानी निरनिराळे पूजावसर केल्याचें कळतें. पैकी बोरीकराच्या 'मराठी पूजावसर' या ग्रंथाचाच आता प्रामुख्याने विचार करावयाचा आहे.

### भास्करभट्ट बोरीकराचे पूजावसर : संस्कृत व मराठी

भास्करभट्ट बोरीकराच्या नांवावर ४५ आख्यायिकांच्या वृद्धाचारामध्ये (आख्यायिका १२; १३) सत्तावीस श्लोकांच्या संस्कृत व साठ ओव्यांच्या मराठी पूजावसराचें कर्तृत्व दिलें आहे. उपलब्ध असलेल्या अनेक वृद्धान्वयांमध्ये बोरीकराच्या संस्कृत पूजावसराचाच तेवढा उल्लेख आढळतो. मराठी ओवीबद्ध पूजावसराचा मात्र निर्देशसुद्धा आढळत नाही. वरील कारणामुळे व मराठी पूजावसराची पोथी मला स्वतःला तोपर्यंत पाहावयास न मिळाल्यामुळे त्याचें कर्तृत्व भास्कराकडे देतां येईल किंवा नाही याबद्दल मीने शंका प्रदर्शित केली होती. पण त्याच ठिकाणीं वृद्धाचारांतील उल्लेखावरून व शिशुपालवध, उद्धवगीता आणि मराठी पूजावसर यांतील अंतिम ओव्यांमधील साम्यावरून या तिहींचाहि कर्ता भास्करभट्टच असावा, अर्थात् मराठी पूजावसर भास्कराचाच असें वाटतें'' असेंहि मीने म्हटलें होतें. आता भास्करभट्टाच्या या मराठी पूजावसराच्या दोन तीन प्रती मला मोठ्या परिश्रमाने पाहावयास मिळाल्यामुळे त्याविषयी अधिक विश्वतपणें लिहितां येणें शक्य झालें आहे. वृद्धान्वयांत ओव्यांचा उल्लेख नसणें हें आश्चर्यकारक असलें तरी वृद्धाचारांतील त्याच्या निर्देशावरून, प्रत्यक्ष पोथ्यांच्या अवलोकनावरून व अंतर्गत पुराव्यावरून ह्या पूजावसराचें कर्तृत्व भास्कराकडे देण्यास प्रत्यवाय दिसत नाही.

### राघोबासाचा ओवीबद्ध मराठी पूजावसर

या पुराव्यांचा अधिक सविस्तर विचार करण्यापूर्वी एक शंका मनांत येते ती अशी की नागदेवाचार्यांचे शिष्य राघोबास याने मराठी ओवीबद्ध पूजावसर केल्याचा उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतो. तीं ठिकाणें वर नमूद केलींच आहेत आणि योगायोगाची गोष्ट अशी की या ओव्यांची संख्या साठच आहे. त्यामुळे भास्करभट्टाचा हा साठ ओव्याचा मराठी पूजावसर वस्तुतः या राघोबासाने लिहिलेला असावा कीं काय अशी शंका येते. ज्या वृद्धाचारांत भास्करभट्ट बोरीकराच्या नांवावर मराठी ओवीबद्ध पूजावसराचा उल्लेख आहे. त्याच वृद्धाचारांत राघोबासाच्या केवळ संस्कृत पूजावसराचाच उल्लेख येतो (आख्यायिका १४). मराठी ओवीबद्ध पूजावसराचा मात्र येत नाही ही आचार्यांची गोष्ट आहे. यामुळे वरील शंका दुणावते. तथापि सूक्ष्म विचारांतीं ही शंका एका दृष्टीने निष्फळ असल्याचें वाटूं लागतें. वृद्धाचारामध्ये त्या वेळच्या लेखकांच्या सर्वच कृतींचा उल्लेख आलेला आहे असें नाही. इतरत्र आढळणारी माहिती चिकित्सापूर्वक लक्षांत घेऊन वृद्धाचारांतील माहिती संपूर्ण करणें अवश्य आहे. आणि त्यामुळे, राघोभटाने मराठी पूजावसर केल्याचा उल्लेख ज्या अर्थी इतरत्र आढळतो त्या अर्थी

---

१ गो. ग्रं. सं. पो. १७. २ वृद्धाचार म. सा. पत्रिका अक ३६. ३ भास्करभट्ट बोरीकर पा. ६४ ४ या प्रती श्री. बाळकृष्णशास्त्री महानुभाव यांच्या कृपेने मिळाल्या.

त्याने तो ग्रंथ केला असावा असें (इतर, विरोधी पुराव्याच्या अभावीं) मानण्यास हरकत नाही. ह्या ओव्या अजूनपर्यंत पाहावयास मिळालेल्या नाहीत त्यामुळे त्याविषयी येथे विवेचन करता येणें अशक्य आहे. त्याला इलाज नाही. पुढेमागे ह्या ओव्या उपलब्ध झाल्यास त्यांविषयी अधिक विचार करतां येईल. भास्करभट्ट बोरीकराचा मराठी पूजावसर व राघोभटाचा मराठी पूजावसर हा 'ओवीबद्ध' आणि तोहि 'साठ ओव्यांनाच' असावा हा केवळ योगायोग आहे! वृद्धाचारामध्ये उल्लेखिलेल्या भास्करभट्टाच्या पूजावसराच्या आरंभीची व शेवटची ओवी ह्या आता मला मिळालेल्या पूजावसराच्या प्रतींतील ओव्याशीं शब्दशः जुळून असल्यामुळे त्या विषयी शंका घेण्याचें कारण दिसत नाही.

## अंतर्गत पुरावा

अंतर्गत पुराव्यावरून सुद्धा हा मराठी पूजावसर भास्कराचा दिसत असल्याचा निर्देश मागे केलाच आहे त्याचा आता सविस्तर विचार करूं. असे अतर्गत पुरावे चार सापडतात; ते येणेंप्रमाणे—

(अ) या पूजावसराच्या मला एकूण चार प्रती पाहावयास मिळाल्या. पैकी दोन प्राचीन पोथ्या[1] आहेत व दोन प्राचीन पोथ्यांवरूनच निरनिराळ्या व्यक्तींनी केलेले [2]उतारे आहेत. क्वचित् शब्दांचा फरक व ओव्यांचा क्रमांक बदललेला असल्यामुळे हे उतारे एकाच पोथीचे नसून, दोन स्वतंत्र पोथ्यांचे असावेत असें म्हणता येते. हस्तलिखित प्राचीन पोथ्यातील एकींत पूजावसराच्या ओव्या संपूर्ण आलेल्या आहेत, तर दुसरींत शेवटच्या २८ ओव्या तुटलेल्या आहेत. तथापि बाकीच्या तिन्ही प्रतींतील या पूजावसराच्या शेवटी आलेली मात्र एकच आहे.

ऐसीया वोवीया पढतां : जीवासी होवे चोखाळतां
परब्रम्हेसी होए सायोजता : म्हणे कवी भास्करू ॥ ६० ॥

तिन्ही प्रतींतील आढळणाऱ्या त्या ओवींत भास्कराचें नाव स्पष्टपणे आलेलें असल्यामुळे हा ग्रंथ भास्कराचाच असावा याविषयी शंका वाटत नाही. शिवाय वृद्धाचारातील आख्यायिकेंत (१३) भास्कराच्या मराठी पूजावसराची अंतिम ओवी म्हणून हीच ओवी दिलेली आढळते त्यामुळे या ग्रंथाचें कर्तृत्व भास्करानेंच असावें असें खात्रीपूर्वक वाटतें.

(आ) भास्करभट्टाच्या शिशुपालवध, उद्धवगीता व प्रस्तुत पूजावसर व या तिन्ही ओवीबद्ध ग्रंथांच्या शेवटीं आलेल्या ओव्यांतील साम्य लक्षांत घेण्यासारखें आहे.

हा शिशुपाळवधु : आईकतां तुटे भवबंधु
जीवां होये प्रबोधु : परमतत्त्वांचा ( शिशु० १०८७ )
या आईकतां उद्धवगीता : प्रबोधु उपजे श्रोतेयांचिया चित्ता
परब्रम्हेसीं होए सायोज्यता : म्हणे कवी भास्करू ( उ० गीता ८२७ )
ऐसीया ओव्या पढतां । जीवा होए चोखाळता
परब्रम्हेसीं होए सायुज्यता । म्हणे कवी भास्करू ( पूजावसर ६० )

---

१ पैकी एक पूर्ण प्रत चांदूर बाजार येथील श्री. तुळसाबाई यांच्या मठांतील आहे. दुसरी अपूर्ण पोथी महंत श्री. पालिमकर महानुभाव यांच्या संग्रहांतील आहे. २ पैकी एक श्री. पालीमकरांनी दुसऱ्या एका पोथीवरून केलेली आहे व दुसरा गोपीराजसंग्रहांतील आहे. हा दुसरा उतारा, संवत्सर ( जि. नगर ) येथील भाऊबोवा याचे पोथीवरून केलेला आहे.

(इ) केवळ अंतिम श्लोकासंबंधीचा तेवढाच अंतर्गत पुरावा आढळतो असें नाही. एकंदर ओव्यांची घाटणी व कल्पना चमत्कृतींतील (भास्कराच्या इतर ग्रंथांशीं) साम्य यांवरूनसुद्धा वरील विधानालाच बळकटी येते. त्यांतील एक गोष्ट अशी की 'यद्यर्थातिशयोक्ति' हा भास्कराचा आवडता अलंकार शिशुपालवध व पूजावसर ह्या दोन्ही ग्रंथांत आढळतो. 'रविमंडळाच्या भोंवती तारागणाची ओंवणी जर दिसेल तर त्याची उपमा श्रीकृष्णाच्या वक्ष-स्थळावरील कौस्तुभाजवळ असलेल्या एकावळीला देतां येईल' अशा 'यद्यर्थातिशयोक्ति' अलंकाराची लयलूट शिशुपालवधामध्ये अनेक ठिकाणीं आढळते. उदाहरणार्थ ३९९, ४०२ ४०८, ४०९, ४१२, ४१३, ४१४ वगैरे ओव्या पाहा. पूजावसरांतील ११, १६, १८, २३, २४ इत्यादि ओव्यांमध्ये सुद्धा याच अलंकाराचा विलास पाहावयास सापडतो. तो लक्षांत घेण्यासारखा आहे.

(ई) शिवाय या दोन काव्यात, म्हणजे शिशुपालवध व पूजावसार यांत, प्रत्यक्ष कल्प-नाचें साम्य आढळतें तें तर विशेष महत्त्वाचें आहे. (उद्धवगीता हा तत्त्वज्ञानप्रधान ग्रंथ असल्यामुळे निर्भेळ कल्पनाविलासाला त्यांत विशेष अवसर नाही.) या दृष्टीने पुढील ओव्या नीट लक्षांत घ्याव्या.

(१) अशोकपालवां शेवटीं : केतकीदळें दीसती धाकुटीं ॥
तुम्ही उपमा नव्हे गोमटी : नखा श्रीकृष्णाचिया (शिशु० ४०२)
असोख तरुची पालवी कोवळी : जेथे लक्षुमी वालभैली
चंद्र सतार वोळग घाली : नख प्रभेमाजी (पूजा० २१)
(२) पद्म-रागा चिआं ज्योतिं : जर्‍ही मुक्ता-फळें रापती ॥
तर्‍ही उपमा दंत-पंक्ती : देओं नए ॥ (शिशु०) ४१३
पद्मरागगर्भी दीसती : कीं ते हीरेयांची पंक्ती
तर्‍हीं ते उपमा दीजती : तया द्वीजवरांसी ॥ पूजा० १६॥
(३) सुनीळु घोंसाळें : तिर्‍हां शोभेंति डोळें ॥
जे पुरविती मोक्षा चे सोहाळे : योगिया सीं ॥ (शिशु०)४१८॥
आकर्ण पुर्ण-घोसाळे : सुनीळ चोखाळ नेपाळें
जे जना पुरवीती सोहोळे : प्रेमसौख्याचे ॥ पूजा०५४॥

वरील ओव्यांतील कल्पनासाम्य लक्षात घेतलें असतां शिशुपालवधकर्त्या भास्करभट्ट बोरीकराचाच प्रस्तुत पूजावसर असावा असें वाटल्याशिवाय राहत नाही. सारांश, वरील एकं-दर विवेचनावरून हा पूजावसर भास्करभट्ट बोरीकराचाच होय हें निर्विवादपणें ठरतें.

**पूजावसराचें स्वरूप**

मागे निर्देशिलेल्या प्रतीवरून तयार केलेला पूजावसर पुढे छापत आहे. त्या मूळ काव्यावरून त्याच्या रसाळपणाची कल्पना रसिकाना येईलच. सकाळपासून रात्रीपर्यंत श्री-चक्रस्वामींच्या नित्यदिनी लीलेचें वर्णन यात आलेले आहे. या पूजावसराचें स्वरूप जरी केवळ वर्णनपर असलें तरी भास्कराच्या प्रतिभेने त्याला कसें काव्यमय आणि रसाळ बनविलें आहे हें पाहण्यासारखें आहे. श्रीचक्रधराच्या शरीराचें केलेलें अलंकारयुक्त वर्णन तर विशे-षच आल्हादकारक वाटतें. त्यांत भास्कराच्या कल्पनाचातुर्याची व अलंकारवैभवाची योग्य प्रमाणांत का होईना, पण चुणूक रसिकांना दिसल्याशिवाय राहत नाही. सकाळच्या वेळीं उदयाचलावर आरूढ होणाऱ्या आरक्त रविबिम्बावर भास्कराने केलेलें

'तव उदेयाचळापरीयेळा : वरी सुर्योदीवु उजळीला
पुर्वदीसां वोवाळीला : श्रीचक्रधरूः ॥२६॥

हें रूपक व त्या दृश्यावर त्यानें केलेली उत्प्रेक्षा कोणालाहि आनंद दिल्याशिवाय राहणार नाही. त्यापुढील ओवींत आलेल्या कल्पनासुद्धा ........ पण हें सर्व मीनें स्वतःच कशाला सांगावयाला पाहिजे ! भास्कराच्या या सुंदर काव्याचा रसिकांनी स्वतःच आस्वाद घ्यावा म्हणजे त्यांतील खरी खुमारी त्यांना कळूं शकेल.

# पूजावसर

॥ श्रीपरेसायेनमः ॥

जयाचीया नामसंगती : सहस्रयौजनीं वेधवंती
तयातें बोलो परों[2]व्यावृती : तया नमो श्रीकृष्णराया ॥१॥
जेणें आळर्क[3] तापा केला छेदु : जो कार्तीक वीर्यें श्रैदु (वरदु)
जो ब्रह्मवीद्या लता कंदुः नमीन श्रीदत्तात्रया ॥२॥
जो वेधवंतीये (दी) दक्षागुरु : बावंना पुरुसा वीद्यागुरु
तया सास्टांगी नमस्कारू : कैला मयां ॥३॥
निर्लेपां जीवांतें : उधरीति कृपादृष्टी पाती (पातें)
तया नीर्गुणा श्रीप्रभुतें : नमस्कारीत (तुसें) आसे ॥४॥
चैतन्याचीये मुसे : परमानंदु वोतला कृपावसें
तो परींवर दानी मानसें : नमीन श्रीचक्रधरू ॥५॥
जो जीवांसी देउनी परशास्त्र आंजन : दाखवी ब्रह्मवीद्येचें नीधान
यैसा वरमुनी नमीन : श्रीनागा(°र्जुनु) आर्जुन ॥६॥
(तेया) श्रीचक्रधराची प्रतदीनी केली : वर्णीतां तुकमठी बोलीं
तें मुनीजनीं समळीं : मज उपसांहावें ॥७॥
पाहातेयीं[12] पाहारां : उप[13]डु होये दातारा
मग उपाणहु (नौ) नेउनी नीज किंकरा : हृदई चरण(णु) ठेवीती ॥८॥
तो श्रीचरणु धरुनी वक्षस्थळीं : आनंदाची बाहाळी जाली
तें सुख वानू नेणीजे बोलीं : जाणे नागा आर्जुनु(°र्जुनु) ॥९॥

---

१ हजारो कोसांच्या अंतरावरूनसुद्धा वेध उत्पन्न करणारी. २ परा वाणीने इतर जीवदेवतांची व्यावृत्ति ( निराकरण ) करून, श्रेष्ठ म्हणून प्रतिपादलेला असा श्रीकृष्ण. ३ 'अलर्क' नांवाचा त्रेतायुगांतील एक राजा. याचे त्रिताप दत्तात्रेयाने हरण केले. ४ कार्तवीर्य ( सहस्रार्जुन ) नांवाचा राजा. त्याला वर देणारा. ५ वेध लावणाऱ्या व्यक्तींमध्ये सर्वश्रेष्ठ अथवा-अशा व्यक्तींना दीक्षा देणारा गुरु-श्रीचक्रपाणी. ६ श्रीचक्रपाणीने ५२ पुरुषांना विद्यादान दिलें होतें. ७ कर्मांचा नाश होऊन शुद्ध झालेले जीव. ८ पर आणि अवर फळांचा दाता. ९ प्रत्येक दिवशीं होणारी क्रीडा. १० हलक्या; सामान्य. ११ क्षमा करावी. १२ पहाटेच्या प्रहरीं १३ झोपेंतून उठणें.

श्रीमुर्तीवरी : मीरवे चंदनाची पींजेरी
ते उपमा चराचरीं : देखीजेना ॥१०॥
कनकप्रभा सोलीजेनी : वरी वोपेसळें दीजती
ती येतें चंद्रिका आळगीती : तर्‍ही ते उपमा नव्हे ॥११॥
स्वामी परसैया नीगती: बाईसे दीपु उजळीती
उस्ण उदक बाहीर्वास देती : नागदर्यो (नागींद्रा) हातीं ॥१२॥
तया उस्ण उदका वीनयोगु केला : चोखट बाहीर्वासु वेढीला
मग चंद्रुउपमे आसनीं बैसला : श्रीचक्रधरु ॥१३॥
तीयें चरणकमळें नीरुपमें : बाईसीं प्रमाँर्जीलीं प्रेमें
तेथ (सुखासनीं) आत्मनी (आत्मा°)रामें : आपस्थान कीजे ॥१४॥
तवं सुर्योदयें दंतपंक्ती : सीळकां चोखाळीती
वक्र सी(ळि) का (कव्हनि) फेडीती : जीह्वा मळ ॥१५॥
पद्मरागेंगर्भी दीसती : कीं ते हीरेयांची पंक्ती
तर्‍हीं ते उपमा दीजती : तया द्वीजेंवरांसी ॥१६॥
तेही सुंदरा श्रीमुर्ती श्रीकैरीं : नागैरा गुर्जरापरी
(गुरुळा) श्रीमुख प्रक्षाळन करी : श्रीचक्रधरु ॥१७॥
रातोर्तेळांची पाकु (को) ळी : पद्मरागें रंगीली (रातली)
तर्‍ही ते उपमा पांवेंळी : तया श्रीभरासी ॥१८॥
जेहीं ईस्वैरचीह्न (ह्नें) सेवीली : बाईसीं चरणकमळें प्रक्षाळीलीं
पोळेंवें प्रमार्जुनी ठेवीलीं : आसनावरी ॥१९॥
ते चरणोदक : न ल्हाती ब्रह्मादीक
सेवीती सेवक (अ) आर्धैनासना ॥२०॥
आसोर्वे तरुची पालवी कोवळी : जेथ लक्ष्मी वालैंभैली
चंद्र सतोरें वोळेंगे घाली : नखप्रभेमाजी ॥२१॥
बाईसीं भरीलीया रंगमाळीका : ल्लहाटीं टीळा केला नेंटका
नीर्जैरुप(पीं) त्रीरेखा (त्रिरुपता) : (द्योतक जेथ रेषत्रया) वोतवीत असे ॥२२॥

१ उठा. २ उजळा; चकाकी. ३ परसाकडे. ४ श्रीचक्रधराची नागाइसा (नागंबा) नावाची पहिली शिष्या. ५ वस्त्रविशेष. ६ नागदेवाचार्य. ७ स्वच्छ पुसणें. ८ दांत घुण्यासाठी बोरीबाभळीच्या काड्या. ९ आरक्त वर्णाच्या पद्मरागमण्यांमध्यें हिऱ्याची पंक्ति जर दिसेल तर तिची उपमा श्रीचक्रधराच्या आरक्त ओष्ठद्वयांतील दंतपंक्तीला देतां येईल १० दांत. ११ कल्याणकारक हातानें. १२ सुसरकून ( गुजराथ्यांत नागर ब्राह्मणांचा हा एक जात आहे ). १३ गुळणा. १४ आरक्त वर्णाचें कमळ. १५ हलकी; कमी प्रतीची. १६ ईश्वराच्या ठिकाणी असलेलीं सर्व पदचिन्हें (ध्वज, वज्र, पद्मांकुशादि) ज्यांनी स्वीकारलीं होतीं अशीं पाऊलें. १७ पदर. १८ पापक्षालनासाठी. १९ अशोक याच्या कोवळ्या पालवीप्रमाणे श्रीचक्रधराच्या हाताचीं बोटें होती. २० मोहित झाली. २१ तारांसहित. २२ सेवा; दास्य. २३ कपाळावर असलेल्या तीन रेषा व परमेश्वराचें त्र्यंशत्व (ब्रह्म, माया व ईश्वर) दाखवीत होत्या; असा भाव.

आनंदाचा सुधाकरू : जरी दीसता कनक गौरु
तरी तया श्रीमुखाचा आकारु : उपमा नव्हे ॥२३॥
संखाकारु[1] चांपेयाचा गाभा : जरी सोलीजता कनकप्रभा
तरी तेया श्रीकंठाची सोभा : आधीक दीसे ॥२४॥
ते (तीये) श्रीकंठीं माळ : [बाईसीं] घातली सुपरिमळ
स्वामी आर्चुनी आंघ्रयुगळ : मग धुपार्ती केली ॥२५॥
तवं उदेचळापरीयेळा : वरी सुर्योदीपु उजळीला
(मग) पुर्वदीसा वोवाळीला : श्रीचक्रधरू : ॥२६॥
ते (तीया) कुरवंडी करुनी सांडीली : ते गगनीं चंद होउनी गेली
सीते[3] वीखुरली तें जाळी : तारांगणें : ॥२७॥
भटें मंत्र म्हणती : मंडळीक थी थीं (तेथ) वारु (वारा) जाणवीती
बाईसें कापुरें वीडा वो(ळ)गवीती : देवरायासी (श्रीचक्राधरासी) ॥२८॥
"आजी खेळो जाईजैल केउती : यैसे बोलीले नीजभींकराप्रती
आमृतसांवेया वाचा जीवपती : आनंद-चंद्रें ॥२९॥
कैळासप्रभेहुनी उजळे : (तैसें) आंगी टोपेरे कासीलें (केलें) नीतळ
मग भक्तेसीं बीजें करीती वेल्हाळ : हातु धरूनी नागींद्राचा ॥३०॥
जीवा देती (त चतुंर्वीध दान : गोसांवी पातले क्रीडास्थान
(आसनी) नैसोनि नीरोपण : करीती सेवकांसी ॥३१॥
जुंझवीती धाववीती पोहवीती : दरे [दरकुटे] बुजवीती
पाखाण फोडवीती : आनंदवीती श्रीचक्रधरु ॥३२॥
यैसीया लीळा अनंतु : कींकीर जन करुनी पुनीतु
मग युनी जनेसीं येतु : आस्रमासी ॥३३॥
आंगीं टोपेरें फेडीली : तव आंगीची कीर्ळे[12] फाकली
भक्तीजना पढीयासैली[13] : कनकप्रभा ॥३४॥
स्वामी करीती गुरुळीं[14] : धुती मुखकमळ
बाईसीं अंघ्रीयौगुळ : प्रक्षाळलें ॥३५॥
वीपाळ भाळस्तळा : चंदनाचा आडीं रेखीला
[16]नीकी नव्हे चंद्रकळा : तेनें पींडें ॥३६॥

---

१ शंखाच्या आकाराचा. २ उदयाचल ( पर्वत ) हेंच ताट; तबक. ३ तांदुळाचे दाणे; अक्षता. ४ श्रीनागदेवाचार्य. ५ 'तेथे वारा जाणवीती' ( वारा घालीत होते ) हाच पाठ अधिक प्रशस्त आहे. ६ कोणीकडे. ७ अमृताचा वर्षाव करणाऱ्या वाणीने. ८ बंडी. ९ टोपी. १० संबंध, ग्रहणा, लीला व कैवल्य या चार प्रकारचें. ११ युद्ध करायला लावतात. १२ किरण (सौंदर्यशोभेचे). १३ प्रतिभासली. १४ गुळणा. १५ ऊर्ध्वपौंड्र गंध. १६ चांगली. १७ त्या तुळनेने.

सर्वांगीं चंदनाची भौरी केली : एक्षकर्दमें चर्चीली
आडा रेखीला भाळीं : मनोहरू ॥३३[3]॥
बाईसीं कापुरें वीडा वोळॅगवीला : भक्तीं श्रीचरणा
मग कष्णागरु धुपु वोळगवीला : श्रीचक्रधरासीं नमस्कार केला (देवरायासी) ॥३७
रत्नाचे दीप उजळीले : भैक्ती बाईसीं वोवाळीले
देवीं जयजयकारु केले : श्रीचक्रधरासी ॥३८॥
अमृतसार कामैवलें : तैसे ताट वोगॅरीलें
(मग) बाईसीं नींबलोन केलें : देवरायासी ॥३९॥
गोसांवीया जाली आरोंगण : नागींद्रु श्रीकरीं वोळगवी (दे)
मग वीडा देउनी करीती नमन : कृपा (कैवल्य) नीधी (सीं) ॥४०॥
गोसांवी बाहीर आले : भक्तजन कृपादृष्टीं अवलोकीले
मग पहुडु करीते जाले : श्रीचक्रधरु ॥४१॥
लाहीजे ईस्वराचें उचीर्स्टे : यैसें कर्म (दैव) नाही वरीस्ट
ब्रम्हादीकां अभीस्टें[12] : परी (पुन) ते लाहाती ना ॥४२॥
ते लाहोनी भक्तीं : भोजनें केलीं सहपंक्ती
देवो सुंम(स्म)रीत चीत्तीं : सेवे येते जाले ॥४३॥
(तवं) गोसांवी (दातारू) उपहुडेले[14] : भक्ती जनां[15] ग्राम वाटीले
मग माधुकर भीक्षे (माधुक्रिये) पाठवीले : देवदेवें ॥४४॥
भक्तीं करुनी नमस्कारू : भीक्ष्या (न्न) दुस्टीसमोरू–
वोळगौनी सत्त्वपरू : मग भोजनें करीती ॥४५॥
तवं जालें (या) अस्तमान : नागींद्रु करी पूजासाधन
बाईसें सर्वांगीं चंदन : वोळगवीती देवरायासी ॥४६॥
परमानंदा चैतन्याची खोली : तैसी सर्वांगीं चंदनाची भोरी मीर्वली
मग कस्तुरीचा टीळा केला भाळीं : मनोहरु ॥४७॥
ठीकें[16]चें लेणें : मार्दनें परीमळें उणें
मृणौनि सुमनाचीं अंभ्रणें : वोळगवीलीं ॥४८॥
ते जैसें तारांगण गुफीलें : कीं सुदवेर्धे वोळगे (शुद्ध ओघ गंगेसि) आले
तैसे झुळंबुके मीर्वले : कर्णयौगुळीं ॥४९॥

१ उटी. २ एकप्रकारचें सुगंधी उटणे. ३ एका पोथीत पाठांतर म्हणून ही ओवी दिलेली आहे. ४ सेवेप्रीत्यर्थ अर्पण करणे. ५ भक्तिभावपूर्वक. ६ तयार केलें; संस्कारयुक्त केले. ७ वाढलें. ८ भोजन. ९ निद्रा. १० प्राप्त करून घ्यावें; मिळवावें. ११ उच्छिष्ट. १२ पाहिजे असलेले. १३ स्मरण करीत करीत. १४ झोपून उठले. १५ भिक्षा मागण्यासाठी भक्तांना गांवें वाटून दिलीं १६ मौक्तिक रत्नांचे अलंकार. १७ आभरणें; अलंकार, १८ शुद्ध वेध (शक्ति). १९ गुच्छ; चकाकणारे लोंबते गुच्छ.

आनंदवेधाचीं साखळे : तैसें हातेंसरे पढीहासले
सुध(शांभव)वेधाचे सरळे : तैसी शोभे कंठी माळ ॥५०॥
प्रकृतु वेधाचे बाहेवटे : तैसी अंगदे मीर्वली धर्वटें
श्रीमुगुटीं पुजाबंधें गोमटें : ते जैतें भमृतेज ॥५१॥
कैवल्ये दयावेया दीसें : तैसा श्रीकरीं फुलांचा झेला दीसे
नीरांजन करीती बाईसें : देवरायासी ॥५२॥
बाईसें कापुरें वीडा वोळगवीला : भक्तीं श्रीचर्णा नमस्कार केला
तो अवस्वरें[3] पाहातां आनंदु जाला : सकळ जनासी ॥५३॥
आकर्ण पुर्ण-घोसाळे : सुनीळ चोखौंळ नेपौंळें
जे जना पुरवीती सोहोळे : प्रेमसौख्याचे ॥५४॥
मुक्ताफळप्रभेचें तगट : मधीं ईंद्रनीळ येकदाट
तऱ्ही उ(प)मा तुकमठें : तेया नेत्रकमळासी ॥५५॥
तेहीं सौंदरीं नयेनीं भक्तकृपादृष्टीं अवलोकीले : अनंदे दुलो लागले
मग पींत ठेले : तेया श्रीमुखातें ॥५६॥
गोसावीं पुरोजनें पाठवीले : नीजकींकीरें ते राहीले
मग सेवा करूं लागले : अनंदभरीत ॥५७॥
रात्रीचीया पहीलीया पाहारा : दुधभातु तुप साकरा
यैसी कौंळी[12] होये दातारा : कापुरेवीडा वोळगवी–
किंकरूं वानेंरा[13] : श्रीक्रधरासीं ॥५८॥
(परावाचा) परोंप(व)र वीचारू : कृपावसें नीरोपी करुणाकरु
नागींद्राप्र ती श्रीचक्रधरु : मग पहुडे स्वीकिरीती ॥५९॥
यैसीया वोवीया पढतां : जीवासी होये चोखौंळता
परब्रम्हेसीं होये सायोजता : म्हणे कवी भास्करू ॥६०॥

**वि. भा. कोळते, अमरावती**

---

१ मनगटाभोवती बांधायचे पुष्पहार. २ मिषाने; निमित्ताने. ३ प्रसंग ४ नेटक्या आकाराचे. ५ निनळ; शांत. ६ शुद्ध. ७ कोंदण. ८ पाहत राहिले ९ श्रीचक्रधरांनी. १० नगरवासी लोक. ११ सेवक. १२ विहार. १३ नागदेवाचार्य. १४ पर+अवर ज्ञानाचा विचार. १५ निद्रा. १६ पवित्रपणा.

# रसव्यवस्था नि आस्वाद्यमानता



प्राचीन साहित्यकाराना एखादें नियामक काव्यतत्त्व शोधून काढून त्याच्या अनुरोधाने काव्याचे शास्त्रशुद्ध आणि निश्चित संख्य असे प्रकार पाडावयाचे होते आणि म्हणूनच त्यांनी भावनांच्या मीमांसेचा इतका दीर्घोद्योग केला. वाचकनिरपेक्ष काव्यवस्तु ही निश्चित डोळ्या-पुढे असल्याने त्यानी काव्यगत व्यक्तींच्या भावनेवर रसाची स्थापना केली. काव्यलोचनकार श्री. दत्तात्रेय केशव केळकर हे काव्यगत भावनाच विचारांत घेतात; पण रसिकाच्या मनावर होणाऱ्या परिणामाचाहि ते तदनुषङ्गाने विचार करितात. एखादी भावना रस या पदवीस पोचण्यास तिच्या ठिकाणीं कोणता गुण पाहिजे हें ते शोधतात पण रसाची संख्या निश्चित करणें ही गोष्ट त्याना फारशी महत्त्वाची वाटत नाही.

"रसवृत्ति ही काव्यविषयनिष्ठ नसून वाचकवृत्तिनिष्ठ आहे" असें श्री. केळकर (पृ.१०९) म्हणतात; पण ही कल्पना हास्य, अद्भुत, बीभत्स आणि शान्त या चार रसांच्या निर्णयाच्या बुडाशीं आहे हें आपण पाहिलेंच आहे. शोकाची भावना ही जरी काव्यगत व्यक्तीच्या ठिकाणीं असली तरी करुण हें जें रसाला नाव मिळालें तें वाचकवृत्तीवरूनच मिळालें असावें; कारण, शोक करणाऱ्या व्यक्तीविषयीची करुणा ही दुसऱ्याच व्यक्तीला, बहुशः वाचकाला, वाटते. सर्व प्रकारच्या रसास्वादात चित्तविस्ताररूपी विस्मय प्राधान्येंकरून अनुभवास येत असल्याने सर्वत्र एक अद्भुत रसच ग्राह्य मानावा असें जें साहित्यदर्पणकाराचे प्रपितामह नारायण यांचें मत आहे त्याच्या बुडाशींहि रस वाचकवृत्तिनिष्ठ आहे हीच समजूत आहे रस आणि रसाभास यातील भेद दाखवितांना 'अनुचित विभावालम्बनत्वं रसाभासत्वम्' अशी व्याख्या देताना जगन्नाथ ज्या अनौचित्याचा व्यवच्छेदक तत्त्व म्हणून उपयोग करितो तें अनौचित्य वाचकाच्याच मतें असतें. शेवटीं विष्णुशास्त्री चिपळूणकर याना जो उदात्त नावाचा नवीन रस सुचला तो जडसृष्टीच्या भव्य स्वरूपाचें वर्णन वाचून वाचकाची जी चित्तवृत्ति होते तिच्यावरूनच होय.

रसाची स्थापना काव्यगत व्यक्तीच्या भावनेवर न करिता वाचकाच्या भावनेवर करणें तितकेंसें विश्वसनीय नाहीं. अर्थग्रहणशक्ति, कल्पनाशक्ति, सहृदयता आणि कुतूहल या चार गोष्टी जेथे थोड्या फार प्रमाणात असतात तेथे रसिकता असते हे जरी खरे आहे तरी रसिकता म्हणजे काही अचल अविकार्य अशी गोष्ट नव्हे. सहृदयता आणि कुतूहल हे उघड संस्कृतीने, सामाजिक विचाराने, परिस्थितीने आणि ज्ञानाने पालटणारे घटक आहेत हें विसरता कामा नये. भिन्नरुचिर्हि लोकः याचा अर्थच असा की वाचकाची वैयक्तिक रुचि ही निर्णायक समजावयाची नसते. नामदेवाचे अभंग म्हणतांना तल्लीन होऊन डोलणारा रसिक यशवन्तांच्या भावगीताना नाक मुरडतांना दिसतो. उत्कृष्ट काव्य हें बहुतेक रसिकांस सज-वील यांत शंका नाहीं; पण त्या काव्यापासून साऱ्या रसिकांच्या ठिकाणीं एकच भावना जागृत होईल अशी निश्चिति नाही. उदाहरणार्थ, गिरीशांची शूर्पणखा ऐकून लोकांना हसूं

येतें तर माझ्या मनावर विषादाची छाया पसरते. रस हा वाचकवृत्तिनिष्ठ मानल्यास ती कविता हास्यरसाचीहि म्हणतां येईल आणि करुणरसाचीहि म्हणता येईल.

काव्यात वाचकाचें मन रमते तेव्हा मूलतः त्याच्या ठिकाणीं आनंदाची भावना प्रकट होत असली पाहिजे. हा आनंद न वाटेल तर वाचनच मुळी कोणी करणार नाही. तेव्हा वाचकाच्या मनात आनंदाच्या अनुषंगाने उद्भवणारी दुसरी भावना ही तितकी गौण दूरचीच समजली पाहिजे. अजाविलाप वाचताना विशेष कोमल हृदयाच्या मनुष्याच्या डोळ्याना पाणी आलें तरी त्या शोकानुभूतींतहि एक प्रकारची परदुःखशीतलता, सुखदता असते. आता वाचकाच्या मनात या आनंदाच्या अनुषंगाने उत्साह, शोक, हास, क्रोध, भय, विस्मय, जगुप्सा आणि शम हे आठ भाव संभवतात. 'राजा शिवाजी' वाचून उत्साह वाटतो; 'विरहिविलाप' वाचून शोक वाटतो; 'सुदाम्याचे पोहे' ग्रहण करताना हसूं लोटते; 'इराणची गळचेपी' यासारखें पुस्तक वाचून क्रोध पेट घेतो; 'ज्यूड दि ऑब्स्क्युअर' सारखी कादंबरी वाचून भय वाटतें; गलिव्हरचा वृत्तात वाचून नवल वाटतें; परंतु पुस्तक वाचून रति वाटते काय ? शाकुन्तल वाचून वाचकाला शकुन्तलेविषयी कौतुक वाटेल, तिच्या कल्पित दर्शनाने समाधानहि वाटेल; पण दुष्यन्ताच्या ठिकाणी जी रतीची भावना उद्दीपित होते ती वाचकाच्या ठिकाणीं होते काय ? काव्य वाचताना वाचक हा निरनिराळ्या पात्रांशीं समरसून सुप्त वासनांची अप्रत्यक्ष तृप्ति करून घेत असतो असें म्हणतात, तरीहि दुष्यन्ताला शकुन्तलेविषयी वाटणारी रति आणि वाचकाला तिच्याविषयी वाटणारी भावना यांत अंतर आहे असें मला वाटतें.

पुन्हा, वाचकाला वाटणारी भावना ही सदा शुद्ध म्हणजे असंमिश्रच असेल कशा-वरून ! बलाढ्य राष्ट्राच्या राक्षसी वृत्तीची चीड येते त्याच वेळीं त्याच्या अंगच्या राष्ट्रपोषक गुणांविषयी सस्पृह आदर वाटतो; दुबळ्या राष्ट्राची कीव येते त्याच वेळीं त्याच्यातील आत्मघातकी फुटीर वृत्तीचा संताप येतो.

खरोखर, ज्याप्रमाणे गुन्तागुन्तीच्या कथानकात निरनिराळ्या भावनाचा सुसंगत कलह आढळतो त्याचप्रमाणे वाचकाच्या मनातहि विविध भावनाची सुसंगति एकाच वेळीं संभवते. अशा स्थितींत काव्यगत व्यक्तीची भावना विचारात घेतली काय वा वाचकाची भावना विचारात घेतली काय भावनाभेदाने सर्व काव्याचें शास्त्रीय वर्गीकरण अशक्य आहे.

श्री. द. के. केळकर हे वाचकाच्या ठिकाणीं जागृत होणारी भावना ध्यानात घेत नाहीत. "भावना आणि तिचा विषय याचा साहचर्यानेच विचार केला पाहिजे" असें ते (पृ.१०५) म्हणतात. ते काव्यगत भावनाच विचारांत घेतात पण तिला ते वाचकाच्या मनो-वृत्तीची कसोटी लावतात. ते म्हणतात (पृ. १०५) की "काव्यातील भावनाना रसत्व प्राप्त होण्यास त्या भावना काव्यगत नायकास आल्हादकारक वाटतात कीं नाही हें पाहण्यापेक्षा रसिक वाचकास त्या कशा वाटतात हे पाहणें महत्त्वाचें होय." या रुचिकरतेला वा रुचिरतेला त्यानी उत्कट आस्वाद्यमानता हें नाव दिले आहे. "आस्वादाङ्कुरकन्दोऽसौ भावः स्थायीति संमतः" (३।१७४) या साहित्यदर्पणातील श्लोकार्धावरून त्याना आस्वाद्यमानता हा शब्द सुचला आहे कोणतीहि भावना रस या पदवीस पात्र ठरण्यास तिच्या मूलभूततेपेक्षा तिची आस्वाद्यमानताच कारणीभूत होते. करुणादींना रस पदवी प्राप्त होते ती आस्वाद्यमानतेमुळेच स्थायी भाव आणि व्यभिचारी भाव यातील व्यवच्छेदक तत्त्व हे उत्कट आस्वाद्यमानता व

आस्वादाङ्कुरकन्दता होय असेंच फलित होतें; आणि हीच उपपत्ति स्थायी भावाचें स्थायित्व हें त्याच्या प्राथमिकता, सार्वत्रिकता आणि स्वतःसिद्धता यांवरून ठरवूं पाहणाऱ्या हेमचन्द्र आणि शॅण्ड यांच्या उपपत्तीपेक्षा अधिक सयुक्तिक होय असें श्री. केळकर यांचें ठाम मत आहे.

परंतु या उपपत्तीच्या आधारें अमुक इतकेच स्थायी भाव आणि त्याप्रमाणे तितकेच रस होतात अशी सविस्तर आणि निश्चित मांडणी करण्याच्या प्रयत्नांत श्री. केळकर पडत नाहीत. त्यांच्या उपपत्तीप्रमाणे बीभत्साचा बहिष्कार आणि भक्तिरसाचा स्वीकार या दोनच गोष्टी सुलभ समर्थनीय होतात. परंतु रति आणि जुगुप्सा यांचे अर्थ व्यापक करून स्थायी भाव म्हणून प्रेम आणि द्वेष यांची स्थापना केली की बीभत्सावर बहिष्कार घालावा लागतच नाही आणि भक्तिरसाचीहि व्यवस्था होते हें आपण मागेच पाहिलें आहे. या दोन गोष्टी करायला आस्वाद्यमानतेचा आधार मुळीच घ्यावा लागत नाही.

आस्वाद्यमानतेची कसोटी लावून सुद्धा श्री. केळकर हे एकंदर भावांची वांटणी स्थायी भाव नि व्यभिचारी भाव या दोन वर्गांत करायला का घेत नाहीत ! न जाणो अशी वांटणी केली आणि एखाद्या व्यभिचारी ठरविलेल्या भावाची कविता रसिकप्रिय झाली तर पाठीमागून अडचण उत्पन्न व्हावयाची. संशय हा आज व्यभिचारी भाव समजला जातो; पण 'संशयकल्लोळ'चा प्रभाव ध्यानात घेतल्यास संशय हा नवीन रस मानावा लागेल. तसें करायला श्री. केळकराची आडकाठी नसेल कारण रसाची संख्या निश्चित करणें ही गोष्ट त्यांच्या मतें फारशी महत्त्वाची नाही. रसोत्कटता ही चार दोन ठराविक भावनावरच अवलंबून असते असे नाही (पृ. १०४) असें बजावणारे श्री. केळकर लगेच दोन वाक्यानंतर म्हणतात की वस्तुतः भावना बदलत नाहीत तर भावनांचे विषय बदलत असतात. मग स्थायी भावांची संख्या निश्चितपणें ठरवावयाला अडचण कोठें आहे !

"उत्कटतेने आस्वाद्यमान या शब्दप्रयोगाचा अर्थहि वाटतो तितका निश्चित नाही" असें प्रो. रा. श्री. जोग यानी लोकशिक्षण मासिकांत (४।१०।७२०) काव्यालोचनांचें जें परीक्षण केलें आहे त्यांत दाखवून दिलें आहे ते म्हणतात की, "उत्कटतेने आस्वाद्यमान आणि वारंवार मनांत घोळावीशी वाटणें या दोन गोष्टींचें क्षेत्रहि एकच येईल असें नाही. 'प्राइड् ॲण्ड प्रेज्यूडीस'मधील गर्व आणि पूर्वग्रह या भावना मनांत घोळाव्याशा वाटणार नाहीत, परंतु लेखिकेच्या कौशल्याने त्या कादंबरींत या भावना उत्कटतेने आस्वाद्यमान झाल्या आहेत हें कोणासहि मान्य करावें लागेल. अशा रीतीने बहुतेक व्यभिचारी भाव लेखकांच्या कौशल्याने आस्वाद्यमान होतील. उदाहरणार्थ, 'श्रद्धाभाव' हीच भावना उत्कटतेने आस्वाद्यमान आहे असें 'सुशीलेचा देव' ही कादम्बरी वाचल्याने वाचकास वाटेल. उत्कटतेने आस्वाद्यमान अशी भावना नाही कोणती ! तशी चित्रित करणारा योजक मात्र पाहिजे. अर्थात् यामुळे कोणत्याहि प्रकारच्या रसव्यवस्थेचा उच्छेदच होईल."

कलेच्या दृष्टीने अनास्वाद्यमान असें कांहीच नाही असे कांही मानसशास्त्रज्ञ प्रतिपादूं लागले आहेत. दुरून डोंगर साजरे दिसतात त्याप्रमाणे योग्य मानसिक अंतरावरून हिडीस तापद गोष्टींचें दर्शनहि आनंदप्रदच होतें. सुंदर वस्तूंचाच अनुभव म्हणजे कांही रसास्वाद नव्हे. कुरूपतेचाहि रसास्वाद घेतां येतो. उदाहरणार्थ, नोत्रदामचा कुबडा Quasimodo याचें व्हिक्टर ह्यूगोने काढलेलें शब्दचित्र वा विअर्झने (Wiertz) काढलेलें रंगचित्र पहा. रसास्वाद म्हणजे कोणत्याहि गोष्टीचा आस्वाद घेण्याचा हा एक प्रकार आहे.

आस्वाद्यमानतेचें नांव पुढे करून श्री. केळकर हे रसव्यवस्थेंत समाजहितकारकतेचें

संशयास्पद सोवळें मात्र आणून ठेवीत आहेत. ते म्हणतात (पृ. १०५) की अन्य स्त्रीवर प्रेम करणाऱ्या व्यक्तीस प्रेमाचा उत्कट अनुभव येत असेल; पण असलें प्रेम समाजहित-विरोधी आहे या शिकवणुकीची छाप मनावर असल्याने रसिकाच्या रसास्वादांत उणीव उत्पन्न होते, म्हणजेच तो पूर्ण उत्कट स्वरूपास पोहचूं शकत नाही. येथे ते जगन्नाथाप्रमाणे रस न मानता रसाभास मानतात. परंतु अनुभव विरुद्ध येतो. अन्य स्त्रीवर का होइना पण उत्कट प्रेम जर वर्णन करण्यात आलें असेल तर रसिक तल्लीन झाल्यावांचून राहतच नाही. मृच्छकटिक नाटकांत चारुदत्ताचा प्रेमविलास हा त्याची पत्नी धूता हिच्याशीं न दाखवितां वसन्तसेना या गणिकेशीं दाखविण्यांत आला आहे म्हणून का तेथे रसनिष्पत्तिच होत नाही असें मानावयाचें ! पशुपक्ष्यादिकांच्याहि रतीविषयी ते म्हणतात (पृ. १०५) की "पशूंची रति ही उत्तान आणि ग्राम्य असल्याने तिच्या वर्णनाने रसाभास उत्पन्न होतो असेंच मानणें रास्त आहे." पशुपक्ष्यादिकांच्या संभोगाचें वर्णन उत्तान आणि ग्राम्य होईल परंतु त्याच्यातहि अनुनयाचे जे प्रकार आढळतात त्यांचें वर्णन सरस का होऊं नये ! क्रोधाविषयींहि श्री. केळकर म्हणतात (पृ. १०५) "नुसता क्रोध हा रस होऊं शकत नाही, तर सात्त्विक क्रोध हाच होऊं शकतो; कारण, सात्त्विक क्रोध ही भावना समाजहितपोषक म्हणूनच आनंदकारक होय. तसेंच शौर्याचें. दुष्टनिर्दालनार्थ जें शौर्य त्याच्याच चिन्तनात आस्वाद मिळूं शकतो; म्हणजे त्यालाच रस पदवी प्राप्त होते." परंतु अलेक्झांडर, तैमूरलंगादि क्रूर शूर वीराच्या पराक्रमाचीं वर्णनें वाचण्यात वाचक रंगून जातो त्या अर्थी रसनिष्पत्ति होते हे नाकारून चालणार नाही. समाजहित-पोषकतेचा रसाशीं काही एक संबंध नाही. सौंदर्य आणि अर्थ याचा जितका संबंध आहे तितकाच रस आणि समाजहित याचा आहे. आयागोच्या द्वेषविलासात आणि ऑथेल्लोच्या असूयासन्तापात समाजहितपोषक काय आहे ? नौडीलावर्णी पौष्टिक नाहीत म्हणून आपण नीरस अतएव त्याज्य मानीत नाही. भज्यासारखे तळीव पदार्थ शरीरपोषणाच्या दृष्टीने हानिकारक असूनहि रुचिदृष्ट्या आकर्षक असल्याने आपण ग्रहण करितों. शरीरपोषणासाठी अवश्य तीं द्रव्यें जठरांत अन्य मार्गाने घातलीं असताहि जिव्हेचें समाधान होत नाही ते व्हावें म्हणून एक रोगी रुचकर पदार्थ चावून थुंकून टाकी हें मीं स्वतः पाहिलें आहे. मानसिक लौल्य पुरवील तेंच आस्वाद्यमान, तेंच सरस काव्य होय.

तेव्हा रसव्यवस्था करायला आस्वाद्यमानता उपयोगी पडत नाही हें आपण पाहिलेंच. श्री. केळकर काव्यानंदासंबंधी लिहिताना जें विधान करितात तें आस्वाद्यमानतेच्या तत्त्वालाहि लागू पडेल. ते म्हणतात (पृ. १४२) "काव्यानन्दाचें स्वरूप अपूर्व आणि अलौकिक आहे यांत शंका नाही, परंतु नुसतें अपूर्व किंवा अलौकिक म्हटल्याने मानवी जिज्ञासा कधीच तृप्त होत नाही." जें मनोरंजक तेंच वाङ्मय, तेंच काव्य असें एकदा आरंभींच सिद्ध करून घेतल्यानंतर काव्यांतील भावना आस्वाद्यमान पाहिजे असें म्हटल्याने काही अधिक अर्थबोध होत नाही, मानवी जिज्ञासा तृप्त होत नाही.

रसव्यवस्था हें एक स्थूल मानाने केलेलें कामचलाऊ वर्गीकरण आहे; आणि तें शास्त्रशुद्ध करायला ज्याप्रमाणे भावनेच्या मूलभूततेचा उपयोग होत नाही, त्याचप्रमाणे आस्वाद्यमानतेचाहि उपयोग होत नाही. रसविवेचन हें कितीहि पाण्डित्यपूर्ण वाटत असलें तरी तें शेवटीं शून्यसंशोधनच ठरतें !

मा. त्र्यं. पटवर्धन, कोल्हापूर

# हिंदी भाषा आणि भारतीय राष्ट्रीयत्व



हिंदुस्थानामध्ये आजकाल सामाजिक, आर्थिक, राजकीय अशा निरनिराळ्या प्रकारच्या प्रश्नांबद्दलच्या विचारसरणींत एकच गोंधळ उडालेला दिसून येत आहे. सर्व देशभर एक-राष्ट्रत्वाच्या दृष्टीने एक राष्ट्रभाषा असावी का नाही, पाहिजे असल्यास ती कोणती असावी, हाहि अशापैकीच एक प्रश्न होय; आणि या भाषाविषयक माजलेल्या वादास म. गांधी हे इतर सर्वांपेक्षा अधिक जबाबदार आहेत. ते आपल्या हिंदीप्रचारार्थ होणाऱ्या भाषणांत प्रांतिक भाषा व त्यातील वाङ्मय यांचें महत्त्व ओळखून हिंदी भाषेचा प्रचार करीत असले तरी या भाषाविषयक प्रश्नास भलतें महत्त्व देण्याचें श्रेयहि त्यानाच आहे. हिंदी राष्ट्रसंघटनेच्या मार्गांत हिंदुस्थानातील भाषांची विविधता ही एक मोठी धोंड आहे ही गोष्ट हिंदी राजकीय पुढाऱ्यांनी यापूर्वी ओळखली होती व तींतून मार्ग काढण्याचा त्यांनी प्रयत्नहि चालविला होता. निरनिराळ्या मातृभाषा असल्यामुळे परस्परांच्या प्रांतिक दळणवळणां-मध्ये सुशिक्षितांना इंग्रजीसारखी परकीय भाषा माध्यम म्हणून वापरावी लागते ही कमीपणाची गोष्ट असल्याची कबूलीहि पुष्कळांनी दिली होती. परंतु एकराष्ट्रभाषेच्या मुद्याला संपूर्ण स्वातंत्र्याइतकें महत्त्व देणें, हिंदी माध्यमाचा प्रश्न मला स्वराज्याइतकाच महत्त्वाचा वाटतो असे उद्गार काढणें, पसतीस कोटि लोक एकच भाषा बोलू लागल्याशिवाय संपूर्ण स्वातंत्र्य अगदींच अशक्य नसले तरी अपुरें खास आहे असा भ्रम सर्वसाधारण जनतेमध्ये उत्पन्न करणे, नुसत्या राजकीय सोयीसाठीच नव्हे तर संस्कृतीसारख्या संदिग्ध कल्पनेच्या मुद्यावरूनहि राष्ट्रीय भाषेच्या जरुरीवर जोर देणें; "हिंदुस्थान हें एक राष्ट्र आहे; तो एक राष्ट्रपुरुष म्हणून तयार होऊं लागला आहे; संयुक्तिकरणाच्या विचाराने त्यास एक प्रकारचा जोम आला आहे; तेथील विद्वान माणसांना एक भाषा, एक लिपी, एक साहित्य वगैरेसारखीं पूर्वी कधींहि न पडलेलीं स्वप्नें पडत आहेत" (त्रिवेणी, सप्टेंबर १९३६) यासारखें लिखाण लिहिण्यास श्री. मुन्शी यांच्यासारख्यास उद्युक्त करणें, ह्या सर्व गोष्टींस महात्माजीच कारणी-भूत आहेत. नैतिक व राजकीय क्षेत्रांत असलेलें आपलें वजन महात्माजी हिंदुस्थानांतील भाषांच्या इतिहासामध्ये एक मोठी चळवळ करण्याकडे खर्च करीत आहेत. त्यामुळेच राज-कीय व सांस्कृतिक प्रश्न यांचा गोंधळ होत आहे. हीच विचारसरणी जर तर्कदृष्ट्या अशीच पुढे नेली तर हिंदी स्वराज्याचा प्रश्न अखिल हिंदुस्थानांतील लोक हिंदी बोलूं शकेतोपर्यंत पुढे ढकलावा लागेल. या दृष्टीने विचार करावयाचा तर हिंदुस्थानांतील भाषावैचित्र्यांतून फक्त एकच मार्ग शिल्लक उरतो व तो म्हणजे हिंदीखेरीज इतर सर्व भाषा दडपून टाकावयाच्या व हळू हळू त्या नाहीशा करावयाच्या. आंतरप्रांतीय दळणवळणाची राज-कीय सोय साधते या व्यावहारिक गोष्टीस सांस्कृतिक दृष्ट्या होणाऱ्या काल्पनिक फायद्याची-हि जोड दिली तर प्रांतिक भाषा हलके हलके नष्ट करणेंच क्रमप्राप्त ठरतें. तुळशी-दासाच्या हिंदी रामायणाची गोडी किंवा दक्षिण व उत्तरेतील लोकांनी परस्परांच्या दळण-वळणाने आपलें वाङ्मय समृद्ध करण्याची शक्यता वगैरे गोष्टींचा राजकीय सोयीच्या

मुद्यांशीं कांही एक संबंध नाही. तसें म्हटलें तर जपानी, डच, बंगाली वगैरे भाषामध्येहि हिंदी भाषेइतकेंच उत्कृष्ट साहित्य आहे. तर मग दक्षिणी लोकांचें जपानी, बंगाली, डच भाषा बोलणारांशींहि परस्परसहकार्य होणें हें तितकेंच उपयुक्त ठरणार नाही काय !

नुकत्याच काही महिन्यापूर्वी मद्रास येथे भरलेल्या हिंदी संमेलनामध्ये दक्षिणी लोकांना हिंदी शिकण्यास उद्युक्त करण्याकरिता जे निरनिराळे मुद्दे पुढे मांडण्यात आले ते खरोखरच अत्यंत गमतीदार आहेत. त्यावरून हिंदी प्रचाराच्या चळवळीमध्ये शास्त्रशुद्ध विचारसरणीचा किती अभाव आहे हें स्पष्ट दिसून येतें. श्री. बजाज आपल्या भाषणात म्हणाले कीं, "'दक्षिणी लोकाना जर हिंदी शिकविलें तर नोकऱ्याच्या बाबतींत ते आपणाशीं स्पर्धा करूं लागतील व त्यामुळे बेकारीचा प्रश्न जास्तच बिकट होईल' अशाप्रकारचा घातकी प्रचार उत्तर हिंदुस्थानातील काही लोक करीत आहेत. परंतु मला तर त्यात कांहीच भय वाटत नाही. उलटपक्षीं हिंदुस्थानातील हुशार लायक माणसाना—मग ते कोणत्याहि भागांतून येवोत—जागा दिल्या जातील व ही गोष्ट खात्रीनें देशहिताची आहे." श्री. बजाज यांना दक्षिणेंतील ज्या वर्गातून कारकुनी पेशाच्या लोकाच्या भरणा होतो अशा लोकाना ह्या चळवळीमध्ये सामील करून घेण्याकरिता हें आमिष पुरेसें आहे असें वाटतें. सर्वांत आश्चर्याची गोष्ट अशी की श्री. राजगोपालचारियर यानींहि "दक्षिणेंतील बेकाराना हिंदी शिकल्यामुळे उत्तरेंत वाव मिळेल" असें बोलून एक प्रकारें पुष्टीच दिली. श्री. कालेलकर म्हणाले की, 'आज उत्तर हिंदुस्थानामध्ये पुष्कळ दक्षिणी लोक वृत्तपत्रव्यवसाय करीत आहेत व त्याना हिंदीचें ज्ञान लाभदायक होतें हें पूर्णपणें कळून चुकलें आहे. मला असें वाटतें की यावरून दक्षिणी व्यापारी व कारखानदार व्यापार व उद्योगधंद्याच्या वाढीच्या दृष्टीने हिंदी भाषेची उपयुक्तता लक्षात घेतील'. श्री. कालेलकर यानी हिंदी शिकण्यासाठी दाखविलेले व्यापारवाढीचें आमिष तुळशीदासाच्या रामायणांतील गोडीपेक्षा पुष्कळ बरें आहे एवढेंच ! श्री. लीलावती मुन्शी म्हणाल्या की जर तुम्हीं तामिळीमध्ये किंवा मीं गुजराथीमध्ये काही लिहिलें तर तें फक्त एक किंवा दोन कोटि लोकानाच वाचतां येईल परंतु तेच जर हिंदींत लिहिलें तर किंवा त्याचें हिंदींत भाषांतर केलें तर तें जवळजवळ हिंदुस्थानातील निम्म्याहून अधिक लोकांना वाचतां येईल. ही गोष्ट लक्षात येऊनच रेडियो किंवा बोलपटवाल्याना हिंदीप्रचार हा एक धंदावाढीला फायदेशीर असा झालेला आहे. ह्या हळव्या मनाच्या गुजराथी साहित्यसेविकेवर धंदावाढीचा मुद्दा आमच्यापुढे मांडण्याची काय जबाबदारी पडली होती तें ईश्वर जाणे !

फक्त राजकीय सोईच्या दृष्टीनेच काय ती हिंदीप्रचाराची जरुरी आहे, इतर सर्व मुद्दे अगदी क्षुल्लक आहेत ही गोष्ट आता सर्व पुढाऱ्याना कळून चुकली आहे. हिंदी शिक्षणापासून दक्षिणी लोकाना होणाऱ्या फायद्यांचें काढलेलें अनुमान आता अवास्तव असल्याचें स्पष्ट दिसत आहे. "दक्षिणी लोकांमध्ये बुद्धिमत्ता आहे तर उत्तरेकडील लोकांमध्ये लढाऊपणा भरलेला आहे. ह्या दोन्हींचा मिलाफ होणें अत्यंत जरूर आहे व तो मिलाफ फक्त हिंदी भाषेच्या प्रचाराच्या योगानेच होईल" असें जेव्हा श्री. बजाज म्हणतात तेव्हा मोडकेंतोडकें हिंदी बोलण्यास शिकल्याने पठाण-शिखासारखें लढाऊपण आपल्या अंगीं येईल हें जरा कसेंसेंच वाटतें. राष्ट्रीय भाषेच्या प्रश्नावर लिहितांना एक मद्रासमधील दैनिक वर्तमानपत्र लिहितें की "दाक्षिणी राजकीय पुढाऱ्याचें उत्तरेकडील जनतेवर वजन कमी बसण्याचें मुख्य कारण म्हणजे त्याना उत्कृष्ट हिंदीमध्ये अस्खलितपणें बोलतां येत नाही." जर खरोखरच हा मुद्दा खरा असला तर अस्खलित तर राहूंद्याच पण मोडकेंतोडकें देखील

ज्यांना तामीळ किंवा तेलगू बोलतां येत नाही अशा महात्मा गांधींचें किंवा पंडित जवाहरलाल नेहरूंचें तामिळ नाडु किंवा आंध्र प्रातांत इतकें वजन कसें बसलें, हें मात्र तेथे स्पष्ट करावयास पाहिजे होतें !

भाषावृद्धीची किंवा साहित्यांतील प्रतिभेची वाढ यांचीं शास्त्रीय तत्त्वें हिंदी चळवळीच्या पुढाऱ्यावर कांहीच परिणाम करूं शकत नाहींत हें दुर्दैव होय. उलट, हिंदी चळवळ आता एकाहून एक विचित्र रूपें धारण करूं लागली आहे. मुन्शींसारखे लोक असेंहि म्हणूं लागले आहेत की द्राविडी भाषांतील संस्कृत घटकावरच जर विशेष जोर दिला तर दक्षिणी लोकांना हिंदी भाषा बरीच जवळ वाटूं लागेल. मुन्शींना ही साम्यता दाखवून त्याना जवळ आणण्याची काय उपयुक्तता वाटते हें आपण तर्कानेच ठरविलेलें बरें ! हेच गृहस्थ पुढे म्हणतात "तेलगू, मल्याळयम वगैरे भाषामध्ये संस्कृत शब्दांचा इतका भरणा आहे की जर त्या देवनागरी लिपींत लिहिण्यास सुरवात केली तर संस्कृत भाषेपासून ज्या ज्या भाषाची उत्पत्ति आहे अशा सर्व भाषा बोलणारांना त्यांतील बराचसा भाग कळेल. ही सर्व भाषामधील साम्यता त्यांतील संस्कृत घटकांमुळेच उत्पन्न झालेली आहे. मला तर त्या त्या भाषांतील मूळ सस्कृत घटकांवर विशेष जोर देण्यास काय हरकत आहे हेच कळत नाही. उलट मी तर असें म्हणेन की प्रांतिक भाषाचें सौंदर्य व शब्दभाण्डार जर त्यांतील संस्कृत शब्द काढून टाकले तर पूर्णपणें नाहींसें होईल" (त्रिवेणी, सप्टेंबर १९३६). ह्याच तत्त्वानुरोधाने श्री. मुन्शींच्या गुजराथी लेखनाचें आम्हाला नीटसें परीक्षण जरी करता यावयाचें नाही तरी पण या ठिकाणीं येवढेंच सागावेंसें वाटतें की आज कर्नाटक, केरळ, आंध्र वगैरे भागातून त्या त्या भाषातील साहित्यिकांमध्ये संस्कृत शब्दांची रेलचेल करण्यापेक्षा संस्कृताच्या दास्यत्वांतून मुक्त होण्याकडे जास्त प्रवृत्ति दिसून येत आहे. आजकाल त्याचे प्रयत्न संस्कृत पद्धतीचे उपमा व अलंकाराचे अवडंबर टाकून देऊन त्या जागीं उत्कृष्ट पण साधें असें गद्य व पद्य रचण्याच्या दृष्टीने प्रयत्न चाललेले आहेत. नुकत्याच मद्रास येथे भरलेल्या साहित्यसंमेलनाच्या वेळीं श्री. पुरुषोत्तमदास टंडन व त्यांच्या विचाराचे लोक ह्यांनी दक्षिणी लोकाना हिंदीचें ज्ञान सुलभ व्हावें ह्याकरिता हिंदी व्याकरणामधे—विशेषतः त्यांतील लिङ्गविषयक नियम ह्यांमध्ये—अत्यंत क्रान्तिकारक फरक करावेत अशी योजना माडली. ही योजना जवळ जवळ सर्वमान्य होत होती, परंतु श्री. राजगोपाळाचारियर यांनी वेळींच "एका लहानशा हिंदी न जाणणाऱ्या लोकसमुदायाकरिता हिंदीमधील महत्त्वाचे व्याकरण-नियम बदलण्याचें काही प्रयोजन नाही" हा मुद्दा स्पष्टपणे तामीळ भाषेमध्ये माडला ! स्पष्ट बोलायचेंच तर ही शिकवण इतकी प्राथमिक स्वरूपाची आहे की ती श्री. राजगोपालाचारियरा-सारख्या प्रसिद्ध पुरुषांनी श्री. टंडनसारख्या प्रसिद्ध व्यक्तीला सार्वजनिक जागीं शिकवावी हें विचित्र होय. किंबहुना एकीकडे राष्ट्रीय सभेने "सर्व अल्पसंख्याकांच्या, तसेंच सर्व प्रातांच्या भाषा, लिपी व संस्कृति याचें संरक्षण केलें जाईल" अशा मूलभूत हक्कासंबंधीचा ठराव करावा व दुसरीकडे काही पुढारी म्हणविणारानी सर्व भाषातील संस्कृत किंवा द्राविडी घटक लक्षांत न घेता एक लिपी प्रचारांत आणण्याचा हव्यास धरावा ही गोष्ट खरोखरच हिंदीचा प्रचार कर-णाऱ्या या पुढाऱ्यामध्ये योग्य दृष्टि व शास्त्रशुद्ध विचारसरणी यांचा पूर्ण अभाव असल्याची साक्ष देत आहे.

या मूलग्राही पद्धतीने विचार करणाऱ्याच्या लक्षांत येईल की आजची हिंदी प्रचा-राची चळवळ विसंगत विचारसरणीवर उभारलेली आहे व त्या प्रचारकांचा आग्रहीपणा तर शुद्ध अप्रासंगीक आहे. इंग्रजीसारख्या एका परकीय भाषेबद्दल भावनावश होऊन तिरस्कार

वाटूं लागावा हें कांही हिंदी प्रचारास पुरेसें कारण होऊं शकत नाही. समजा पुढील कांही वर्षात सर्व प्रांतातील पुढारी इंग्रजीवर चांगलें प्रभुत्व मिळवूं शकले तरी देखील आपण राष्ट्रीय सभेमध्ये चर्चेसाठी इंग्रजी हे माध्यम म्हणून न वापरतां हिंदीच वापरावें असा ठराव होईल तर तो कां व्हावा, हें आम्हास कळावयास हवें. इंग्रजींतील भाषणें सर्व प्रजेला कळत नाहीत हें खरें आहे; परंतु भाषणाचें भाषांतर सहज करता येतें. तसेंच आपल्या देशामध्ये ह्या प्रांताचा पुढारी त्या प्रांतांत जातो किंवा उत्तरेकडील पुढारी दक्षिणेमध्ये येतो तेव्हा भाषणाचें भाषांतर करणें अनिवार्यच होऊन बसतें. दुसऱ्या अनेक महत्त्वाच्या गोष्टींवर दक्षिणी लोकांचें लक्ष आज एकवटलें असतांना तेथून तें काढून राष्ट्रभाषेसारख्या, राजकीय दृष्ट्या दुय्यम अशा, गोष्टीकडे लावणें व निष्कारण त्याचा व्यय करणें कितपत योग्य होईल ? जेव्हा जेव्हा दक्षिणेंतील पुढारी इंग्रजीमध्ये बोलूं लागतात तेव्हा तेव्हा उत्तरेकडील कॉंग्रेसवाले पुढारी स्वतः इंग्रजी चांगलें जाणत असूनहि व राष्ट्रीय सभेने दोन दुभाष्याची नेमणूक करून भाषांतराची अडचण भागविणें त्यांना सहज शक्य असतांहि दक्षिणी पुढाऱ्याना राष्ट्रीयत्वाचा अभिमान नाही अशी ओरड करतात, व श्री प्रकाशम् किंवा सत्यमूर्तीसारख्या उत्कृष्ट वक्त्यांना हिंदींत भाषणें करावयास लावतात हा शुद्ध जुलूम होय. अशा या हुकमशाही स्वरूपाच्या वर्तनापुढे दक्षिणी पुढारी आपल्या माना कां लवविताात कोण जाणे ! राष्ट्रीय सभा ही एक राजकीय चर्चा करणारी संस्था आहे. मग ती चर्चा कोणत्याहि भाषेमध्ये होवो व त्याकरिता कोणत्याहि भाषेचा उपयोग करावा लागो. राष्ट्रीय सभा ही कांही हिंदीप्रचारसभेचें एक अंग नाही. हा मुद्दा हिंदी पुढाऱ्यानी सडेतोडपणें पुढे मांडला पाहिजे. अर्वाचीन शास्त्रीय ज्ञान, राजकीय तत्त्वज्ञान व अर्थशास्त्र यामधील आपलें वाचन करताना किंवा विश्वविद्यालयातून शास्त्रीय विषय शिकवितांना आपण इंग्रजीचा सरसहा उपयोग करतों व त्यामुळे आपल्यावर इंग्रजीचें वर्चस्व पूर्वीइतकेंच कायम आहे. मग राष्ट्रीय भाषा म्हणून हिंदी भाषेचा एवढा प्रचार कशाला ? पाश्चिमात्य संस्कृतीचें आपल्यावरील दडपण झुगारून देणें हेंच जर हिंदी प्रचाराचें मुख्य ध्येय असेल व त्याच्या बुडाशीं कांही राजकीय हेतु नसेल तर मग त्या आंतरप्रांतीय भाषेचें व तिच्या प्रचाराचें इतकें महत्त्व कां ? संस्कृतीच्या दृष्टीने आंतरप्रांतीय भाषेपेक्षा मातृभाषेचीच योग्यता जास्त तर मग मातृभाषेच्या उन्नतीवर मुख्यत्वें करून कां बरें जोर देऊं नये ?

बरें, हिंदुस्थानची एक सर्वसाधारण अशी राष्ट्रीय भाषा करावी म्हणजे तरी काय ? हिंदुस्थानातील पसतीस कोटि लोक किंवा दक्षिणेंतील खेड्यांतील शेतकरी हिंदी शिकून हिंदी बोलूं लागेल ही गोष्ट हिंदी प्रचार करणाऱ्या पुढाऱ्याना शक्य तरी वाटते का ? दक्षिण भारत हिंदीप्रचारसभेचे कार्यवाह लिहितात (हिंदु, २० ऑगस्ट १९३७) "हिंदीप्रचारसभेचा मुख्य उद्देश शेकडा शंभर टक्के लोक हिंदी जाणणारे करावयाचे हा होय." आज शेकडा ९० पेक्षा अधिक अशिक्षित लोक असताना हिंदीप्रचारसभेला ते सर्व हिंदीमध्ये शिक्षित करावेत असें कसें वाटतें ? का लहान मुलाना प्राथमिक शिक्षणामध्ये मातृभाषेबरोबरच हिंदीनेंहि शिक्षण द्यावें ? तामीळ, तेलगू भाषेसाठींहि देवनागरी लिपी वापरण्यास सुरवात झाली ही गोष्ट लहान मुलांना पूर्ववयांतच पुढील शिक्षणक्रमात दोन भाषांचा अभ्यास डोक्यावर बसणार याची पूर्वसूचना तर नव्हे ना ? ह्या प्रश्नांना हिंदीप्रचारसभेने पुढील कोणतेंहि कार्य चालू करण्यापूर्वी योग्य तीं प्रामाणिक उत्तरें द्यावींत असें आमचें म्हणणें आहे.

दक्षिणेमध्ये हिंदीप्रचार करण्यामध्ये मुलभूत असा जर कोणता दोष असेल तर तो असा की एकच भाषा असणाऱ्या प्रत्येक गटाची उत्कृष्ट संघटना करणें हें प्रथम जरूरीचें

असतांना त्या गोष्टीला हिंदीप्रचारचळवळीचे लोक एकराष्ट्रभाषेने राष्ट्रीय संघटना होईल ह्यासारख्या काल्पनिक गोष्टीमागे लागून योग्य तें महत्त्व देत नाहीत. तसेंच राष्ट्रीय संघटनेपूर्वी भाषावार प्रांताची पुनर्रचना करण्याचें महत्त्वहि ते लक्षात घेत नाहीत. आपल्याच भाषेच्या प्रातांत चिकटून राहणाऱ्या बहुजनसमाजापेक्षा, तसेंच त्या त्या प्रातांतील राज्यकारभारामध्ये, कोर्ट व कायदेमंडळांमध्ये, इतकेंच काय पण शिक्षणपद्धतीमध्ये व विश्वविद्यालयातील उच्च शिक्षणामध्येहि मातृभाषेचा सर्रास उपयोग करणें हें अधिक जरूरीचें आहे हें लक्षांत घेण्यापेक्षा त्यांना भावी संयुक्त कायदेमंडळाच्या सभासदाबद्दल व प्रांताप्रांतांत व्यवहार करणाऱ्या अल्पसंख्याक लोकाबद्दलच विशेष काळजी लागलेली आहे असें दिसतें. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर हिंदुस्थानची एकी संयुक्त घटनेच्याच तत्त्वावर होऊं शकेल ही गोष्ट हिंदी प्रचारकांना तितकीशी कळली नसावी असें वाटतें. संयुक्त तत्त्वावर एकी करावयाची झाल्यास प्रत्येक प्रांतातील भाषेबद्दलचें प्रेम, निष्ठा व मान हा त्या त्या प्रातांत प्रथम मान्य केलाच पाहिजे. मातृभाषेबद्दलचें प्रेम, वाटणारी निष्ठा व अभिमान ह्यांबद्दल महात्मा गांधींना तितकेंसें कांही वाटत नसेल परंतु लोकमान्य टिळक व देशबंधु दास ह्यांच्यासारख्या हिंदुस्थानच्या संघटनेची जरूरीची पूर्ण जाणीव असणाऱ्या लोकांनी हिंदीप्रचारकांच्या देवनागरी-लीपी लुडबुडीस व हिंदी-माध्यम-प्रचारास पूर्वीच चोख उत्तरें दिलेलीं आहेत. मुंबई, मद्रास, संयुक्त प्रांतासारख्या निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्या गटाच्या एकीकरणाने तयार झालेल्या प्रांतातील कायदेमंडळांत अनुभवास येणारा भाषेच्या अडचणींचा प्रश्न सोडवितांना हिंदीचा प्रचार करणें हा योग्य मार्ग नसून भाषावार प्रांताची पुनर्रचना करणें हाच योग्य मार्ग होय. एक भाषेच्या पायावर आधारलेला संघटनेचा डोलारा सुरवातीसच जितका त्रासदायक होईल तितकाच तो शेवटींहि फोल ठरणार आहे. रशियामध्ये देखील भाषावैचित्र्याचा प्रश्न उत्पन्न झालेला होता. पण रशियाने तो हिंदुस्थानामध्ये हिंदीप्रचारक लोक ज्या रीतीने सोडवूं पाहात आहेत त्याच्या अगदी विरुद्ध दिशेने सोडविला. या संबंधात पुढील उतारा जरी भाषाप्रश्नाचा शिक्षणदृष्ट्या विचार करतांना लिहिलेला असला तरी रशियाने हा प्रश्न किती शहाणपणाने सोडविला हे पाहण्याच्या दृष्टीने बोधप्रद होईल.

"लेनिनला—तो रशियाचा सर्वाधिकारी असतांना—राष्ट्रातील अल्प संख्याकांबद्दल फारच थोडी सहानुभूति होती. परंतु स्टॅलिनने रशियांतील बहुमतवाल्याच्या समाजसत्तावादी संघटनेंत दुरुस्ती केली. त्याने देशातील अल्पसंख्य वर्गांना त्यांनी त्यांचीच मातृभाषा माध्यम म्हणून वापरावी हें कबूल करून, आपला समाजसत्तावाद यांच्या गळीं उतरविला. अशा रीतीने निरनिराळ्या भाषांच्या लोकांचें त्याने एकाच तत्त्वावर संघटन केलें" (एन्. हॅन्स, कम्पॅरेटिव्ह स्टडी ऑफ युरोपियन एजुकेशन).

भविष्यकाळामध्ये सर्व प्रांतिक भाषा बाजूस सारून हिंदी ही हिंदुस्थानची राष्ट्रीय भाषा होणे शक्य नाही. या तऱ्हेने भाषांचें एकीकरण शक्यहि नाही व उपयुक्तहि ठरणार नाही. जगातील भाषांच्या इतिहासाकडे जर पाहिलें तर बोलीची भाषा बनते व अशा रीतीने भाषांची संख्या वाढत जाते. परंतु निरनिराळ्या भाषांचें एकीकरण झाल्याचें उदाहरण आजपर्यंत तरी कोठे आढळून येत नाही. बंगाली, तेलगू, मराठी, तामिळी, गुजराथी वगैरे भाषानांहि जगण्याचा व ज्ञान व संस्कृति वाढविण्याचा हिंदीइतकाच अधिकार पोहोचतो. प्रत्येक भाषा-क्षेत्रामध्ये मातृभाषेला सर्वांत उच्च स्थान असणे साहजिक आहे व अपरिहार्यहि आहे. जेव्हा भाषावर प्रांतरचना होईल—व ती होणें अत्यंत जरूर आहे—तेव्हा प्रत्येक प्रांतांत त्या त्या

प्रांतांतील राज्यकारभारांत, कायदेमंडळांत, न्यायकोर्टांत. विश्वविद्यालयांत देखील, त्या त्या प्रांतांतील मुख्य भाषेचाच उपयोग केला जाईल. हिंदी भाषा जर ती जागा बळकावूं पाहील तर तें शक्य नाही.

इतकें जरी असलें तरी हिंदी भाषेला हिंदुस्थानच्या भविष्यकाळामध्ये एक प्रकारचें महत्त्व आहे. कारण देश हा प्रांतापेक्षा मोठा असतो. प्रांताचा देशांत अंतर्भाव होत असतो. म्हणून प्रत्येक प्रांताला मध्यवर्ती संयुक्त कायदेमंडळांतील कामकाजाकरितां व आंतरप्रांतीय व्यवहाराकरितां एका सर्वसाधारण राष्ट्रभाषेची जरुरी आहे. आजपर्यंत व पुढे कांही वर्षे इंग्रजी भाषेला हें काम करावें लागणार आहे. प्रत्येक देशांतील राष्ट्रभाषा त्या देशांतीलच एक भाषा असावी ही गोष्ट अगदी खरी आहे व शक्यहि आहे. अशा वेळीं हिंदी भाषेलाच हिंदुस्थानमध्ये राष्ट्रभाषा होण्याचा सर्वांत अधिक मान आहे, कारण आज जवळ जवळ बारा कोटि लोक हिंदी बोलणारे आहेत व जवळ जवळ दहा कोटि लोकांना हिंदी नीटपणें कळतेंहि. ह्या संक्रमणकालामध्ये मध्यवर्ती सरकारामध्ये इंग्रजी भाषा व्यवहारांतून काढून टाकणें शक्य नाही. कारण हिंदीचा प्रचार आज हिंदी न जाणणाऱ्यामध्ये फारच थोडा झालेला आहे. तसेंच अर्वाचीन ज्ञान त्या त्या भाषांमधून सांगण्याइतकी सर्व प्रांतिक भाषांची उन्नति अद्याप झालेली नाही. म्हणून मध्यवर्ती सरकारमध्ये हिंदी व इंग्रजी ह्या दोन्हींचा समावेश करावा. परंतु त्याच वेळीं हेंहि मान्य करावयास पाहिजे की राजकीय सोयींव्यतिरिक्त दक्षिणी किंवा इतर हिंदी न जाणणाऱ्या लोकांना आपल्या मातृभाषेऐवजीं हिंदीला मुख्य स्थान देण्याची इतर कोणत्याहि प्रकारें जरुरी नाही.

भविष्यकाळांत मध्यवर्ती सरकारामध्ये हिंदी भाषा राष्ट्रभाषा म्हणून उपयोगांत आणण्याचें ठरविल्यावर हिंदी न जाणणाऱ्या इतर सर्व प्रांतांतून मातृभाषेबरोबरच हिंदीचें शिक्षण देणें जरूर होईल. परंतु त्याचबरोबर हिंदी भाषेला मातृभाषेइतकें स्थान मुळीच देता येणार नाही. प्राथमिक शिक्षणाच्या वेळीं ती मुलाच्यावर लादावयाची नाही. शेकडा शंभर लोक हिंदी जाणणारे करावयाचें हें ध्येय अशक्य तर आहेच पण त्यापेक्षा तें फार धोक्याचेंहि आहे. प्राथमिक शिक्षणाच्या अभ्यासक्रमांतून मातृभाषेबरोबर हिंदी भाषा शिकविण्याचें ठरविणें केव्हांहि रास्त होणार नाही कारण ह्या दोन भाषांचें शिक्षण देण्याचे प्रयत्न करण्याने शहरांतून किंवा खेडेगांवांतून शिक्षितांचा आकडा वाढविण्यापेक्षा, दोन्ही भाषा लवकरच विसरून लोक निरक्षर होण्याचा मात्र अधिक संभव. प्राथमिक शिक्षणानंतर शिक्षण सोडून देणाऱ्या बहुसंख्य वर्गाला हा दुहेरी बोजा उचलणें शक्य नाही. त्यांनी आपल्या विश्रांतीच्या वेळांत आपल्या मातृभाषेचें ज्ञान कायम ठेवलें तरी पुरे आहे! खेरीज, प्राथमिक शिक्षणानंतर शिक्षण सोडणाऱ्या लोकांना हिंदी शिक्षणाची तर मुळीच जरुरी नाही. कारण एक तर ते मध्यवर्ती कायदेमंडळांत खास निवडून येत नाहीत किंवा त्यांना आपला प्रांत सोडून जाण्याचीहि पाळी येत नाही. ज्या थोड्याबहुत लोकांना प्राथमिक शिक्षण संपविल्यावर पुष्कळसा वेळ मिळतो व ज्यांना हिंदी शिक्षणाची आवड आहे अशा लोकांची हिंदी शिक्षणाची सोय मात्र करून दिली पाहिजे. तसेंच मध्यवर्ती सरकारमध्ये जे निवडून आलेले असतील व ज्यांना हिंदी बोलतां येणें शक्य नाही अशांना आपला दुभाष्या देऊन मातृभाषेंत भाषण करण्याची परवानगी देण्यांत यावी. त्या दुभाष्याने संक्रमणकालामध्ये इंग्रजी किंवा हिंदीमध्ये व भविष्यकाळांत हिंदीमध्येच त्या भाषणाचें भाषांतर सांगावें. राष्ट्रसंघामध्ये जरी फ्रेंच व इंग्रजी या दोन भाषा कामकाजाच्या म्हणून ठरविल्या आहेत तरी कोणाहि प्रतिनिधीला जर आपला दुभाष्या दिला तर मातृभाषेंतून

भाषण करण्याची तरतूद करून दिलेली आहे. हिंदी भाषेचा प्राथमिक शिक्षणांत जर प्रवेश केला तर शिक्षिताची संख्या घटण्याचा व सार्वजनिक पैशाचा निष्कारण अपव्यय होण्याचा फार संभव आहे.

हिंदुस्थानचें एकराष्ट्रीयत्व स्थापन होण्यास हिंदीखेरीज इतर मातृभाषा जाणणाऱ्या माणसांना हिंदी व त्यांची मातृभाषा अशा दोन भाषा आल्याच पाहिजेत अशी काही जरूर नाही. जोपर्यंत हिंदुस्थान हें एक निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्या प्रांतिक गटांचें एक संयुक्त राष्ट्र आहे असें मानलें जातें तोपर्यंत संयुक्त सरकारची भाषा म्हणून हिंदी भाषेची निवड झाली तरी हरकत नाही. मध्यंतरींच्या संक्रमणावस्थेच्या कालामध्ये हिंदी व इंग्रजी अशा दोन्ही भाषा मध्यवर्ती सरकारमध्ये वापरल्या जाव्यात. प्रत्येक हिंदी न जाणणाऱ्या पुरुष किंवा स्त्रीला मातृभाषेबरोबरच हिंदीचें ज्ञान अवश्य पाहिजे अशी सक्ति कधीहि होतां कामा नये. मातृभाषा व हिंदी भाषा यांचे अशा प्रकारचे संबंध लक्षात घेता दुय्यम शिक्षणक्रमामध्ये त्या सक्तीने शिकवल्या जाण्यास हरकत नाही. हिंदी भाषा, इंग्रजी व मातृभाषेबरोबरच दुय्यम शिक्षणक्रमामध्ये केव्हा शिकविण्यास सुरवात करावी, ती सुरवात तावडतोब व्हावी का नाही वगैरे प्रश्न आजकाल आपल्या शिक्षणक्रमामध्ये भासणारी इंग्रजीची अत्यंतिक जरुरी व मुलांची मनोरचना ह्या गोष्टी लक्षात घेऊनच सोडवावे लागतील. मानसशास्त्राचा विषय ह्या लेखाच्या विषयाच्या कक्षेबाहेर जात असल्याने त्याबद्दल येथे काहीच लिहीत नाहीं. काही झालें तरी वरिष्ठ वर्ग म्हणून समाजात शेकडा फक्त दहाच लोक असतात. त्यांनाच तेवढी राजकीय घडामोडी मुळांतून कळण्यासाठी दोन भाषांची माहिती असणें जरूर आहे.

दक्षिण आफ्रिकेसारख्या संयुक्त सरकारामध्ये प्रत्येक इसमाला दोन भाषाचें ज्ञान असणें अगदी अपरिहार्यच होऊन बसतें. आफ्रिकन भाषा बोलणारे बोअर लोक व इंग्रजी बोलणारे इंग्रज लोक हे काही हिंदुस्थानप्रमाणे निरनिराळ्या प्रांतांत स्वतंत्र गट करून राहिले नाहीत; तर प्रत्येक खेड्यात, प्रत्येक शहरात, प्रत्येक प्रांतात अगदी शेजारीं शेजारीं म्हणून ते वापरत असतात. परंतु स्वित्झर्लंडसारख्या संयुक्त संस्थानात प्रत्येक कॅंटनमध्ये एक विशेष भाषा बोलणारे लोक गट करून राहिलेले आहेत. त्यामुळे फ्रेंच व जर्मन ह्या दोन भाषा जरी त्याच्या राज्यकारभाराच्या भाषा असल्या तरी त्यांची जरुरी फक्त प्रत्येक कॅंटनमधील जे लोक मध्यवर्ती संयुक्त कायदेमंडळांत निवडून जातात किंवा ज्यांचा दुसऱ्या कॅंटनशी संबंध येतो अशा अगदी अल्पसंख्याकानाच त्या दोन्ही भाषांची जरुरी असते. हिंदुस्थानची सद्यस्थिति अगदी स्वित्झर्लंडसारखी आहे; दक्षिणी आफ्रिकेसारखी मुळीच नाही. हिंदुस्थानमध्ये निरनिराळ्या प्रांतामध्ये निरनिराळ्या भाषा बोलणारे लोक आपापले गट करून राहिलेले आहेत व त्याच गटातून भावी संयुक्त सरकार तयार करावयाचें आहे. भाषावार प्रांताची पुनर्रचना भावी हिंदी संयुक्त सरकारचे घटक म्हणून करावयाची ह्या गोष्टीस राष्ट्रीय सभा नैतिक बंधनाने बांधली गेलेली आहे. यावरून प्रत्येक हिंदी न जाणणाऱ्या इसमाला दोन भाषा—एक मातृभाषा व दुसरी हिंदी—यांचें ज्ञान असणें अनिवार्य आहे असे नाही. राष्ट्रीय सभा जर हिंदीप्रचारसभेच्या आहारीं जाईल व आहे ही प्रांताची पुनर्रचना न बदलता, त्यांतील भाषिक अडचणीच्या प्रश्नातून मार्ग काढण्यास शेकडा शंभर लोक हिंदी बोलूं लागले पाहिजेत असें म्हणूं लागेल; तसेंच मुंबई, मद्रास, नागपूरसारख्या प्रांतातील कायदेमंडळांतून हिंदी भाषाच प्रचारात आणण्याची सक्ती करूं लागेल; द्राविडी व हिंदीखेरिज इतर सर्व लिपी राष्ट्रभाषेच्या नावाखाली नाहीशा करूं लागेल तर राष्ट्रीय भाषा आंध्र, कलिंग वगैरे प्रांताच्या बाबतींत दिलेल्या वचनाविरुद्ध जात आहे असा आम्हास स्पष्ट

इषारा द्यावा लागेल. खरोखर हा हिंदीचा अतिप्रचार लक्षांत घेतला म्हणजे समजून उमजून राष्ट्रीय सभा भाषावार प्रांतरचना करून संयुक्त सरकार स्थापावयाची योजना झिटकारीत आहे असें आम्हांस म्हणावेंसें वाटते. हिंदीचा प्रश्न भाषावार प्रांतरचनेशीं अशा रीतीने अगदी निगडित झालेला आहे. प्रांताची भाषावार पुनर्रचना करण्याच्या बुडाशीं असलेलें तत्त्व ज्या काँग्रेसवाल्यास पूर्णपणें कळले आहे तो कधीहि द्राविडी लिपी नाहीशी करणें किंवा मुंबई, मद्रास वगैरे प्रांतातील कायदेमंडळातून हिंदी भाषा प्रचारात आणणें यासारखीं अदूरदृष्टीचीं विधानें करणार नाही. ह्या तऱ्हेचे विचार दिवसेंदिवस जास्तच मूळ धरीत आहेत. त्यामुळे सर्वसाधारण जनतेमध्ये हिंदीप्रचारसभेच्या कार्याबद्दल—मग तें कितीहि मूर्खपणाचे व अशक्य कोटींतलें असो—एक प्रकारचा संशय उत्पन्न झालेला आहे. त्या प्रचाराचा उद्देश मध्यवर्ती सरकारामध्ये व आंतरप्रांतीय दळणवळणामध्ये सोय व्हावी म्हणून हिंदी सर्वसाधारणपणें सर्वांकरिता एक माध्यम असावी एवढाच नसून, भविष्यकाळामध्ये सर्वास सारखी अशी एक लिपी असलेली एक भाषा हिंदुस्थानाकरिता बरेचसे संस्कृत शब्द घालून व पुष्कळसे पर्शियन घालून तयार करावी असा दिसतो. ह्या सर्व प्रकारामुळे हिंदीप्रचारकाच्या मूळ उद्देशाबद्दल जरी शंका घ्यावीशी वाटली नाही तरी पण त्याच्या अंतिम शहाणपणाबद्दल व राजनीतिकुशलतेबद्दल मात्र मनांत अंदेशा आल्याखेरीज राहात नाही !

व. व्यं. सुब्रह्मण्यम्

[त्रिवेणी, सप्टेंबर १९३७ मधील Hindi and Indian Nationalism ह्या लेखाचा अनुवाद. अनुवादकः— श्री. वसंत मार्तंड जाखडे, बी. ए. (ऑनर्स) ]

## साभार स्वीकार

१ **जवाहरलाल नेहरू** (आत्मचरित्र)—अनुवादक : नारायण गणेश गोरे; प्रकाशक : गोविंद वामन कुलकर्णी, २९१ शनिवार, पुणें; मूल्य ५ रुपये.

२ **नारायण गणेश चंदावरकर**—लेखक : द्वारकानाथ गोविंद वैद्य; प्रकाशक : मंगेश नारायण कुलकर्णी, मालक, कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई २.

३ **Twenty one Weeks in Europe (1930)**—Raja Raghunathrao Shankarrao Pandit Pant Sachiv of Bhor, Published at Bhor by R. K. Deshpande, Darbar Vakil, Poona.

४ **उपवन**—कर्ता व प्रकाशक : नारायण बापूराव पुराणिक, मोदीखाना, खत्री बोळ, बडोदें; मूल्य ४ आणे.

**व्यक्ति आणि वाङ्मय**— लेखक : श्री. के. क्षीरसागर; प्रकाशक : य. गो. जोशी; मूल्य १॥.

# व्युत्पत्तिविषयक



भाषा ही शब्दांची बनलेली असते. शब्दाला शरीर असतें व अर्थ असतो. अक्षरें हीं शब्दशरीराचे अवयव होत. अलिखित शब्द उच्चाराच्या स्वरूपात असून तो श्रवणाचा विषय असतो. उलट लिखित शब्द दृग्विषय होऊन बसतो. उच्चाराचा विचार व्हावयास लागला म्हणजे ध्वनिशास्त्र बनतें. ध्वनि हे उच्चाराचें अंग होय. प्राण्याच्या शरीरातील श्वासाने ध्वनि निर्माण होतो. उच्चाराची क्रिया स्वाभाविक आहे. मनुष्य हात पाय हालवतो त्याप्रमाणे उच्चारहि करतो. परंतु आपण अक्षर लिहितों त्याचा प्रकार निराळा आहे. लिखित अक्षर हा केवळ संकेत आहे. उच्चारित अक्षराची ती एक खूण किंवा चिन्ह असतें. "म" अक्षर आपण उच्चारलें म्हणजे तें दुसऱ्याला "म" ह्या उच्चारात ऐकूं येते. म्हणून जगांतील कोणत्याहि माणसाला उच्चार समजूं शकतात; पण "म" अक्षर कागदावर लिहिले तर तें लिहिताना आपण ज्या रेघा काढतों त्या रेघात आणि उच्चारात कोणत्याहि प्रकारचें सादृश्य नाही. कापडावरील व्यापाऱ्याच्या किमतीच्या आकड्याप्रमाणे ती स्वतःला समजण्याकरिता बनव-लेली खूण होय. तिचा बोध ज्याचा त्यालाच होणार; इतराना ती अगम्य राहील. म्हणून जगात अनेक लिप्या होऊन एकाची लिपी दुसऱ्यास उमगेनाशी झाली.

ज्याप्रमाणे लिपी ही उच्चाराला संकेतादाखल आहे त्याचप्रमाणे उच्चाराला अथवा शब्दाला अर्थहि संकेतादाखल जडलेला आहे. लिपीचा संबंध फक्त अक्षराशीच असतो. शब्द हा एक किंवा अनेक अक्षराचा बनतो. ह्या अक्षरात हळू हळू पण सारखा बदल होत असतो. हा बदल दोन प्रकाराचा असतो. शब्दाच्या अक्षराची संख्या कमी जास्त होते अथवा अक्षरेच बदलतात म्हणजे एका अक्षराच्या ठिकाणीं दुसरे अक्षर येते. हा बदल नियमाना अनुसरून होत असतो. हे नियम शोधणें म्हणजे शब्दाचें रूप सिद्ध करणे होय. आज आपण जो शब्द वापरतो तो पूर्वी कोणत्या स्वरूपात होता, त्याच्या अगोदर कोणत्या स्वरूपात होता असा शोध लावीत लावीत आता पलीकडे जाता येत नाही तेथपर्यंत शोधाची मजल पोचवा-वयाची; शब्दाच्या अगदी मुळापर्यंत जावयाचें. अर्थात् ही ऐतिहासिक बाब आहे. आपण शब्दाचें जे रूप झाले पाहिजे म्हणून म्हणतों तें भाषेत एका विशिष्ट काली प्रचारात असा-वयाला पाहिजे. परंतु हें सिद्ध करून दाखविण्यास पुरावा पाहिजे तो पुष्कळदा उपलब्ध नसतो. भाषेत ग्रंथरचना झाली नसली किंवा होऊनहि ते ग्रंथ नष्ट झाले असले तर प्रत्यक्ष प्रमाण पुढे आणता येत नाही. व्युत्पादकाच्या मार्गात ही मोठी अडचण असते. कांही विद्य-मान भाषा संस्कृतापासून निघाल्यामुळे मूळ संस्कृत शब्द घेऊन तो पुढे कसकसा बदलत गेला हे पाहत पाहत आजकालच्या शब्दाशीं येऊन भिडणें हाहि एक व्युत्पादनाचा मार्ग आहे. ह्यास अनुलोम पद्धति म्हणतात. विद्यमानाकडून भूताकडे जाणे ह्यास प्रतिलोम पद्धति हें नाव आहे. अनुलोम तीच प्रतिलोम आणि प्रतिलोम तीच अनुलोम वाट ठरली की शब्दाचें व्युत्पादन निर्दोष झाले असा विश्वास उत्पन्न होतो.

शब्द हें उच्चाराचें प्रतीक आहे. शब्दाचा उच्चार निरनिराळे लोक निरनिराळ्या तऱ्हेने

करतात. ज्या गटांतील लोकांचे शब्दोच्चार सदृश असतात त्यांची निराळी भाषा बनते. अशा रीतीने एकाच भाषेपासून अनेक भाषा अस्तित्वात येतात. त्यामुळे एका भाषेचा विचार करतांना सहोदर भाषांचाहि विचार करणें प्राप्त होतें. भाषेची घटनाविघटना सारखी चालू असली तरी प्रत्येक अवस्था काही काल टिकून राहते. ह्या कालात ग्रंथरचना झाली की त्या भाषेला नाव प्राप्त होतें. त्यामुळे संस्कृतापासून महाराष्ट्री, महाराष्ट्रीपासून अपभ्रंश आणि अपभ्रंशापासून मराठी निघाली असे आपण म्हणूं लागतो. वस्तुतः आजच्या मराठीचेहि रूपांतर दुसऱ्या भाषेंत होईल. म्हणून प्रचलित भाषेत कोणते फरक होत आहेत ह्याची नोंद भाषाशास्त्रज्ञानी करून ठेवणें जरूर आहे. ज्ञानेश्वरी तर समजत नाहीच पण शिवाजीकालीन मराठीसुद्धा आज समजत नाहीसें झालें आहे. संस्कृतोद्भव सर्व भाषांचा विचार साकल्याने अजून मराठींत कोणीं केला नाही. युरोपिअन विद्वानाचे प्रयत्न मात्र वर्णनीय आहेत.

मराठी भाषा संस्कृत भाषेला जाऊन आपण भिडवतो परंतु संस्कृत भाषेच्या मागे आणखी वैदिक भाषा आहेच. जगातील अशा प्राचीनतम भाषा घेऊन त्यांचे मूळ शोधण्याचा प्रयत्न आपल्याकडे स्वतंत्रपणे अद्यापि कोणी केला नाही.

शब्द बदलतात त्याप्रमाणेच त्यांचे अर्थहि बदलतात. परंतु लक्षणेच्या योगानेच हा अर्थपालट होत असतो. अशा रीतीने अर्थभिन्नता पण शब्दैक्य जेथे असते तेथे व्युत्पत्ति निराळी असण्याचा संभव नसतो. परंतु भाषेत असे पुष्कळ शब्द असतात की त्यांचे बाह्य स्वरूप अगदी अभिन्न पण अर्थ मात्र निराळे असे असूनहि त्यांचीं मुळें निरनिराळीं असतात. एवढ्यासाठी निरनिराळ्या अर्थांच्या एकाच शब्दासंबंधाने एक नियम करून चालणार नाही. तथापि नसेल तेथे लक्षणा मानून एकाच व्युत्पत्तीचा आग्रह धरणे हे अशास्त्रीय वृत्तीचें द्योतक आहे ह्यात शंका नाही.

व्युत्पत्तिकाराला भाषेमध्ये परकी शब्द कोणते ह्याची पूर्ण जाणीव असावी लागते. नाही तर व्युत्पत्ति करण्याचा मोह पडून विनाकारण वेळ दवडून अखेरीस श्रम निष्फळ होतात. 'वरात' हा शब्द दिसण्यात एकच पण एक संस्कृतापासून निघालेला मराठी आहे आणि दुसरा फारशी आहे. दोघांचे अर्थ भिन्न आहेत. ह्या दृष्टीने परकी शब्दांचा कोश स्वतंत्र होणे जरूर आहे. आपल्या मराठींतच द्राविड शब्दांचा भरणा फार आहे. भाषेवर द्राविडी संस्कारहि झालेला उघड दिसतो. कारण कानडी लोकांचा संबंध ह्या बाजूला फार होता. आसामाकडील भाषात ब्रम्ही व तिबेटी शब्द घुसलेले आढळतील. वायव्येकडील भाषावर आर्य भाषेशिवाय इराणी भाषेने आपला ठसा उमटविला असल्याचें दिसून येईल. ह्याखेरीज साम्प्रत ज्याप्रमाणे इंग्रजी शब्द मराठींत घुसत आहेत त्याप्रमाणे फारशी शब्दांची रेलचेल पूर्वीच झालेली आहे. भाषेत परकी शब्द येतात ते बहुधा नामशब्द असतात. प्रत्यय, उपसर्ग फार करून येत नाहीत. क्रियापदेंहि क्वचितच येतात. नामाप्रमाणे अव्यये व क्रियाविशेषणे ह्यांचाहि भरणा परभाषेंतून होत असतो. फारशी भाषेतील असे अनेक शब्द मराठींत आले आहेत. काही परकी शब्द मराठीशीं इतके समरस झाले आहेत की त्यांचा परकीपणा स्वजनाना सुद्धा भासेनासा झाला आहे. अशा शब्दाच्या व्युत्पत्तीविषयी विद्वानात मतभेद माजून राहतो. उ. हुडकणे हें क्रियापद द्राविडी भाषेतून आले आहे असें कित्येक म्हणतात, तर कित्येकानी त्याचा संस्कृत उगम दाखवून दिला आहे. संस्कृतातून निघालेला शब्द अनेक टप्प्यातून मराठींत आलेला असतो. पाली, प्राकृत आणि अपभ्रंश हे ते टप्पे होत. म्हणून मराठी कोणताहि शब्द ह्या तीनहि भाषांत कोणत्या रूपात होता हेंहि पाहणें अवश्य आहे.

खऱ्या मराठी शब्दाचें मूळ संस्कृत शब्दांतच आढळणार हें खरें परंतु तो शब्द धातून असला पाहिजे असा मात्र नियम नाही. नामावरून किंवा क्रियापदांच्या कोणत्या तरी रूपावरून मराठी धातु बनले आहेत. उ. कुंचणें हें क्रियापद संस्कृत कूर्च ह्या नामापासून बनलें आहे. डरावणें हें द्रावयति ह्या रूपावरून व डाचणे हें दह्यते ह्या रूपावरून बनलें आहे. ह्याच नियमाला धरून नृत्यति-पासून नाचणें हे क्रियापद व्युत्पादिता येईल कीं नाही हें पाहण्यासारखें आहे. भूतभूत कालवाचक शब्दांवरूनहि कांही क्रियापदें व्युत्पादिता येतील. उ. सं. मुक्त-प्राकृत मुक्क–मराठी मुक=मुकणें. नृत्यापासून नाच शब्द बनून नाम व धातु एकाच रूपापासून व्युत्पादिता येतात. ध्वनीवरून शब्द बनल्याचीं उदाहरणेंहि विपुल आहेत. उ. छुमक शब्द घेऊं. छुमकणें हा क्रियाशब्द झाला. छुमछुम ह्या आवाजावरून (पायांतल्या घागऱ्यामुळे) छुमछुम हा शब्द व त्यावरून छुमकणें हा धातु बनला असणें संभवनीय आहे. त्यासाठी झुन्=जाणें ह्या संस्कृत धातूकडे धाव मारली पाहिजे असें नाही. झुन् हा जर ध्वनिज धातू असेल तर त्याचा गत्यर्थ न होतां ध्वन्यर्थ झाला असता.

प्रत्येक शब्दाचे मूळ धातूंत असलें पाहिजे हा कित्येक संस्कृत व्युत्पत्तिशास्त्रज्ञाचा निश्चित सिद्धांत आहे. भाषेला प्रारंभ वस्तुवाचक शब्दानी झाला किंवा क्रियावाचक शब्दानी झाला हा विवादात्मक प्रश्न आहे. ह्याविषयीं आग्रह मात्र अस्थानीं दिसतो. क्रियेला जितकें महत्त्व तितकेंच वस्तूला म्हणजे नामाला आहे. आद्यकालीन माणसाच्या दृष्टीस तयार झालेली वस्तु पडली नव्हती असें म्हणतां येणार नाही. मग वस्तूचा निर्देश त्याने कसा करावा ! नामांत धातु पाहणे अथवा धातूवरून नाम बनविणें हें पांडित्याचें लक्षण आहे. वृक्ष ह्या नामांत व्रश्च् हा धातु आहे असें म्हणतात. व्रश्च म्हणजे कापणे, तोडणें. ही व्युत्पत्ति बरोबर आहे असें आपण धरून चालूं. परंतु तसें असल्यास वृक्ष हा शब्द सुसंस्कृत माणसाने बनवला असला पाहिजे ह्यात संशय नाही. असे शब्द भाषेंतून निराळे काढले पाहिजेत. ज्याची व्युत्पत्ति करता येत नाही तो मूळचा शब्द. प्रथमावस्थेंतील माणसाची भाषा अशा शब्दांनी झालेली असली पाहिजे. असे शब्द निराळे काढून त्याचा स्वतंत्र कोश बनविल्यास बोधप्रद होइल. तोडतात म्हणून वृक्ष म्हणावयाचें परंतु व्रश्च् ह्याला तोडणें का म्हणावयाचें तें कोण सांगेल ! जी गोष्ट धातूची तीच नामाची. मनुष्याला ज्या क्रिया स्वतः नेहमी कराव्या लागतात त्या क्रियावाचक शब्दावरून त्याने नाम लवकर बनवले असावे. उ. अद्=खाणें ह्यावरून अन्न शब्द लवकर बनणें शक्य आहे. परतु पर्वत याची व्युत्पत्ति पर्वाणि सन्ति अस्य सः ही बरोबर असेल तर हा शब्द भाषेच्या आद्यावस्थेंतील नाही असें म्हणणें भाग आहे. व्युत्पन्न शब्द सुसंस्कृत समाजांत निर्माण होतात. अर्थात् ते पाठीमागचे होत. अव्युत्पन्न शब्द प्रथमचे असले पाहिजेत. असे शब्द धातु असतील व नामेंहि असू शकतील. मनुष्य जन्मास येण्यापूर्वी या सृष्टींत अनेक पदार्थ अगोदर निर्माण झालेले असले पाहिजेत पाणी, डोंगर, माती वगैरे पदार्थांची उत्पत्ति झाल्यावरच मनुष्य निर्माण झाला असें व्यवहाराकरता गृहीत धरलें पाहिजे. अशा या वस्तूंच्या नांवामध्ये धातु शोधणें योग्य होणार नाही. सर्व धातूंची सृष्टि पुरी होईपर्यंत या वस्तु अनामक राहिल्या हें संभवनीय दिसत नाही. तात्पर्य धातु व कांही नामें अव्युत्पन्नच राहणार.

ना. गो. चापेकर

# कला आणि अश्लीलता



नग्नतेमध्ये अश्लीलता असतेच असे कुठे आहे ! फुलें नग्न असतात, पशुपक्षी नग्न असतात; लहान अर्भकें पण नग्नदशेंत निर्व्याजमनोहर हास्य उधळीत बागडतात. या सगळ्यांत अश्लीलतेचा गंधहि नसतो.

निसर्गाचा एकहि असा स्वाभाविक व्यापार नाही की जो वस्तुतः अश्लील आहे. कित्येक बाबी शिष्ट समाजापुढे मांडावयास आपण संकोच करूं पण त्याच वैद्यकावरील ग्रन्थात अथवा कायद्यावरील पुस्तकांत स्पष्टपणें नमूद केलेल्या आढळून येतात. योग्य स्थानीं त्याचा निर्देश असल्याने त्याना अश्लील लेखता येणार नाही. तसेंच, सरकारच्या विरुद्ध चिथावणी देणाऱ्या लेखावर राजद्रोहाचा आरोप शाबीत होऊन त्याबद्दल लेखक-प्रकाशकाना सजा मिळते; परंतु तोच मजकूर न्यायकोर्टाच्या रिपार्टांत गोंवलेला असल्यास त्यात गुन्हा होत नाही. यासारखाच काहीसा प्रकार येथे पण आहे. धर्मग्रंथामधून किंवा महाभारतादि धार्मिक काव्यांमधून काही काही वेळा असे प्रसंग वर्णिलेले आढळून येतात की ज्याची आपण सामान्यपणें अश्लील कोटींतच गणना करूं. पण पवित्र, उदात्त आणि भव्य प्रसंगीं अथवा स्थानीं अश्लील वस्तूंतील अश्लीलता गळून पडते. डॉक्टराच्या पुढे चिकित्सेच्या मेजावर मनुष्य—पुरुष असो कीं स्त्री असो—अगदी विवस्त्रावस्थेंत पडून राहतो. परंतु तेंच सामान्य व्यवहारामध्ये तसें करावयास कोणी धजणार नाही.

अश्लीलता ही हेतु, परिस्थिति आणि परिणाम याचेवर अवलंबून असते.

त्याचबरोबर हेंहि खरें की कित्येक वस्तु मुळातच इतक्या काही अनैसर्गिक आणि बीभत्स असतात की त्याना पाहून किंवा त्याची आठवण होऊन जुगुप्सा झाल्यावांचून राहात नाही.

कित्येक कलाकृति अशा असतात की त्यांच्यात अश्लील असें काही दाखवता यावयाचें नाही; तथापि त्याच्या दर्शनाने अथवा श्रवणाने चांगले भाव उत्पन्न होत नाहीत अशी स्थिति असते. त्याचप्रमाणे ज्याचेमुळे हृदय ललित, दयित अथवा उन्नत होत नाही अशा कलाकृतीहि विश्री आणि हीन लेखण्यात आल्या पाहिजेत. ज्या कृतींच्या दर्शन-श्रवणाने चित्तवृत्तीला वाति होऊं लागते त्या कृति निःसंशय अश्लील समजल्या गेल्या पाहिजेत. उच्च कलाकृतींचे द्वारा आपलें हृदय उत्कट होतेंच होते. कधी कधी अस्वस्थ होऊन जातें. हाच त्याचा खराखुरा प्रभाव होय. मात्र कोणतीहि कृति संस्कारी भद्रपुरुषाचें, अरुचि उपजवूं लागली, कलावृत्तीला शिसारी आणूं लागली कीं समजावें की ती कृति अश्लील आहे.

भोजनरस आणि कामविकार याची लोकयात्रेकरिता कितीहि गरज का असेना, तत्रापि त्यात तटस्थ आनंद असत नाही. अलिप्तपणे, अनासक्तपणे जो आनंद अनुभवणे शक्य असते तोच कलेचा विषय होऊं शकतो. जेथे हें तंत्र संभाळले जात नाही तेथे विलासिता अथवा अश्लीलता ह्यापैकी एकीचें वास्तव्य हे असावयाचेंच. विलासतेत उन्मादक आकर्षण असून

परिणामीं त्यांत रक्तशोषण असतें. आणि अश्लीलतेमध्ये हीनता आणि विकृति यांचा बुजबुजाट असतो. कलेचा परिपोष दोन्हींतहि असंभाव्य असल्याने कलेच्या क्षेत्रामधून यांची हकालपट्टी करणेंच इष्ट.

अश्लीलता कशात आहे आणि कशात नाही हें आपापल्यापुरतें माहीत असणें अशक्य नाही, पण दुसऱ्यास तें पटवून देणें मात्र कठिण असते. या परिस्थितीचा गैरफायदा घेऊन कित्येक लोक समाजास अधोगतीस पोचवून लोकप्रिय होण्याचा व पैसा उकळण्याचा प्रयत्न करीत असतात, आणि विलासितेवर लुब्ध असलेला समाज हळू हळू आपला आदर्श खालावूं देण्यात आनंद मानूं लागतो. एवढ्यासाठीं अमुक एक वस्तु किंवा कलाकृति अश्लील आहे कीं नाही अशी चर्चा करीत न बसता अमुक एक वस्तु विकारांस पोषक आहे कीं नाही हेंच पाहावयास हवें. जी कृति सामाजिक सदाचारास भ्रष्ट करते आणि विकारांना बेफाम करते ती समाजाने निषिद्ध करावी हेंच इष्ट. मग ती अश्लीलतेच्या सदरांत दाखल करता येण्याजोगी असो, नसो.

काका कालेलकर

## स्त्रियांच्या म्हणी

[जानेवारी १९३७ च्या अंकावरून पुढे चालू]

(३८१) हरवली चिंधी, सगळा गाव धुंडी.
(३८२) लोकाचें लेणें ले ग लुचरे, मागायला आली दे ग कुत्रे.
(३८३) सुखासुखी लाथाबुक्की.
(३८४) खोट्याचें मढें तीन रोज पडे, त्याला कोण रडे !
(३८५) बुवाचे तुरे लाल, बाईचे पुरे हाल.
(३८६) चालतील बाह्या (हात) तर विचारतील आयाबाया.
(३८७) हत्ती वाळला म्हणून त्यास गोठ्यात बांधूं नये.
(३८८) गिरा भोरा बामणाच्या पोरा, तिनदा जेव कुणब्याच्या पोरा.

(अर्थ—गिरा—ग्रहण. ब्राह्मणाने उपास तापास करावे; कष्ट कारणाराने तीनदा जेवावें, उपासाच्या नादीं लागूं नये.)

(३८९) पुरुषाचें नशीब पातेऱ्यात.

(पुरुषाने पाचोळा इकडे तिकडे केला तरी त्यास माणिक मोत्यें सापडतात. 'पुरुषस्य भाग्यं देवो न जानाति' इत्यर्थः)

(३९०) सोने झालें तरी त्याला कुडाचें उटिंगण (आधार) पाहिजे.
(३९१) तादुळहि जिवसा, अन् पाहुणाहि जिवसा.

(अर्थ—तादुळहि खर्च होता कामा नये—जिवंत राहावा. आणि पाहुणाहि जेवून तृप्त व्हावा हें दोन्ही कसें साधेल ! —कोकणी म्हण.)

(३९२) करंगळीची कळ आंगठ्याला येत नाही.

(अर्थ—गरिबाचीं दुःखें श्रीमंताना कळत नाहीत.)

—नीळकंठ शंकर नवरे, पुणें

# भूमिजनांचें रंजन व शिक्षण



लोकरंजनाचें, लोकशिक्षणाचें व प्रचाराचें नवीन साधन या दृष्टीने नभोवाणीस (रेडियोस) जगातील बहुतेक सुधारलेल्या राष्ट्रांत महत्त्वाचें स्थान मिळालें आहे. हिंदुस्थानातील परिस्थिति भिन्न असल्यामुळे इतर देशातील तत्त्वांना थोडीफार मुरड घालूनच त्याचा अंगीकार करावा लागतो. वृत्तव्यवसायाची वाढ होण्यास कागदाची विपुलता, शीघ्र बातमी मिळणें, छपाईची सुधारणा व स्वस्ताई, जाहिरातीचा पैसा व टपालयोजना या साधनाबरोबर जनतेच्या साक्षरतेचें प्रमाण विचारांत घ्यावें लागते, त्याचप्रमाणे नभोवाणीची गोष्ट आहे. नभोवाणीचीं अनेक केंद्रें, कार्यक्रमाची विविधता, श्रोत्यांच्या फुरसतीचा वेळ आवड व जरुरीचे विषय, रेडियो यंत्राची स्वस्ताई इत्यादि अनेक अंगोपांगाचा विचार करणें प्राप्त होतें.

बहुतेक राष्ट्रांत रेडियोचें खातें सरकाराधीन असतें. अमेरिकेंत अनेक कंपन्यांचें स्वतंत्र पण सुनियंत्रित जाळें पसरलें आहे तर खुद्द इंग्लंडमध्ये बी. बी. सी. (British Broadcasting Corporation) ही सरकाराश्रित संस्था आहे. हिंदुस्थानांत ए. आय्. आर. (All India Radio) हें सरकारी खाते असून त्याचे स्वतंत्र अधिकारी नेमलेले आहेत व हें खातें टपालखात्याशीं थोडेंसें जोडलेलें आहे. प्रस्तुत लेखांत A. I. R. च्या चालू कार्यक्रमाविषयी कांही लिहावयाचें नसून, आहे ही स्थिति कायम ठेवून भूमिजनांना विशेष फायदा करून घेण्याइतकें नभोवाणी हे साधन अधिक कार्यक्षम होण्यासाठी भाषेच्या तत्त्वावर कार्यक्रम करणें कितपत शक्य आहे व ती शक्यता व्यवहार्य होण्यास काय करावें लागेल या प्रश्नाचें मूलभूत दिग्दर्शन केलें आहे.

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या कार्यक्षेत्रापुरतें पाहिलें तर मराठी बोलणाऱ्या मराठ्यांच्या शिक्षणरंजनाच्या कामीं नभोवाणीचा कसा उपयोग होईल या मुद्यावर जास्त विवेचन केलें पाहिजे. पण मराठी, गुजराथी, कानडी व मिश्र उर्दू भाषा बोलणाऱ्या लोकांचें कमी अधिक प्रमाण महाराष्ट्रांत व मुंबई इलाख्यात असल्यामुळे केवळ मराठ्याचा हा प्रश्न होऊं शकत नाही. ए. आय. आर. हे खातें अखिल हिंदुस्थानचें असल्यामुळे नभोवाणीचीं केंद्रें प्रांतवार न करतां केंद्रांची प्रसारशक्ति व लोकसंख्येची घनता इत्यादि अनेक गोष्टी विचारात घेऊन केलेली आहे. रेडियोचा हिंदुस्थानभर प्रसार करण्याचे व खेड्यापर्यंत ज्ञानाचें लोण पसरविण्याचें ध्येय ठेवूनच हें खातें स्वतंत्र करून, वाढवून येत्या एक दोन वर्षात अनेक केंद्रें तयार होणार आहेत व त्या योजनेंत पेशावर, लाहोर, दिल्ली, लखनौ, डाका व कलकत्ता येथे उत्तर हिंदुस्थानात आणि त्रिचनापल्ली, मद्रास व मुंबई येथे दक्षिण हिंदुस्थानात केंद्रें होणार असें जाहीर झालें आहे. इंग्रजी भाषेचा मुद्दा विचारात घेतला नाही तर उत्तर हिंदुस्थानात पुष्कळ केंद्रें असल्यामुळे भाषेची भिन्नता इतकी तीव्र भासणार नाही. त्यापैकी प्रत्येक केंद्राने द्विभाषिक कार्यक्रम ठेवल्याने हा प्रश्न तेथे सुटणारा आहे. बंगाली-हिंदी, हिंदी-उर्दू, उर्दू-पंजाबी, पंजाबी-गुरुमुखी, पुश्तू-सिंधी किंवा उर्दू या जोडीने तेथे काम भागेल. त्याचप्रमाणे मद्रास व त्रिचनापल्ली येथील केंद्रात तामीळ-तेलगू या भाषा सहकार्याने लोकरंजन करूं शकतील.

पण मुख्य अडचण एकटे मुंबई केंद्र बृहन्महाराष्ट्रातील मराठी, गर्वी गुजराथमधील गुजराथी व कन्नडप्रांतीय लोकांची गरज पुरविण्यास अपुरे पडेल अशी भीति वाटते.

नभोवाणीच्या केंद्रातून बाहेर पडणाऱ्या लाटा, जमिनीसरपट किंवा वातावरणांतील उंच छतासारख्या थरावरून परिवर्तन होत प्रवास करतात. दूर अंतरावर भोवतालच्या विद्युत्-कल्लकलाटात ती क्षीण वाणी ऐकणे कठीण होते. संध्याकाळीं किंवा रात्रींइतके दिवसा दूरवर ऐकूं येत नाही. लघु लाट दीर्घ लाटेपेक्षा दूरवर जोमाने जाऊं शकते. केंद्राच्या आसपास ५०।१०० मैलाच्या टापूत थोड्या किमतीच्या रेडिओमधून ऐकणें शक्य असतें. एवढ्या ठळक दोन तीन गोष्टी लक्ष्यात ठेवल्या तर गरीब भूमिजनासाठी आकाशवाणी ऐकविणें केंद्राच्या आसपासच शक्य आहे हें उघड होते.

अशा स्थितींत धारवाड, कारवार, विजापूर, सोलापूर, निजामशाहींतील मराठवाडा, नागपूर, भंडारा, इंदूर, ग्वाल्हेर व बडोदें येथवर पसरलेल्या बृहन्महाराष्ट्रातील मराठी भाषा बोलण्याऱ्या लोकांची अल्पखर्चाची सोय करणें मुंबई केंद्राला शक्य नाही. हल्लीच्या स्थितींत ही योजना ए. आय. आर. पुढे नसल्यास त्याना दोषहि देता येणार नाही. आकाशवाणीच्या लाटा दूरवर कोठे जाऊं शकतील याचे प्रयोग करून हा केंद्र ठरविण्यात आलीं असल्यामुळे त्या प्रांतातील लोकभाषेचा मुद्दा प्रधान मानण्यात आला नाही.

खुद्द मुंबई शहरात मराठी व गुजराथी भाषा सारख्याच प्रचारात असल्यामुळे हिंदींतून बातम्या व कार्यक्रमाची प्रस्तावना देण्याची प्रथा कायम करून पळवाट काढण्यांत आली आहे. तेथे हिंदी, गुजराथी, मराठी व कानडी या सर्व भाषातील गायन गायले जाते. कीर्तन, झरतुष्टगाथा, हिंदी प्रवचन ही धर्मवाचनें होतात व तिन्ही भाषातील नाटिका व व्याख्यानें होतात. तरी पण भूमिजनाचा कार्यक्रम मराठी बोलणाऱ्या तेरा खेड्यांतूनच का होतो अशी विचारणा काही पत्रांतून झालीच. धारवाड, बेळगाव व विजापूर या प्रांतातील कानडी भूमिजनाची सोय करण्याबद्दल थोड्याच दिवसात मागणी येईल यात शंका नाहीच. तसेच सर्वत्र विखुरलेले उर्दू भाषाभिमानी अल्पसंख्याक लोकहि स्वतःचे मागणें पुढे करतील. मुंबई इलाख्यातील भाषा बोलणाऱ्या लोकांचा प्रश्न असा इतर दोन तीन भाषांशी निगडीत असल्यामुळे, व बृहन्महाराष्ट्रातील मराठ्यांचा प्रश्न संस्थानांशीं गुंतल्यामुळे भाषावार नभोवाणी केंद्राची स्थापना करण्याचा हा प्रश्न सकृद्दर्शनी वाटतो तितका सोपा नाही.

कोणत्याहि प्रांतातील लोकांचे शहरातील व खेड्यातील असे दोन ठळक विभाग पडतात व दोघांच्या गरजा, आवडी निवडी व फुरसतीचा वेळ ही भिन्न असल्यामुळे त्यांच्यासाठी कार्यक्रमहि भिन्न प्रकारचे व भिन्न वेळी केले जातात. रेडियोविक्रेत्यांच्या सोयीसाठी, घरातील बायकांच्या करमणुकीसाठी व इंग्रजी जाणणाऱ्यासाठी, फराळाच्या वेळीं दुपारचा कार्यक्रम असतो. सकाळी कामावर जाण्यापूर्वी थोडे गायन, थोडे प्रवचन, थोडे बौद्धिक ज्ञान पुरविले जाते व सायंकाळपासून रात्रीं १०।११ वाजेपर्यंत बातम्या, व्याख्यानें, गायन-वादन, खेळाच्या सामन्याचे प्रत्यक्ष वर्णन असा कार्यक्रम आखण्यात येतो तो योग्यच आहे. शाळाशाळातून रेडिओ झाले म्हणजे दुपारी रेडियोतून धडे देण्याची सोय होईल. तिसऱ्या प्रहरीं स्त्रियांसाठी खास कार्यक्रम ठेवता येईल. गिरण्यातून रेडियोची सोय झाली तर दुपारच्या सुट्टीत करमणुकीची सोय होईल. गिरणी कामगारांचे (ताडी दुकानाऐवजीं) क्लब झाले तर रेडियोंतून गायनव्याख्यानाचे कार्यक्रम ठेवता येतील व करमणुकीबरोबर त्याच्या धंद्याची काही माहिती

देतां येईल. किंमतवान रेडियो वापरल्यास मुंबई स्टेशनावरून मोठमोठ्या शहरीं तरी गैरसोय होणार नाही.

पण केवळ शहरवासीयाच्या सोयीकडे सर्व शक्ति खर्च न करता भूमिजनाच्या उन्नतीस महत्त्वाचा वाणीभार लावणें हे ध्येय असल्यामुळे भूमिजनाना असणारा विश्रांतीचा वेळ रेडियो-मुळे मनोरंजक व उपयुक्त रीतीने घालविणें शक्य होण्यासाठी निराळचि योजना करावी लागेल.

१ मराठी, गुजराथी व कानडी या तिन्ही भाषाच्या भूमिजनासाठी एकसमयी कार्यक्रम करावयाचे असल्यास मुंबई केंद्रास निदान तीन लहरींचा अवलंब करावा लागेल.

२ तसा करूनहि प्रत्येक मोठ्या शहरात जिल्ह्याच्या तालुक्याच्या ठिकाणी (जेथे विजेचा पुरवठा आहे तेथे) पुनर्प्रसारण केंद्र (Relay & Transmisson) उघडून त्या त्या जिल्ह्यातील खेड्यात स्वस्त रेडियोंतून ऐकविण्याची सोय करता येईल. उदाहरणार्थ पुणे, सातारा, कऱ्हाड, नगर, नाशिक, भुसावळ, जळगाव, धुळे, सोलापूर, विजापूर, बेळगाव, धारवाड, हुबळी, गदग, बागलकोट इ.

अशा तऱ्हेची पुनर्प्रसारणाची किंवा अशीच दुसरी काही तरी योजना केल्याशिवाय दूरच्या भूमिजनाची सोय करणे शक्य नाही.

जिल्हाशहर किंवा तालुकागाव यात पुनर्प्रसारणाची व्यवस्था करण्याचे काम तार-खात्याकडे सोपवून ए. आय. आर. ला देखरेखीचें काम करता येईल. पोस्टमास्तर किंवा शाळामास्तर याच्या ताब्यात खेड्यातील रेडियो देतां येतील व हे तील कलकलाटाचा फार त्रास न होता थोड्या खर्चात दूरच्या भूमिजनाना रेडियोचा पूर्ण फायदा मिळेल.

शेती सुधारणेस शास्त्राची मदत किती व कशी घेता येईल यासंबंधी सरकारने चौकशी करण्यास नुकतेच नेमलेले सर जॉन रसेल म्हणतात की शास्त्रीय ज्ञान खेडूताच्या दारापर्यंत पोहचवा. प्रात्यक्षिकाबरोबर रेडियोंतून हे ज्ञान त्याच्या कानापर्यंत जाईल. निरनिराळ्या जिल्ह्यांतील लोकाची राहणी व त्याच्या गरजा भिन्न असतात म्हणून ज्ञानाचाच विचार केला तर कापूस, ज्वारी, तांदूळ, वगैरे पिकविणाऱ्या जिल्ह्याला त्याना उपयुक्त अशीच माहिती दिली पाहिजे. भूमिजनासाठी तयार करावयाचे कार्यक्रम ठरविण्यासाठी संवाद, नाटिका, व्याख्यान, मौजेची माहिती वगैरे लिहून ते वेळोवेळी निरनिराळ्या जिल्ह्यात प्रसृत केले पाहिजेत. या कामी शिक्षण, जंगल, शेतकी, वैद्यक, आरोग्य या खात्यातील तज्ज्ञाचा उपयोग सढळ प्रमाणात करण्यात आला तर ही योजना लवकर सफल होईल.

हल्ली या तऱ्हेने ए. आय. आर. चे प्रयत्न चालू आहेत. पण तीन्ही भाषाच्या सोयीसाठी एकट्या मुंबई केंद्राने तीन लहरी सोडणे ही योजना अव्यवहार्य ठरण्याचा संभव आहे. अशा स्थितीत पुनर्प्रसरणाचें जाळे पसरण्याची योजना पसंत आहे असे क्षणभर मानले तर ही योजना व्यवहार्य करण्यास संस्थानाचे सहकार्य व तेथे तेथे द्विभाषिक कार्यक्रम याची जरुरी आहे. सध्या म्हैसूर व हैद्राबाद या संस्थानात नभोवाणीकेंद्र आहेत. तेथे अनुक्रमें कानडी व उर्दू कार्यक्रम मुख्यत्वे चालतात. नुकत्याच झालेल्या निजामप्रांतीय मराठा संमेलनाच्या १४ व्या ठरावाची अम्मलबजावणी होऊन उर्दू व मराठी असे दोन्ही कार्यक्रम सुरू झाल्यास निजाम राज्यातील मराठवाड्याची सोय होईल. म्हैसूरचा कानडी कार्यक्रम, मद्रास-त्रिचनापल्लीचा तेलगू व तामीळ कार्यक्रम, व कोलंबोचा सिंहली व हिंदी कार्यक्रम कानडी प्रांताची सध्या तरी बरीचशी भूक शमवील.

दक्षिण महाराष्ट्रांतील औंध, फलटण, भोर, सांगली, मिरज, कुरुंदवाड, इचल-करंजी, कोल्हापूर, अक्कलकोट, जत, जमखिंडी, मुधोळ, रामदुर्ग, सावनूर वगैरे संस्थानांनी एक मत करून कोल्हापूरास मुख्य नभोवाणीकेंद्र स्थापून आपापल्या संस्थानांत पुनर्प्रसरण यंत्रें ठेविलीं व शहरांत वीज नसल्यास राजवाड्यांतील विजेवर चालविलीं तर कानडी व मराठी द्विभाषिक भूमिजनाची सोय होईल.

मुंबई स्टेशनाने मराठी-गुजराथी असा द्विभाषिक पेहराव ठेवला तर सुरतेपर्यंत गुजराथी भूमिजनांची सोय होईल. त्यापेक्षा बडोदे संस्थानाने पुढाकार घेऊन काठेवाड संस्थानें व बडोदें याचे एकमत करून गुजराथी, मराठी ८०:२० असे द्विभाषिक केंद्र केलें तर सर्व गुजराथी भाषिकाची सोय होऊन मराठी भूमिजनांवरहि उपकार होतील. नागपूर येथे हिंदी मराठी ५०:५०, इंदूर ग्वाल्हेर येथे हिंदी मराठी ७०:३० अशीं केंद्रें उघडल्यास व असें संस्थानांचें सहकार्य लाभल्यास ए. आय. आर.ने चालविलेल्या भूमिजनाच्या उपयुक्त कार्यास खरी मदत होईल.

द्विभाषिक केंद्रें, पुनर्प्रसरण, संस्थानांचें सहकार्य या तिन्ही गोष्टी एकत्रित झाल्या-शिवाय रेडियोची भाषावार योजना पूर्णपणें यशस्वी होणार नाही. या कामीं प्रांताच्या अनेक खात्यांचें सहकार्य लागेल. या योजनेचा तपशील अर्थात् तज्ज्ञांनी ठरवावयाचा आहे. पण बिकट प्रश्नाचें ओबडधोबड दर्शन मनोरंजक वाटेल म्हणूनच चर्चेखातर केलें आहे.

श्री. बा. रानडे, दादर

## श्री. भा. वि. जाधव यांचें मत

म. सा. पत्रिकेचें काम आपल्याकडे आहे व तींत आपण विषयवैचित्र्य आणून तिची उपयुक्तता वाढवूं पाहता हें चांगलें आहे. मी साहित्यिक नसल्याने पत्रिका वाचण्याचा प्रयत्नहि केलेला नाही. पण विविध बाबींचा भाषेवर काय परिणाम होतो याची चर्चा होणें जरूर आहे. रेडियोतील गायन, व्याख्यानें, नाट्यसंवाद वगैरेचा परिणाम भाषेवर होणारच, व याचा ऊहापोह होणें इष्ट आहे.

रेडियो स्टेशनें भाषावार असण्याची आवश्यकता या विषयावर आपण मला लेख लिहिण्यास सांगत आहां. पण ही आवश्यकताच मला पटत नाही. आज मुंबई इलाख्यांत मुंबई हें एकच स्टेशन आहे. पण समजा पुढे अहमदाबाद, पुणें व धारवाड येथे निरानिराळीं स्टेशनें उघडण्यांत आलीं तरी हीं स्टेशनें केवळ गुजराथी, मराठी, कानडी वगैरे एकाच भाषेचीं ठेवणें सोयीचें नाही· हिंदी ही देशभाषा होऊं पाहत आहे. या कामीं मदत म्हणून हिंदी प्रोग्राम ठेवावे लागतील व इंग्रज आणि ॲंग्लो-इंडियन यांच्यासाठीं इंग्रजी प्रोग्रामहि थोडेबहुत ठेवावे लागतील. म्हणून निव्वळ मराठी किंवा गुजराथी वा कानडी अशीं स्टेशनें ठेवणें परवडणार नाही. गवयांचीं गाणीं बहुधा हिंदींत असतात. अशा अनेक अडचणी मला दिसत आहेत.

आता पुण्यास स्टेशन झाल्यावर बहुतेक ऐकणारे मराठी भाषेचे असल्यास पुष्कळसा वेळ मराठीला द्यावा लागेल. पण हिंदी आणि इंग्रजी भाषास मज्जाव करतां येणार नाही असें माझें मत असल्याने आपण दिलेल्या विषयावर मला लिहितां येत नाही.

ता. २८–९–१९३७. डोंगरी

# व्यक्ति आणि वाङ्मय

( लेखक : श्री. के. क्षीरसागर, बी. ए.; प्रकाशक : य. गो. जोशी; मूल्य १॥ रु. )

## परीक्षण

## १

### व्यक्ति

श्री. क्षीरसागर यांचें नांव मराठी वाङ्मयांत मार्मिक टीकाकार म्हणून आता माहीत झालें आहे. या ग्रंथाने ते नाव चिरस्थायी होईल असें या पुस्तकाचें वैशिष्टय आहे. या ग्रंथात समाविष्ट केलेले तात्रे, केळकर, माधव ज्यूलियन, यशवंत, अत्रे हीं नावें वारंवार ऐकून त्यांच्याबद्दल सर्व कांही कळल्याचें लोक समजतात ! आणि गडकरी, 'जुने' ताचे परप्रांतीय, लोकहितवादी चिपळूणकरांनी सांगितलेच आहेत, भाषाशुद्धीवर बॅ. सावरकर तर आहेतच, मग काय आहे या पुस्तकांत अशी आळसट मनोवृत्तीची विचारणा होण्याचा संभव आहे ! पण ग्रंथ वाचल्यावर या शंका दूर होतील. कारण आभासात्मक ज्ञानाचा लोकभ्रम या टीकालेखांनी दूर झाल्याखेरीज राहणार नाही. उदाहरणार्थ—पहिलाच लोकहिवादींवरचा लेख घ्या. या ग्रंथांतील लोकहितवादींवरच्या निबंधावरून, लोकहितवादींविषयीचे आपलें पूर्वग्रहदूषित मत तर बदलावें लागेलच परंतु शास्त्रीबोवाबद्दलहि आपला आदर जरा तपासून घ्यावा लागेल !

वाङ्मयाची वाढ वाचकाच्या आटोक्याबाहेर जात चालली की मग ग्रंथ न वाचताच मतें तयार करण्याची एक प्रथा पडत जाते. ज्ञानाचे बरेचसे विषय भोवताली बोलले जात असल्याने ते आपणांस माहीत आहेत असा आभास उत्पन्न होतो. पण हे आभासात्मक ज्ञान एखाद्या वेळीं कसोटीस लावण्याचा प्रसंग आला तर गावभर पसरलेलें धुकें नाहीसें होऊन दोन चार दंवाचे थेंब फक्त हाती लागतात. या ग्रंथातील व्यक्ति व वाङ्मय यांच्याविषयींचीं विस्तृत विवेचनें वाचल्यावर आपले बरेचसे आभास होऊन दूर कांही तरी निश्चित ज्ञान हातीं लागते. आणि श्री. क्षीरसागर यांच्या लेखनाचें हें वैशिष्टय या ग्रंथांत पहिल्यानेच असें एकत्र पाहावयास सांपडत आहे ही अत्यंत आनंदाची गोष्ट आहे.

या ग्रंथात बरेचसे विषय निरनिराळ्या व्यक्ति व वाङ्मय या निमित्ताने आले आहेत हें अगदी साहजिक आहे. कारण या व्यक्ति बहुविध विषय व्यापणाऱ्या आहेत. त्या विषयाची सूचि अनुक्रमणिकेंतच दिली आहे. त्या सूचीवरून वाचकांच्या लक्ष्यात येईल की आपणास परिचित वाटणाऱ्या व्यक्तींविषयी किती तरी नवीन ज्ञान या टीकालेखातून मिळणार आहे. पहिल्याच लेखांत श्री. क्षिरसागर यानी एका प्रचंड लोकभ्रमावर हल्ला चढवला आहे. तो लोकभ्रम म्हणजे "चिपळूणकर हे टीकाकार होते" हा ! मराठी वाङ्मयात हळू हळू बाहेर पडूं लागलेलें कटु सत्य शेवटीं क्षीरसागरांनी सूर्यप्रकाशांत वाळत टाकलें आहे. स्वतःस मराठी भाषेचा शिवाजी म्हणविणाऱ्या शास्त्रीबोवांनी आपल्या लेखणीची कुऱ्हाड ज्या कांही ठिकाणीं पोरकटपणाने चालवली त्यांपैकी लोकहितवादी हें एक ठिकाण आहे. पण सामान्य जनतेने शास्त्रीबोवांच्या कांही विशिष्ट गुणांवर लुब्ध होऊन त्यांचे हे लाड भोळसर मायाळूपणाने कित्येक

वर्षे चालवले व चिपळूणकराच्या मतांवरून आपली मतें बनवली. कारण लोकहितवादींचें वाङ्मय उपलब्ध होतें त्या वेळीं शास्त्रीबोवाच्या प्रचंड आरडाओरडीने लोकाना आपल्या निबंधमालेच्या बंधाऱ्यापलीकडे जाऊंच दिले नाही ! ज्या वेळीं शास्त्रीबोवाविषयीच्या पोकळ आदराचा वीट येऊन त्याच्याविषयीचे अज्ञान कळूं लागले त्या वेळी लोकहितवादींचे वाङ्मय दुर्मिळ झालेले ! तेव्हा शास्त्रीबोवाचे म्हणणं चूक आहे एवढंच कळून लोक थाबले पण बरोबर काय आहे हें कळण्यास मार्ग नव्हता. तो श्री. क्षीरसागरानी उपलब्ध केला. स्वतः त्यानी अविश्रांत श्रम करून, लोकहितवादींच्या वाङ्मयाचे अवशेष शोधून, पाहून, टिपून त्यांच्याविषयीची माहिती जमवून हा लेख लिहिला व यात आपणांस आता इतके दिवस चिपळूणकरांनी अडवून दडवून ठेवलेला एक लोकहितवादी दिसत आहे !

त्याच्या चरित्राची अत्यंत आवश्यक अशी माहिती देताना श्री. क्षीरसागरानी स्वतः कोठेहि भाष्य केलें नाहीं. कारण तें सत्यच इतके स्पष्ट आहे की त्याला वकिलीची जरूरी नाही. प्रचलित समाजाचा सर्वथैव कोंडमारा करणाऱ्या सीमा हरप्रयत्नें करून फोडण्यासाठी त्यांनी अविश्रांत श्रम केले व सीमोल्लंघनाच्या प्रयत्नातच त्यानी विश्रांति घेतली ! त्यांचें अध्ययन अत्यंत व्यापक होतें. पण व्यापक ज्ञानाच्या भाराखाली कित्येकाची विवेकशक्ति बोथट होते, बुद्धीचा गोंधळ होतो व ते नुसते अतिव्यास विद्वान होऊन बसतात. त्याना संस्कृतचा गंध नव्हता हा आरोप मनात ठेवून "स्वाध्याय" हा ग्रंथ वाचावा. 'आर्यसंस्कृतीचा संदर्भग्रंथ' असे श्री. क्षीरसागरांनी त्यास गौरविलें आहे. त्या ग्रंथाची माहिती मिळाल्यावर वरील आरोप मनातून आपोआप गळून पडेल. लोकहितवादींना संस्कृत येत नव्हतें हें खरें असतें तर बरें झाले असते असे काही न चूक मनोवृत्तीच्या धार्मिकास वाटेल कारण त्यानी आपल्या संस्कृत ज्ञानाच्या बळावर धार्मिक ग्रथाची चिकित्सा केली आहे व त्यामुळे आपलें धार्मिक ग्रंथाविषयीचें आवडते अज्ञान शतशः विदीर्ण होते. जीं मतं आपण अधार्मिक म्हणून लाथाडीत आलों तीं धर्मग्रंथात आहेत हे लोकहितवादी दाखवतात ! स्मृतींत जितका व्यवहार आहे तितका श्रुतींत नाही हे सत्य श्रुतिस्मृति व त्याच्यानंतर पुराणेंहि घेऊन त्याचे केवळ भारवाहकत्व पत्करणाऱ्याना कसे पटणार ? याहिपेक्षा शास्त्रग्रंथावर त्यानी पाडलेला आगमप्रकाश पाहून तर आपले डोळे बावरतील ! लोकहितवादींवर आक्षेपकांचे स्वरूप व्यक्त केल्यावर केवढा गहजब ! कारण लोकानी तो शिवाच्या तोंडून पाडलेला दिसला होता ! मग त्यावर टीका म्हणजे शिवावर टीका ! ! सामाजिक रूढींवर लोकहितवादींनी जबर तडाखे उडवले आहेत. देशोन्नतीच्या व समाजोन्नतीच्या त्याच्या योजना आज आपणास नवीन वाटत नाहीत कारण त्याचा उच्चार आपल्या कानीं कपाळीं होत आहे. हल्ली त्या कल्पना हे आधुनिकतेचें गमक झाले आहे. पण लोकहितवादींनी त्या कल्पना ५० वर्षापूर्वी सांगितल्या हे लक्षात ठेवून त्या वाचल्या तरच त्याचें बौद्धिक सामर्थ्य लक्षात येईल. 'देश धनवान् झाला पाहिजे" "स्वतंत्रतेस आला पाहिजे" "धनपाठीस बक्षिस द्यावे कीं सावकाराचा हुन्नर करणारास ?" "ज्या देशाची खानगी ही आमदानी (आयात) पेक्षा अधिक तो दरिद्रीच म्हटला पाहिजे" या गोष्टी त्यांनी त्या काळी वारंवार सांगितल्या ! "अहो लोकानो, तुम्ही आपल्या कन्यांचे वध करणारे आहात !" "सरकारची आशा धरूं नका. दागिने गहाण ठेवून या (यांत्रिक) चढाईवर हल्ला करा. मुलूख विलायतचा नाही. इथल्या लोकानी सर करून दिला. त्याचा भरवसा तुटला म्हणून चौदा हजाराबद्दल ऐशीं हजार सोजिराचा भुरदंड सोसावा लागतो हें लक्षण बरें नव्हे !" लोकहितवादींचे वरील उद्गार हे आठवणी, आख्यायिका किंवा सुभाषितें नाहीत.

ते ग्रंथातील उतारे आहेत. त्या उद्धाराच्या पाठिमागे विस्तृत विचारमालिका आहे. यावरून त्यांच्या विचारातील पुरोगामित्व सहज लक्ष्यांत येईल. लोहितवादी असे काय सांगत होते की, त्याच्याएवढा गहजब व्हावा असा शोध करूं लागावे तर त्याने वरील उद्धार सांपडतात आणि या उद्धाराबद्दल त्याना परधार्जिणेपणाचा शिक्का मिळाला ! त्याची पिछेहाट का झाली तर काळाच्या मानाने ते फार पुढे होते म्हणून ! समाजाने निवडलेल्या पाळलेल्या विद्वानांपेक्षा ते जास्त विद्वान होते म्हणून !

असो, आज लोकहितवादीचा व्यक्ति व वाङ्मय असा दुहेरी परिचय करून देऊन श्री. क्षीरसागर यानी समाजातील एका अन्यायाचे निराकरण करावयास सुरवात केली आहे याबद्दल त्याचे कोणीहि अभिनंदनच करील. यंदाच सुदैवाने लोकहितवादींचें चरित्र विश्वविद्यालयांत अभ्यासिलें जात आहे. अशा वेळी विश्वविद्यालयीन प्राध्यापकानी, निदान विद्यार्थ्यांनी, स्वतःच श्री. क्षीरसागर यानी दाखवून दिलेल्या दृष्टीने लोकहितवादींचे वाङ्मय वाचावें ! नुसत्या अवातर वाचनाच्या पोकळ हौसेसाठी निबंधमालेचे उतारे काढीत बसू नये !

लोकहितवादींवरील निबंधाप्रमाणेच पुढील निबंधातहि श्री. क्षीरसागर याची हीच संशोधनात्मक दृष्टि दिसून येते. त्यामुळेच लोकाना अतिपरिचित अशा व्यक्तींच्याहि विवेचनात त्यानी नवीन विचाराची भर घातली आहे. श्री. भास्करराव तांबे याच्यावरील निबंधात त्यांनी लोकाभिरुचीचे वैचित्र्य प्रामुख्याने स्पष्ट केलें आहे. महाराष्ट्रीय काव्यलता पूर्ण विकास व्हावयाच्या आतच लोकाना काव्याचा कंटाळाहि आला ! व जुन्यानी व नव्यानी दोघानीहि परस्परविरोधी कारणासाठी काव्यावर झोड उठवली ! कवीची रेवडी उडविणें हे एक आधुनिकतेचे लक्षण होऊन बसलें ! जणूं काय काव्याचा भरपूर आनंद उपभोगून समाजाचें तोंड विटलें आहे. याला भिऊन काही कवीहि घाबरले व त्यानीहि लोकाच्या आवडीसाठी आत्मविडंबन करून घेण्यास सुरवात केली. उत्सवाच्या गर्दीत देव्हाऱ्यातले देवहि स्वतःला विसरून नाचूं लागावेत अशी ही स्थिति आहे. पण या धामधुमींत भास्करराव स्थिर आहेत. त्यांना आपल्या कवित्वाबद्दल शंका आली नाही. लोकाच्या इच्छेसाठी त्यानी आपला तट्टू डोक्यावर घेतला नाही ! कारण त्याना सौंदर्याने भक्ति दिली व भक्तीने श्रद्धा निर्माण केली ! साठाव्या वर्षी लोक त्याच्याकडे पाहूं लागले. साठ वर्षे त्यांनी लोकप्रीतीला टक्कर दिली व शेवटी तिला नमविलें ! यात लोकानी मिळविलेलें पराभवाचेंहि वैभव अभिमानास्पद आहे. आता "अशा जगास्तव काय झुरावे !" हेच त्यांचे कवन लोक मोठ्या आवडीने गात आहेत. 'फॅशनेबल' वेडेपण न पत्करता श्री. तांबे यांनी संसारांत रमून काव्य गायिलें. त्याच्या काव्याचें उगमस्थान त्यांच्या जीवनातच आहे हे श्री. क्षीरसागरानी दाखविले आहे. त्याच्या सौंदर्यासक्तीचें सात्त्विक स्वरूप ओळखण्यात व दाखविण्यांत लेखकाचीहि उच्च सौंदर्याभिरुचि दिसून येते. तांबे याच्या संकलनकाराच्या सौंदर्यासक्तीबद्दल क्षीरसागरानी गौरव केला आहे पण त्या भरात ते वाहवलेहि नाहीत. तांबे या या कवितांचें संकलन करता करता संकलनकारानी काही निरर्थक शास्त्रीयता दाखविली आहे व त्या कवितासंग्रहाला ऐतिहासिक कागदपत्रासारखें वागविलें आहे. याबद्दल श्री. क्षीरसागर यानी तीव्र निषेध व्यक्त केला आहे. विशेषतः श्री तांबे याच्या काव्योद्गारांशीं टागोरांशीं साम्य दाखविण्याची तळमळ ऐतिहासिक वृत्तीची निदर्शक असली तरी येथे ती अस्थानींच नव्हे तर हानिकारक झाली आहे हे क्षीरसागरानी दाखविलें आहे. सहजोद्गारांत दोन कवींचें साम्य दाखविणे महाराष्ट्रात फारसे सुरक्षित नाही. कारण या प्रांतांत साम्य

म्हणजे अनुकरण असा दंडक आहे ! गूढगुंजनाचें लेखकाचें विवेचन अत्यंत उद्बोधक आहे. वाचकांना कळत नाही तें त्याना गूढ असेल पण तेंच कवीलाहि गूढ आहे असें व आपल्याला इंद्रियगोचर न होणारें तें सगळें कवीचें गूढगुंजन हा जो गूढगुंजनाविषयीचा चुकीचा समज आहे त्यातील चूक स्पष्ट दाखविली आहे.

"महाराष्ट्रांत हिणकस पिकते पण टिकत नाहीं" असें श्री. क्षीरसागर म्हणतात. त्यांचा आशावाद कोणासहि मान्य होईल. पण उपटून टाकण्यासाठी तरी हिणकस पिकविण्याचे श्रम घेण्याचा खटाटोप महाराष्ट्राने कां करावा असाहि प्रश्न उत्पन्न होतो. श्री. तांबे यांच्यासारखें अस्सल पिकलें तर मग गवता ऐसी उदंड कविता वाढली तरी काय फिकीर आहे ! तें गवत बाधावर खुशाल डुलत राहील !

टीकाकार केळकर या छोट्याशा निबंधांत श्री. तात्यासाहेबांच्या यशाचें मर्म फार अचूक दाखविलें आहे. विविध वाङ्मयप्रकारांवर प्रसंगातून त्यानी ज्या मतांचा 'प्रस्ताव' व पुरस्कार केला त्यांचे उतारे देऊन त्यांची सूक्ष्म दृष्टि दाखविली आहे. पण या गुणांचा राजकारणात कां प्रभाव पडला नाही याची मीमांसा करण्याचें टाळूनहि श्री. क्षीरसागरांनी बरोबर मीमांसा केली आहे. ती म्हणजे अमोलिक बौद्धिक गुण दोषवत् भासावेत असेंच राजकारणाचे क्षेत्र आहे. यापेक्षा दुसरी कोणती मीमांसा असणार. काही राजकारणी पुरुषांचेंहि उत्तम वाङ्मय जगास माहीत आहे व ती त्याची रिकामपणाची कामगिरी होती !

कै. गडकरी याच्या लोकप्रियतेविषयीचे लोकभ्रम दूर करताना त्यांच्या सामान्य गुणांकडून विशिष्ट गुणांकडे श्री. क्षीरसागरानी लक्ष वेधलें आहे. कै. गडकरी यांचें कौतुक करताना कै. कोल्हटकराच्या गुरुत्वाचा लोक अवास्तव बडेजाव माजवतात ! वशिल्यांखेरीज वाङ्मयांतहि चालूं नये हीं अत्यंत हीन रसिकतेचीं लक्षणें आहेत. गडकऱ्यांचें वैशिष्ट्य त्याच्या गुरुस्थानात नसून उलट कोणत्याहि अवांतर फंदाची फाजील छाप त्याच्यावर नव्हती, यांत आहे ! त्यानी कोणाचें गुरुत्व पत्करलें नाही हेंच त्याचें वैशिष्ट्य. ते कोणाला बाधले गेले नाहीत म्हणूनच त्याच्याबद्दल एवढा आपलेपणा वाटतो. नाविन्याचें गुरुत्व पत्करण्याच्या वेड धारण करण्याऱ्या या काळात गडकऱ्याचें स्वतंत्र व्यक्तित्व याच गुणामुळे टिकून राहिलें आहे. गोविंदाग्रजाच्या यशाची ही मीमांसा किती गडकरीभक्ताच्या ध्यानीं आहे ?

माधव ज्यूलियन् याचें वाङ्मय व व्यक्तित्व जोखून तेथेहि श्री. क्षीरसागर यांनी लोकांना आकलन न झालेल्या परस्परविरोधी गुणाचा समुच्चय स्पष्ट करून दाखविला आहे. ओतप्रोत विरोधाला स्थान असण्याइतकें त्यांचें व्यक्तित्व ऐसपैस आहे हें ओळखलें की प्रोफेसरचा आज प्राध्यापक झाला याचें आपणास आश्चर्य किंवा चमत्कार वाटणार नाही. हें न कळल्यामुळे त्याच्याविषयींच्या आदरांत कुतूहलाचा भाग बराचसा दिसून येतो ! पण कुतूहल हेंच अज्ञानाचें चिन्ह नसतें काय ? माधवरावाबद्दल कुतूहल दाखवून चालूं लागणारें त्याच्या व्यक्तित्वाचें मापन करण्याच्या बाबतींतील आपला पराभव व दुर्बलत्व व्यक्त करीत असतात ! पांडित्य व कवित्व यांची सांगड लोकांना असंभाव्य वाटते ! फार्शी मराठी कोश, छंदोरचना व स्वप्नरंजन हा त्रिवेणी संगम लोकाना अगम्य वाटतो. विमनस्क मनस्थितींत ते 'सुधारक' लिहितात व विरहतरंगहि लिहितात आणि तेंच मन छंदोरचनेच्या गणमात्रा मोजीत बसवितात ! यातील एक एक गुण सुद्धा सामान्य वाचकाना थक्क करून सोडणारा आहे. पण एवढे गुण पाहताना आपले डोळे फिरावेत व दृष्टि विपरीत व्हावी हें आपल्या प्रकृतिधर्मास सुसंगतच म्हणावयाचें नाही तर काय ? आपल्या मताचे प्रयोग स्वतःवरच करताना ते अगदी शास्त्रज्ञाचा

निष्ठुरपणा दाखवतात! भाषाशुद्धीच्या तडाख्यांतून त्याचें काव्य वांचविण्यासाठी त्याच्या रसिकांचा जीव तळमळत आहे! पण माधवरावांपुढे कोणाचें चालणार! ज्याना लोकप्रीतिची लाच लागू पडत नाही त्यांच्यापुढे कशाची मात्रा चालणार! महाराष्ट्राने त्याचा छळ करून त्यांना विद्वान् ठरण्याची संधि केली आहे! पण श्री. क्षीरसागरासारखे मित्र मात्र त्यांना जपूं शकले आहेत म्हणून त्यांच्या लेखांतून संपूर्ण माधवराव कळण्याचा योग आज आला! नाही तर त्याच्या कित्येक मित्रानीहि लोकप्रीतीच्या मोहाने माधवरावावरच हल्ला करण्याचें धैर्य दाखविले आहे! माधवरावांमधील असामान्य माणुसकी या लेखात कळल्यावर त्याचे विरोधकहि त्याच्यावर प्रेम करूं लागतील.

यशवंतांना आपण कीर्ति दिली हा लोकाचा गैरसमज श्री. क्षीरसागरानी दुरुस्त केला आहे. कारण लोकांच्या मनोरंजनावरच यशवंत अवलंबून राहिले असते तर मात्र लोकाना हें श्रेय घेतां आलें असते. पण लोक त्यांना मनोरंजनाच्या नादीं लावीत असताहि त्यांनी लोकाच्या लहरी पुरवून उरेल इतकें प्रतिभावैभव राखून ठेवलें आहे. आपल्या काव्यश्रवणास जमलेल्या हौशी श्रोत्याच्या चवचालपणाला पुरून उरेल इतका त्याचा अप्रतिहत आत्मविश्वास आहे. लोकानुरंजनाचें कार्य भलेपणाने करीत असता प्रसंग आल्यास काटेरी मुकुटहि आनंदाने धारण करण्याची तयारी करून ते बसले आहेत. त्यानी प्रचलित विषयाबरहुकूम कविता लिहिल्या नाहीत तर लिहिलेल्या कविता प्रचलितास ऐकावयास लावल्या. पाडित्य व गुरुत्व याचे सामर्थ्य पाठीशीं नसताना ते जगाला रीत लावीत आहेत. नाही तर गोड गळे समाजात गल्लोगल्लीं पोस्टाच्या पेटीप्रमाणे उघडे पडले आहेतच! पण यशवंतरावानी 'गायकी'च्या धकाधकींत आपलें 'काव्य' लोकाना ऐकवले आहे.

लोकाभिरुचीला वळवण्याचें सामर्थ्य श्री. अत्रे यांच्याहि ठिकाणीं आहे हें फार थोड्या लोकाना पटेल! सामना पाहण्यासाठी जमलेल्या लोकानी सामन्याचें यश घेण्यासाठी हात पुढे करणें म्हणजे अहंकारगंडाचें प्रदर्शन करण्यासारखे आहे! श्री. अत्रे यांच्याबद्दल लोक अशा वृत्तीने बोलतात ते ऐकून आश्चर्य वाटल्याखेरीज राहणार नाही. त्यात लोकांचा केविलवाणा गरजूपणा सहज लक्ष्यात येतो. आपली नवमतवादाची हौस भागविणारा अशा अपेक्षेने त्याच्याकडे पाहणाऱ्याना 'घराबाहेर' नाटकामध्ये त्यानी सावध केलें आहे हें श्री. क्षीरसागर यांनी दाखविलें आहे. आपली हौस पुरवली नाही म्हणून बरेच लोक त्यांच्यावर रागावून त्यांची कींवहि करूं लागले! पण हे स्वातंत्र्य टिकविण्यासाठी यापेक्षा जास्त सामर्थ्य जमवावयास पाहिजे ही सूचना श्री. क्षीरसागरानी मोठ्या खुबीने केली आहे. नाट्यतंत्र अगदी अप्-टु-डेट झालें आहे असा भरंवसा कांही लोकाना वाटत नाही. त्याना श्री. क्षीरसागरानी दिल्ली किती दूर आहे याची जाणीव दिली आहे.

गं. भा. निरंतर

| अ. | नांव | लेखक |
|---|---|---|
| १६ | तरुण भारतसमाज पद्यावली १९३४ | चव्हाण |
| १७ | गोपाळकृष्ण मेळा पद्यावली १९३४ | |
| १८ | स्वदेशी प्रचार मेळा पद्यावली १९३४ | |
| १९ | नवीन शिवाजी अथवा नाना फरारी पोवाडा | अ. ब. कोल्हटकर |
| २० | शातताभय संग्रामांतील खानदेशचे विजयी वीर | मुचाटे |
| २१ | पंजाबचा सिंह | ना. ब. चव्हाण |
| २२ | म. गांधींचा प्रवास उर्फ मिठाची मोहीम | (पोवाडा) गो. रा. संगीतम् |
| २३ | सुदर्शनगीतें | वि. ग. करंदीकर |
| २४ | ठाणें सत्याग्रह मंडळाची प्रभातफेरी पद्यावली | आप्पाजी पा. करंदीकर |
| २५ | राष्ट्रीय पद्यावली | घोले |
| २६ | प्रभातफेरीचीं गाणीं १-२ | आवडे |
| २७ | राष्ट्रीय पद्यावली, प्रभातफेरीचीं गाणीं १ ते ४ | पाठक |
| २८ | राष्ट्रीय पद्यावली | अंबर्डेकर |
| २९ | राष्ट्रीय पद्यावली | मं. ना. कुळकर्णी |
| ३० | नवजीवन पद्यावली | पाटील |
| ३१ | प्रभातफेरीची गीतावली | वर्दे |
| ३२ | राष्ट्रीय पोवाडा | संपाळे |
| ३३ | प्रभातफेरी पद्यावली | दीनानाथ केकरे |
| ३४ | राष्ट्रीय पुष्पगुंफा | दीनानाथ केकरे |
| ३५ | हुतात्मा यतींद्रनाथ | कृतान्त |
| ३६ | सरदार भगतसिंगाचा पोवाडा | भ. खं. पवार |
| ३७ | दे. भ. भगतसिंग, सुखदेव व राजगुरु | पाठक |
| ३८ | +वैदिक राष्ट्रीय गीत | श्री. दा. सातवळेकर |
| ३९ | राष्ट्रीय गीतमाला | डी. जी. लि. |
| ४० | गणपति मेळ्याचीं पदें भाग २ रा (१९२२) | चि. का. पित्रे |
| ४१ | सत्याग्रहमित्र मेळ्याचीं पदें | |
| ४२ | राष्ट्रीय विद्यालय मेळ्याचीं पदें (१९२२) | |
| ४३ | सत्याग्रह आणि दारूचीं पदें (१९२२) | |
| ४४ | एम्. एन्. रॉय | जी. पी. खरे |
| ४५ | टिळक व परांजपे यांचीं भाषणें | घ. सि. वाळवे |
| ४६ | विजयतोरण नाटक | |
| ४७ | श्रीकृष्णशिष्टाई नाटक | |
| ४८ | पिक्टोरिअल इंडिया ऑफ टुडे | ह. रा. भागवत |
| ४९ | टिळकांचीं भाषणें | ह. रा. भागवत |

| अ. | नांव | लेखक |
|---|---|---|
| ५० | श्रीकृष्ण परमात्मा आणि हिंदी राष्ट्रीय पक्ष | ह. रा. भागवत |
| ५१ | नवीन टिळकांचा पोवाडा आणि टिळकगीत | र. कृ. मुळे |
| ५२ | द्रोणिमणिहरण | ग. धों. काणे |
| ५३ | संगीत लंकाविध्वंस नाटक | ग. धों. काणे |
| ५४ | बारीसालची धामधूम नाटक | बा. पु. साठे |
| ५५ | वंगवध नाटक | बा. पु. साठे |
| ५६ | +श्रीनिवासराव (कादंबरी) | नाथमाधव |
| ५७ | अरविंदबाबूंचीं महाराष्ट्रांतील भाषणें | ह. रा. भागवत |
| ५८ | ऐतिहासिक पुरुषाचे उत्सव का करावे ! | ग. व. जोशी |
| ५९ | स्वदेशी आणि बहिष्कार | रंजित-रंजक नाटकमाला |
| ६० | प्रतापसिंह | ले. पु. वि. साठे |
| ६१ | राजनिष्ठ आणि राजद्रोह | |
| ६२ | श्रीकृष्णचरित्र भाग १ ला | |
| ६३ | आत्मोद्धार भाग २ रा–जगदुद्धार | |
| ६४ | तेविसावी राष्ट्रीय सभा | |
| ६५ | सोन्याबापू | रंजित-रंजक नाटकमाला |
| ६६ | अश्वत्थाम्याचा छापा | बा. पु. साठे |
| ६७ | अश्वत्थाम्याचें पारिपत्य | |
| ६८ | रामकार्याचा ओनामा | |
| ६९ | लोहभीम | |
| ७० | विपिनचंद्र पाल यांचीं मद्रास येथील भाषणें | गो. वि. जोशी |
| ७१ | वर्ण-धर्म-मीमांसा | भट्ट. वि. भू. तांबे (झांशी) |
| ७२ | परदेशी साखर | शंकरगीर |
| ७३ | श्रीसमर्थ रामदासस्वामी पोवाडा | |
| ७४ | +मुस्तफा केमालपाशा | स. ना. मंडलीक |
| ७५ | मुमुक्षूचे उद्गार–भाग १ ला व २ रा | ल. रा. पांगारकर |
| ७६ | स्फुट विवेचन (रंगभूमि मासिकांतील उतारे) | शं. बा. मुजुमदार |
| ७७ | स्वदेशी चळवळ नाटक | इस्माईल दु. भारदार |
| ७८ | स्वदेशी पर्दे–भाग पहिला व दुसरा | टी. के. पित्रे |
| ७९ | विजापूरच्या आदिलशाहीचा शेवट | ना. घ. हर्डीकर |
| ८० | धी न्यू इंग्लिश टीचर भाग १ व २ | य. गो. दीक्षित |
| ८१ | देशभक्तिशिक्षण | भा. ह. पटवर्धन |
| ८२ | श्रीशिवाजीउत्सव व त्यापासून महाराष्ट्रीयांस बोध | |
| ८३ | राष्ट्रीय शिक्षण व लोकजागृति | बा. पु. साठे |

| अ. | नांव | लेखक |
|---|---|---|
| ८४ | समालोचक मासिक भाग १ अंक ३ व ५. भाग २ अंक ३ | त्र्यं. गु. काळे |
| ८५ | छत्रपतीच्या जन्मोत्सवाकरिता एक चिमुकला पद्यसंग्रह | शेतकरी प्रेस |
| ८६ | झिनत महाल | का. ना. भागवत |
| ८७ | महाराष्ट्रगीत भाग १ ला | शं. ग. पुरोहित |
| ८८ | +वेणीसंहार नाटक | अ. बा. बर्वे |
| ८९ | महाराणा प्रतापसिंह नाटक | |
| ९० | स्वदेशी चळवळ नाटक | |
| ९१ | देशभक्तवियोग स्मृतितरंग | |
| ९२ | देशभक्त मदनप्यार धिंग्रा यांचा लंडनच्या पोलीस कोर्टांतील जबाब | |
| ९३ | स्वातंत्र्य अंक २ रा | |
| ९४ | स्वातंत्र्य अंक ४ था | |
| ९५ | मराठ्याची हिम्मत | |
| ९६ | युगांतर—सरकार वठणीवर कसें येईल | केसरी ता. १२-४-३५ |
| ९७ | एकश्लोक गीता | केशवशास्त्री दामले |
| ९८ | पानपतचा मुकाबला | शिरगांवकर |
| ९९ | टिळकांचा जयजयकार | शं. ग. पुरोहित |
| १०० | मेजवानी (अभंग) | |
| १०१ | राजनैतिक कारस्थान | शं. दि. करंदीकर |
| १०२ | +आमच्या देशाची स्थिति ÷ | विष्णुशास्त्री चिपळूणकर |
| १०३ | +काळांतील निवडक निबंध (भाग १०) – | शि. म. परांजपे |
| १०४ | पानिपतचा सूडबदला | बॅ. सावरकर |
| १०५ | +माझी जन्मठेप | |
| १०६ | +मॅझिनीचें आत्मचरित्र व राजकारण ÷ | |
| १०७ | +गुन्हेगार – | लालजी पेंडसे |
| १०८ | +लाला लजपतराय यांचें चरित्र | स. कृ. फडके |
| १०९ | रामदासी बुवा | ल. रा. पांगारकर |
| ११० | भाल्याच्या फेंकी | भा. व. भोपटकर |
| १११ | +थोरली आई | दा. न. शिखरे |
| ११२ | लो. बा. गं. टिळक यांचेवरील राजद्रोहाचा खटला | केसरी ता. १७-५-१९३५ |
| ११३ | श्रीशिवाजीमहाराज छत्रपतींचीं अद्भुत कारस्थानें | ना. ब. हर्डीकर |
| ११४ | शूर अबला | धनुर्धारी |
| ११५ | मराठ्यांचे इतिहासातील नानांचें महत्त्व | कृ. म. संत |

| अ. | नांव | लेखक |
|---|---|---|
| ११६ | ही सारी भाऊबन्दकी | ल. ना. जोशी |
| ११७ | स्वदेशी चळवळ | स. ह. ताम्हणकर |
| ११८ | बा. गं. टिळकांचें अल्प चारित्र आणि संस्मरणीय उक्ति | ल. रा. पागारकर |
| ११९ | बा. गं. टिळकाचें चरित्र | कृ. आ. गुरुजी |
| १२० | लोकमान्याचा निरोप | ग. बा. मोडक |
| १२१ | पानिपतचा मोबदला अथवा गिलच्याचा सूड | |
| १२२ | पृथ्वीराज संयोगिता | ग. धों. काणे |
| १२३ | शिवाजी आणि राष्ट्रोद्धार | प्र. श्री. भसे |
| १२४ | आनंदीआनंद अथवा सुमति नाटक | |
| १२५ | विजय जाई जुई अथवा मोहगुंफा | माला |
| १२६ | नरातक देवातक | |
| १२७ | +विजयदुर्ग अथवा गर्वनित्सरित | |
| १२८ | काळावरील राजद्रोहाचा खटला | गो. धों. दंडवते |
| १२९ | बाळ गंगाधर टिळक यांचेवरील खटल्याची हकिकत व परिशिष्टें | खं. नि. बेलसरे |
| १३० | बाळ गंगाधर टिळक यांचेवरील राजद्रोहाचा खटला | सी. के. दामले |
| १३१ | बाळ गंगाधर टिळक व शि. म. पराजपे यांचेवरील सन १९०८ सालीं झालेले राजद्रोहाबद्दल खटले | बा. गो. साठे |
| १३२ | शि. म. पराजपे यांचेवरील राजद्रोहाचे खटल्याची हकिकत | बा. गो. साठे |
| १३३ | बाळ गंगाधर टिळक यांचीं व्याख्यानें | स. ह. भावे |
| १३४ | लेखरत्नमाला | भा. रा. हर्डीकर |
| १३५ | हिंदुस्थानची वाईट स्थिति | गो. शं. बापट |
| १३६ | बिपिनचंद्र पाल यांचीं व्याख्यानें | भा. का. भोपटकर |
| १३७ | बाबू अरविंद घाप यांचीं आपल्या पत्नीस पत्रें | |
| १३८ | शातियुग व देशसेवा | गो. स. पोतदार |
| १३९ | +माझ्या आयुष्याचा जमाखर्च | लाबेशास्त्री |
| १४० | खरे लुटारू कोण | व. भी. पाटील |
| १४१ | +रणरागिणी | शा. गो. गुने |
| १४२ | अप्रकाशित राजनैतिक इतिहास | जोशी |
| १४३ | कॉंग्रेसची अलीकडील कामगिरी म्हणजेच हिंदुस्थानांतील स्वराज्याचा इतिहास | जावडेकर व देवगिरीकर |
| १४४ | +रंगीला रसूल | अ. व. कोल्हटकर |
| १४५ | रशियन राज्यक्रान्तीचा संक्षिप्त इतिहास | न्यू मनोहर प्रेस |

| अ. | नांव | लेखक |
|---|---|---|
| १४६ | रत्नागिरी जिल्हा कॉंग्रेस कमिटी १९३२ सालचा कायदेभंगाचा इतिहास | |
| १४७ | वसाहतींतील ट्रेड युनियन चळवळीचा ओनामा | नवयुग प्रिं. प्रेस, मुंबई |
| १४८ | हिंदुस्थानाला स्वराज्य का पाहिजे ! | भारत विजय प्रेस, वर्धा |
| १४९ | यवतमाळ जिल्ह्यातील सत्याग्रहाचा त्रोटक इतिहास | |
| १५० | +पत्री ( काव्यसंग्रह ) + | |
| | मासिकें | अंक १ ला स. १९३२ |
| १५१ | चित्रमय जगत् (लष्करी अंक) वर्ष २२ | ,, २ रा स. १९३२ |
| १५२ | ,, ,, ,, | ,, ३ रा स. १९३२ |
| १५३ | ,, ,, ,, | |
| १५४ | यशवंत नं. ५८ जानेवारी स. १९३४ | अंक ६, ७ |
| १५५ | राष्ट्रधर्म मासिक वर्ष २ रें | अंक ८ स. १९३२ |
| १५६ | वागीश्वरी मासिक वर्ष ३ रें | साने गुरुजी |

## कै. जयकृष्ण केशव उपाध्ये

ता. २५ ऑगस्ट १९३७ रोजीं नागपूरचे प्रसिद्ध कवि जयकृष्ण केशव उपाध्ये हे कालवश झाले. गुणी असून प्रसिद्धीच्या साधनांपासून दूर राहिल्याने जे मध्यप्रांतिय साहित्यिक मराठी वाचकांच्या व्हावे तितके परिचयाचे झाले नाहीत त्यांत कै. उपाध्ये यांची गणना होते. रसाळ रचना, नर्मविनोद, सुस्वर व भावनापूर्ण काव्यगायनाची धाटणी हे गुण असूनहि उपाध्ये हें परवा परवापर्यंत आपल्या काही निकट स्नेहीमंडळाबाहेर प्रसिद्धी पावले नाहीत. आणि १९२७ च्या पुण्याच्या संमेलनांत ते एकदम प्रसिद्धी पावले ते त्यांच्या अभिजात काव्यगुणांबद्दल नव्हे तर करमणूक म्हणून त्यानी केलेल्या एका विडंबनकाव्याबद्दल ! दुर्दैवाने या प्रसिद्धीमुळे रसिक कविमनास समाधान वाटेल इतके उपाध्ये धट्टप्रकृती नव्हते म्हणून त्याच्या कष्टमय आयुष्यात बहुतेक साहित्यिकास प्रिय असणारा जनजिव्हाळ्याचा व समाजमान्यतेचा विसावा त्याना फारसा लाभला नाही. त्याचे शेवटचे दिवस आधुनिक विराग्याप्रमाणेच गेले. मराठी साहित्यिकांची आपल्या समाजात जी सर्वसाधारण दैन्यावस्था व अनास्था आढळते त्यांस कै. उपाध्ये अपवाद नव्हते. त्यांच्या मृत्यूने मराठी साहित्य एका रसिक व वेदान्तभक्त कवीस मुकलें आहे.

# —: नागरी लिपी सुधारणा :—

नागरी लिपी व अंक स्वस्तिक चिन्हावरून निर्माण झाले असावे असे आम्हांस वाटते. कारण स्वस्तिकात क च ट त प हीं अक्षरें अगदीं स्पष्ट दिसत असून बाकीचे वर्ण व अंकहि विशिष्ट वळण देऊन बनवितां येतात. चालू लिपीतील शिरोरेघ काढून टाकून वेलांटी, मात्रा, उकार इ० अक्षरांपुढे एका मध्यांत व अलग लिहितां येतील अशीं सुटसुटीत स्वरचिन्हें आम्हीं स्वस्तिक चिन्हावरूनच बनविलीं आहेत.

स्वरचिन्हें चालू

स्वरचिन्हें नवी

अ आ आ आ आ आ आ आ आ आ अं अः

| कठोर व्यंजनें | | | जोडाक्षरें | | |
|---|---|---|---|---|---|
| चालू | नवीं | खुलासा | चालू | नवी | खुलासा |
| | | हीं महाप्राणोच्चार किंवा कठोर व्यंजनें इंग्रजींत h लावून आणि ण ष ळ N, Sh, L अशीं अक्षराखालीं टिंबें देऊन होतात. तसेंच कानडींत मृदु व्यंजनाखालीं टिंब देऊन कठोर व्यंजनें होतात. मोडी लिपींत ड च्या पोटांत टिंब दिलें तर ठ होतो. तशीं हीं नवीं कठोर व्यंजनें केलीं आहेत. याप्रमाणे १३ कठोर व्यंजनें व २ (ङ ञ) अनुनासिकें एकूण १५ व्यंजनें ३६ व्यंजनांतून वजा जातां २१ व्यंजनें शिल्लक राहतात.<br>चालू लिपींत (ख) र व; (ध) घ; (थ) य; (भ) म; आणि (इ झ) ङ ह ह्या अक्षरांचें एकमेकांशीं सादृश्य असल्यामुळे घोटाळा होतो तो कंसांतील कठोर व्यंजनें कमी झाल्यामुळे अनायासें नाहीसा होतो | न्य<br>क्त, क्त<br>क्व क्व<br>न्न<br>ट्ट<br>ह्य, ह्य<br>क्क, क्क<br>र्व<br>ड्र<br>द्र<br>र्‍य<br>र्‍ह, र्ह<br>र्‍क, र्क<br>क्र | न·य<br>क·त<br>क·व<br>न·न<br>ट·ट<br>ह·य<br>क·क<br>र·व<br>ड·र<br>द·र<br>र·य<br>र·ह<br><br>क·र | चालू जोडाक्षरांचे प्रकार<br>१ पूर्ण व्यंजनाचा पाय मोडून, २ अर्धव्यंजन पूर्ण व्यंजनास जोडून, ३ अर्धउच्चार होणारें अक्षर पूर्ण लिहून त्याचे कुशींत पूर्ण उच्चाराचें लहान अक्षर शिरकवून, ४ एकावर एक अक्षर काढून, ५ निरनिराळ्या प्रकारानें र जोडून<br>वरील जोडाक्षरांचे निरनिराळे अनेक बिकट प्रकारांऐवजीं दोन पूर्ण व्यंजनांमध्ये मध्यावर संयोजक टिंब पायमोड चिन्हाऐवजीं देऊन जोडाक्षराची एकच सोपट व सुलभ पद्धत केली आहे.<br>क्ष, ज्ञ हीं दोनच जोडाक्षरें पूर्वीपासून बाराखडींत गणलीं गेल्यानें तशींच ठेवलीं आहेत. |

वरील स्वरचिन्हांत डावीकडील अर्धवर्तुळ व आडवी रेघ ऱ्हस्व स्वराकरिता व उजवीकडील दीर्घ स्वराकरिता आहेत ऋ ऌ व अं ऑ इ० अक्षरांच्यापुढे ऋकार व चंद्रकोर देऊन करावें जसें-- अ ॄ अॅ.

आमच्या पद्धतीनें इंग्रजीप्रमाणे प्रत्येक वर्ण व स्वरचिन्हें निराळीं बसतात व सरळ रेषेंत जुळणी होते.

बॅ. सावरकर यांच्या योजनेप्रमाणे 'अ'ची बाराखडी केल्याने एकच 'अ' स्वराने भागवें.

टींपा—टिंबांचें स्पष्टीकरण . अक्षराचे उजवे टोकाजवळचें टिंब, अनुस्वार; मध्यावरचें संयोजक चिन्ह; व खालील टोकाजवळचें पूर्णविराम. तसेंच अक्षराचे डावेकडील खालचे टोकाजवळचें टिंब कठोर व्यंजन चिन्ह.

फायदे--टैपांत वरीच बचत होऊन, साहित्यहि पुष्कळ स्वस्तांत पडतें अखंड टाइपामुळे डिग्रघांची गरज नाही. केसमधील घरांची संख्या सर्वांत कमी. जुळणी जलद व सहज. अर्धव्यंजनें अजिबात नाहीत. स्वरचिन्हें एका मध्यात असल्यामुळे मोनो व लायनो यंत्रावर बसविण्यास सुकर.

— स. ना. बेणारे, पंढरपूर

---

# भिलोडी कोंकणी

## (टांचण)

कोंकणी भाषा म्हणजे रत्नागिरीकडची किंवा गोव्यातील गोमातकी, असा नेहमीचा वाजवी समज. पण कोकणचे लोक मागे खाली त्रावणकोरपर्यंत व उत्तरेकडे गुजराथकाठेवाड-पर्यंत गेले असल्याने, त्याच्या तेथल्या बोलींना कोकणी असेंच नाव साहाजिक पडलें. बहुधा दुर्गादेवीच्या दुष्काळांत हे भिल कोंकणी गुजराथेंत आले असावेत. हल्ली याची वस्ती नवसरी, सुरत, सुरगणा, नासिक आणि खानदेश विभागात आहे. सुमारे दोन अडीच लाख वस्तीपैकी निम्मी सुरत एजन्सींतच आहे; त्या खालोखाल जवळ जवळ पाऊण लाख वस्ती नासिक जिल्ह्यात (पेठ व कळवण तालुके) आहे. खानदेशात पंधरा हजार व सुरगणा संस्थानात सुमारे दहा हजार लोक आहेत. हे लोक इतर भिलाहून आपल्याला श्रेष्ठ समजतात; कारण ते मूळ कोंकणचे सुधारलेले. यांची भाषाहि इतर भिलोडी बोलीपेक्षा मराठीला जास्त जवळची, विशेषतः धरमपूर आणि पेठ या बाजूंकडची. सुरत नवसरीकडे गुज-राथीचा पगडा जास्त व लोकसंख्या जास्त तिकडेच असल्याने ही बोली गुजराथी भाषेचीच आहे असें समजण्याकडे डॉ. ग्रियर्सनसारख्या भाषाशास्त्रज्ञांना मोह होतो [ लिंग्विस्टिक सर्व्हे पु. ९ भाग ३]. अस्सल कोंकणी लोकाप्रमाणे सानुनासिक बोलण्याची या भिलाची ढब आहे. 'अरा, तूं कोन आहास रा!' (र, किंवा रा हें वाक्यपूरण नेहमी असावयाचेंच). केवडाक (केवढा); ताह्मा( तेव्हा).

(१) चतुर्थी विभक्तीचे प्रत्यय 'ने' आणि 'ला'; उदा. 'एक माणुसने दोन पोसा होता.' 'बासला'=बापाला. (२) षष्ठीचे प्रत्यय 'ना' आणि 'चा'; उदा. 'बाहासचा', 'बाहासना'

(बापाचा). नवसरीकडे 'चा' प्रत्यय फारसा वापरण्यांत नाही. 'माना', तुना' याप्रमाणेच 'माझा (जा)', तुझा (जा)' असे प्रयोग होतात. (३) गुजरातींतल्याप्रमाणे सप्तमी 'मां' लावून होते. 'घरमां पेउला मर्जी नाही' (घरीं येण्याची मर्जी नाही). (४) तृतीयेचा 'ने' प्रत्यय आहेच. 'तेना बासने दीठा' (त्याच्या बापाने पाहिलें). माय=म्या. (५) क्रियापदें:—आहू= मी आहें. हे=आहे (कन्या हे). आहा=आहे. मराहा=मी मरतों. रेहेस=राहतोस. क्रियापदाचा भूतकाळ बहुधा गुजरातीप्रमाणे होतो; उदा. 'गीया' (तो गेला); 'पडना' (तो पडला)' होइनी' (झाली); आनी' (आली). नपुंसकलिंगी क्रियापदाचें रूप कोंकणातील मराठीप्रमाणे 'आं' अंतीं येऊन होतें; उदा. 'सागा' (सांगितलें); 'झाला', 'मारला' अशीं मराठी रूपें वारंवार आढळतातच. (६) भविष्यकाळ मराठीप्रमाणेच होतो. 'कुटीन' (मी मारीन); 'आखन' (मी म्हणेन); 'जेन' (जाईन). आज्ञार्थी प्रयोगहि मराठी प्रमाणेच; उदा. 'गन' (समज), 'घाला'. (७) संयोजी कृदंतरूपें कधी गुजराती-प्रमाणे तर कधी मराठीप्रमाणे होतात; उदा. 'करीने' (करून), 'वाटून' (वाटणी करून). बांसड्याकडे 'खाईहन' (खाऊन) अशासारखीं रूपें होतात. खानदेशांत 'हन' बद्दल 'सन' लागतो; उदा. 'खाईसन'. ठाण्याकडे, काथोडी 'हिन' प्रत्यय लावतात; उदा. 'उठिहीन' (उठून). जंजिऱ्याकडे 'हिनी' प्रत्यय लागतो; उदा. 'भिहीनी' (भिऊन). वऱ्हाड-मध्यप्रांतांत असाच 'सनी', 'सन्या' प्रत्यय लागतो; उदा. 'जाऊनसनी—न्या'. आपल्याकडे कुणबाऊ भाषेंत 'श्यान' प्रत्यय आहे. 'करून श्यान.'

## (८) कांही शब्द

| | |
|---|---|
| कमारा हाळी = नोकर | पा = जवळ प्रत्यय (प्रत्यय); उदा० |
| पोताना = स्वत:चा | बासपा = बापाजवळ |
| हजु = अजून | बोचा = गळा |
| गोळा = चुंबनें | बेस = चांगला |
| केमके = (अव्यय) कारण | वंगये = जवळ; उदा० घरने वंगये =घराजवळ |
| इ = हें | |
| योरत्तार = मित्र | गोठ = गोष्ट |
| अठ = येथे | दीसला = नेहमी |
| धावी = न्हावी | आखू = आणखी |
| मारग = वाट | पेना = मैल |

ही बोली खानदेशी (अहिराणी) बोलीशीं ताडून पाहून हींतील भिन्नता स्पष्ट केली पाहिजे. ठाणे जिल्ह्यांतील काथोडी बोलीशीं हिचें साम्य आहे ('बदलापूर'—कातकरी पाहा.).

ज्ञानेश्वराच्या अभंगांच्या गाथेंत 'वऱ्हाड' या विषयाखाली काही पद्यें दिलीं आहेत (गो. ना. दातारकृत गाथा. प्रकाशक : दामोदर सावळाराम आणि मंडळी, १९०६, पृ. १०१) तीं भिल्ली भाषेंतलीं दिसतात. त्यात मान्हा (माझ्या), त्यान्हा (त्याचा), दिन्हो (दिलें), दिठा (पाहिला), दाखडाव्या (दाखविण्यास), माले (मला), पहुडन्यो (निजलें), लाधन्यो (लाधलें) इत्यादि रूपें या बोलींतील आहेत यात शंका नाही.

बाप दिन्हो ज्या घरीं त्या लेवो नाही । जाति ना कुळ त्यान्हा पालक धरि गयो । तंव तो सूक्ष्म ना स्थूळ ॥ बिहेति बिहेति मी गयो तंव त्यान्हे माले धरे वो हातीं । पाठि मोरावरू बोलख्या त्याने मी बैसे पाठीं ॥ ३०

या पदातील पाठ भारत इतिहास-संशोधक मंडळाच्या त्रैमासिकातील व. ७ अं. १-४ च्या २१० पृष्ठावर दिलेल्या 'वऱ्हाडा'शीं ताडून पाहून शुद्धाशुद्ध ठरवावे लागतील.

गौळणीच्या पदांतूनहि कांही उतारे भिल्ली भाषेचे असतात. मध्वमुनीच्या एका 'गौळणी'चा ध्रुवपद 'अगबाई हाच माझ्या पोशाचा यानयान । त्याने लुटिल्या चावलाच्या गोनयान गो, गवारीगो ॥' असा आहे. यात मारल्यान, तोरल्यान, तारल्यान अशीं भूतकाळी क्रियापदांची रूपें आहेत.

भूतकाळी रूपात येणाऱ्या 'न' प्रत्ययाबद्दल ग्रीयर्सन असें म्हणतो:—It is probably of Dravidian origin The wide use of the न suffix for past time गुजराथी, भिल्ली and खानदेशी (it also occurs in पूर्वहिंदी) may suggest that it is of a different origin from the Aryan suffix ल. It can perhaps sometimes be compared with the suffix न which forms relative participles in तेलगू and other Dravidian forms of speech or with the common suffix in मुंडा languages.

भिल्लाची 'काली प्रजा' (काली परज) द्राविडी वंशातली कीं मुंडा वंशांतील हा वाद मिटलेला नाही. त्याची भाषा राजस्थानी, गुजराती आणि मराठी या तीनहि भाषांशी निगडित झालेली आहे. खानदेशाच्या नैऋत्येकडील भागात विशेषतः नाशिक जिल्ह्यांतील भिल्ली किंवा भिल्लोडी कोंकणी ही मराठीचीच बोली समजली पाहिजे इतका मराठीचा छाप तीव्र आहे.

या विषयाचा आणखी जास्त अभ्यास पाहिजे व ज्यांनी ज्यानी या बोलीसंबंधी भाषाविषयक विचार केला असेल त्यांचीहि मदत पाहिजे. या लेखात नुसतीं कांही टिपणें दिलेलीं आहेत.

चिं. ग. कर्वे, पुणें

---

# कै. श्री. न. बेंडे

एखादीच सुंदर वाङ्मयकृति निर्माण करून रसिकांची उत्सुकता वाढविणारे कांही साहित्यिक असतात. 'बेबी' या नाटकाचे कर्ते श्री. न. बेंडे हे यापैकीच एक होत. त्यांच्या मृत्यूने मराठीतील एका उदयोन्मुख साहित्यिकास आम्ही मुकलों. सहजसुंदर भाषा व साधें तंत्र यांचा आश्रय करून यशस्वी नाटिका लिहिणारे म्हणून कै. बेंडे यांचें नाव मराठी साहित्यांत उच्चारिले जाईल.

# साहित्यिकांचे विचार



## कलेचें कार्य

पुनःप्रत्यय हा कलेच्या निर्माण कार्यातील एक महत्त्वाचा घटक आहे हें खरें, पण नुसता पुनःप्रत्यय म्हणजे मात्र कला नव्हे. मनुष्याचे अनुभव हे इतके मर्यादित असतात की केवळ त्यांच्या पुनःप्रत्ययावरच जर त्याने निर्वाह करण्याचें मनात आणलें तर त्याच्या कलेला वर्गविशिष्ट स्वरूप आपोआप येईल....... कला ही मानवी जीवनाचें नुसतें प्रतिबिंबच दाखवीत नाही, तर त्याला वळण देते. ती मानवी मनाची नुसती करमणूकच करीत नाही, तर त्याला उद्बोधित करिते; व मानवी जीवन नुसतें मंडितच करीत नाही, तर अभिनव ध्येयांच्या प्रभावाने तें आमूलाग्र बदलून टाकते....... वास्तववादाचा अर्थ जर नुसता दिसेल तसें लिहिणें एवढाच असता, तर वर्तमानपत्रांचे बातमीदार उत्तम कादंबरीकार का न होते ! पण प्रस्तावना म्हणजे नुसतें प्रतिबिंब नव्हे; जसें दिसेल तसें रेखाटणें नव्हे. अशा प्रकारच्या कलाहीन वास्तवतेला ललित वाङ्मयांत थारा नाही. कलावंत हा जीवनाचा पुनर्निर्माता असतो, छायाचित्रकार नव्हे. तो वस्तुसृष्टीपासून आपलें साहित्य घेत असला तरी त्याचा उपयोग अपरसृष्टि उत्पन्न करण्यासाठी करीत असतो. किंबहुना निसर्गाची काय किंवा संसाराची काय हुबेहूब अनुकृति न करितां, तो जेव्हा स्वतःच्या कल्पनेनुसार वास्तवाची पुनर्घटना करितो, तेव्हाच त्याच्या कृतीला कलात्मक स्वरूप येते. खरा वास्तववादी हा समाजाची सुधारणा करण्याच्या आंतरिक तळमळीने प्रेरित झालेला असतो; जीवनाच्या प्रगमनशीलतेवर त्याची श्रद्धा असल्यामुळे त्याच्या कुंठित झालेल्या गतीला चालना मिळावी या हेतूने तो वस्तुस्थितीचें चित्रण करितो, व त्यामुळे त्याने रेखाटलेल्या वस्तुचित्राला ध्येयवादाची उज्ज्वल पार्श्वभूमि लाभते. वास्तवतेच्या नावाने जे समाजांत घाण उपसतात, त्याच्या स्तिमित जीवनाचे तितक्याच स्तिमित बुद्धीने वर्णन करीत सुटतात. त्यांना वास्तवतेचा अर्थ आणि कार्य हीं दोन्ही समजलीं नाहीत, असेंच म्हणावें लागतें.......

मराठी ललित लेखकांनी महाराष्ट्राच्या सर्वांगीण पुनर्घटनेला पोषक अशा नवीन क्रांतिकारक तत्त्वज्ञानाचा पुरस्कार केला पाहिजे. आज आपल्या समाजाची स्थिति, ज्यातील साऱ्या इमारती हादरून खिळखिळ्या झाल्या आहेत पण पुरत्या पडलेल्या नाहीत, अशा भूकंपाने उद्ध्वस्त झालेल्या शहरासारखी आहे. अशा स्थितींत नुसत्या डागडुजीने भागणार नाही; तर आमूलाग्र पुनर्घटनाच केली पाहिजे. आणि ती करितांना समाजवादाच्या कांही तत्त्वांचा तरी अवलंब केल्याविना गत्यंतर नाही....... राष्ट्रीय विप्लवाच्या काळात ज्याच्या हातीं जे साधन असेल, त्याचा उपयोग राष्ट्राच्या उन्नतीसाठी करणें हे त्याचें पहिलें कर्तव्य आहे. मानवजातीच्या आयुष्यक्रमात जीं अभिनव सामर्थ्यें आज क्रांति घडवून आणीत आहेत, त्यांची ओळख मराठी ललित लेखकांनी स्वतः करून घेतली पाहिजे व बहुजनसमाजालाहि करून दिली पाहिजे. एवढी कामगिरी जरी त्यांनी केली, तरी महाराष्ट्राच्या पुनर्घटनेला, त्याच्या राष्ट्रीय पुनर्जन्माला यांनी मोठाच हातभार लावला असें होईल आणि त्यांतच खरोखरी त्यांच्या सृजनशक्तीचें

साफल्य आहे. कारण, कला ही कलेसाठी नाही, तर माणसासाठी आहे. प्रगतीच्या खडतर मार्गावर मानवजातीचें साहचर्य करण्यासाठी आहे.

ग. त्र्यं. माडखोलकर

७।६।३७ महेश्वर

( मध्यभारतीय मराठी साहित्य-संम्मेलन; अध्यक्षीय भाषण )

## वाङ्मयानंदाची उपपत्ति

दरेक मनुष्याचा नेहमीचा स्वभाव जरी एक ठराविक प्रकारचा असला तरी प्रसंग-विशेषीं त्याला अन्य प्रकारचा अनुभव व भावनाहि होऊ शकतात; त्या अनुभवाला व त्या भावनांना कोठेतरी तोंड फुटावें, असें त्याला वाटत असतें. ही अनुभवव्यक्तीची इच्छा मनुष्यांत कधी कधी फार प्रबळ होते. परंतु स्वतःला तसें करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळे दुसऱ्या एखाद्याने तो अनुभव चांगल्या रीतीने व सुंदर शब्दांनी व्यक्त केला, तर त्याला फार आनंद होतो.

मनुष्यमात्र सत्याभिलाषी असून आपला अनुभव व्यक्त करण्यासाठी आतुर असतो. प्रेमविषयक बावर्तीत व कलाकृतींत, लोभांत व राजकारणांत, श्रमांत व खेळांत आपल्या अंतःकरणातील सुखदुःखकारक रहस्य व्यक्त करण्याची तळमळ त्याला लागते. वस्तुतः कोणाहि मनुष्याचा अर्धा भाग म्हणजे तो स्वतः असून, त्याचा दुसरा अर्धा भाग म्हणजे त्याच्या भावनांची अभिव्यक्ति होय. अशी स्थिति असल्याने वाङ्मयात उतरलेली ही स्वतःच्या अनुभवाची प्रतिकृति आनंदकारक होते हें या आनंदप्राप्तीचें मूळ होय.

येणेंप्रमाणे वाङ्मयानंदाची ही उपपत्ति सांगितल्यावर उल्लेख करण्याचा एकच प्रश्न राहतो. तो हा कीं, मनुष्याच्या ज्या विचारविकाराची व्यक्ति वाङ्मयांत झाल्याने त्याला आनंद होतो, ते विचारविकारहि परिस्थित्यनुरूप व समाजस्थित्यनुरूप बदलत असल्यामुळे ज्या प्रकारच्या वाङ्मयापासून एका काळांतील लोकांना आनंद होत होता, त्या प्रकारापासून अन्य काळांत होत नाही, म्हणजे वाङ्मय व युगधर्म यांत एक प्रकारचा निकट संबंध असतो. तो न समजला तर वाङ्मयानंदाची पुरी कल्पना आपल्याला आली असें म्हणतां येणार नाही. यासाठी सांप्रत आपल्या वाङ्मयात जें सामाजिक स्थित्यंतर झालें आहे त्यामुळे कोणते नवीन युगधर्मप्रवर्तक झाले आहेत त्यांचें ज्ञान आपण करून घेतलें पाहिजे.

दा. ना. आपटे

१५-८-३७ मुंबई

(मराठी ग्रंथ संग्रहालय, ३८ वा वार्षिकोत्सव. अध्यक्षीय भाषण)

## मतप्रसार व वाङ्मय

वाङ्मय आणि नियतकालिकें याचा अर्वाचीन काळांतील जन्यजनकभावासारखा निकट संबंध ध्यानांत आणल्यास मतप्रसाराकरिता वाङ्मयकलेचा उपयोग करावा कीं न करावा, तसा उपयोग होतो कीं न होतो, याचा आपोआपच खुलासा घडतो. वाङ्मय ही कला आहे खरी, परंतु ती निरपेक्ष स्वरूपाची नाही. वाङ्मय हें जीवनाचें प्रतिबिंब मानण्याचें तत्त्व सर्वमान्य आहे. जीवनांतील आशा, आकांक्षा, भावना एखाद्या मनुष्याच्या हृदयांत स्फुरण घेऊन शब्दव्यापारांनी व्यक्त झाल्या म्हणजे त्या शब्दसृष्टीला वाङ्मय म्हणतात. शब्दसृष्टीच्या विधात्याच्या अंतरंगांत स्फुरणाऱ्या आशा-आकांक्षा-भावना जर मानवी जीविताच्या अनुभवांशी

खिळलेल्या असतात, नव्हे त्या अनुभवाचें एकप्रकारें रूपच असतात, तर त्याना अगदी निरपेक्ष समजून कसें चालेल ? त्या निरपेक्ष नसतात याची खात्री आगरकर, आपटे, कोल्हटकर यांच्या वाङ्मयाच्या अभ्यासाने सहज पटते. आगरकरानी व्यक्त केलेल्या समाजसुधारणेच्या कल्पना आपट्यांनी आपल्या कादंबऱ्यांतून सुकुमारतेने त्या कल्पनांस भिन्न भिन्न व्यक्तींचें रूप देऊन दाखविलेल्या नाहीत काय ! याला मतप्रसारार्थ कलेचा उपयोग केला असें म्हटल्यास त्यांत गुन्हा कसला !

स्त्रियाना आर्थिक स्वातंत्र्य पाहिजे, आचारस्वातंत्र्य पाहिजे, हा विचार हिंदुस्थानांत एका शतकाइतका जुना आहे आज तो विचार अगदी कसलाच आडपडदा न ठेवतां प्रकट होऊं लागला आहे. जाती मोडल्या पाहिजेत ही विचारसरणी नवी नाही. तिला सांप्रत वाङ्मयामध्ये उत्कटता आलेली आहे. गरिबाचा कैवार हा शेतकऱ्याच्या अनुषंगाने हिंदी राजकारणांत देशभक्तीचा आधारस्तंभ होता. आता तो शेतकऱ्याच्या जोडीला मजूरवर्गाला बसवून अधिक भक्कम व विस्तृत होऊं पाहत आहे. हे सगळे जुने विषय हल्ली नव्या कर्णकटु आवाजाने वाचाळता करीत आहेत. परंतु त्याबद्दल भय प्रदर्शित केलें जात असतें. प्रस्तुत वाचाळतेने स्वसमर्थनार्थ जे तत्त्वज्ञान उदयास आणलें आहे तें मात्र टीकास्पद आहे.

श्री. न. र. फाटक

२१–८–३७ अमरावती ( विदर्भ-साहित्य-संघ परिषद्. अध्यक्षीय भाषण )

## रसग्रहण

सम्यक्[1]वृत्ति आणि सम्यक्[2]दर्शन ह्यांतूनच सम्यक्[3]ज्ञानाचा उद्भव होतो. सम्यक्वृत्ति, सम्यक्दर्शन असल्याशिवाय सम्यक्ज्ञान होणें शक्य नाही. हें जरी खरें असलें तरी सम्यक्ज्ञान या शब्दाला वेगळी अर्थव्याप्तीहि आहे. वाङ्मयाचा अभ्यास म्हणजे गादीवर पडल्या-पडल्या स्वतःचें मनरंजन करीत वेळ घालविण्याचा व्यवसाय नव्हे. तो ग्रंथकाराचें हृद्गत समजून घेण्याचा बुद्धि-सर्वस्वें केलेला यत्न होय. त्याच वाङ्मयकृतीसंबंधी एक "आपल्याला यातलें काही समजत नाही बुवा !" असें म्हणतो, तर दुसरा "किती सुंदर कृति आहे ही !" असें म्हणून आनंदाने उत्फुल्ल होतो. असे प्रकार प्रत्यहीं कां घडतात ! कारण वाङ्मयकृतींचें रहस्य समजण्यास बुद्धिमत्तेची तयारी, साहित्यिक संकेताशीं परिचय, संस्कारग्राही हृदय व सहानुकंप उत्पन्न करून घेण्याइतकी हृदयानुभवांची विविधता आवश्यक असते. बुद्धीइतकीच कल्पनेची तरळता व हृदयाची संस्कारक्षमता अवश्य असते. साहित्यकृतींच्या उत्तमत्वाचा उमज होत नाही व त्याचें रसग्रहण करता येत नाही ह्याचें कारण पुष्कळ वेळा अनुभवदारिद्र्य हेंही असू शकेल. बुद्धीने ग्रहण करून हृदयाने अनुभविल्याशिवाय साहित्यकृतींचें रहस्य समजूं शकत नाही.......

साहित्यपरंपरा म्हणजे तरी काय ? इतर कोणत्याहि परंपरेसारखीच तीहि एक आहे. परंपरेच्या पोटांत शिरून तुम्ही पाहाल तर ती फार भली आणि उदारहि आहे असें तुम्हांस कळून येईल. आज जी काव्याची आवड तुमच्यात आहे ती तिनेच उत्पन्न केली आहे. "आडगुळं

1 Proper attitude. 2 Proper perspective. 3 Proper understanding.

मद्दगुलं सोन्याचं कडगुलं" असें गीत गाऊन तिनेच तुम्हाला काव्यातील आंदोलनाची अस्पष्ट जाणीव लहानपणीं करून दिली. आज छंदाची व तालाची मनःसंवेदना तिनेच तुम्हांला दिलली आहे. आज जे कविसंकेत आपण प्रत्यहीं वापरतों ते तिनेच उत्पन्न करून जतन केलेले आहेत. एवढेंच काय, पण खुद्द नवप्रयोगाना सुद्धा आपली साधनसामग्री आणि उपकरणीं परंपरेच्या भांडारातून मिळवावीं लागतात. अभावात नव्याला वाव असूं शकत नाही. आणि कोणत्याहि कवीला "मुळीच नाही"तून "नवीन काही" बनवता येत नाही. साकल्याने विचार केला तर परंपरा ही अनुभवाचें आगर, समाजाची स्थिर प्रकृति, नव्याचा निकष आणि प्रयोगाची प्रच्छन्न प्रेरक आहे असेंच आपणास म्हणावें लागेल......

परंपरेशीं वागण्याच्या तीन तऱ्हेच्या वृत्तीवरून साहित्यिकाचे तीन प्रकार बनतात. पहिला प्रकार, जे परंपरेला अनन्यभावें करून शरण जाऊन तिच्या आज्ञेनेच सदैव विनम्रपणें वागत असतात त्यांचा. वाङ्मयात यांचें काहीच महत्त्व नसतें. त्यांच्या कृतींची उपेक्षा होते तीहि योग्यच असते. कीर्ति त्यांच्या वाट्याला येत नाही आणि अपकीर्ति त्यांच्या वाटेस जात नाही. वर्तमानकालातील निरनिराळ्या शक्तींच्या संघर्षांत हे आपले तटस्थ असतात. कलेस घातलेल्या मर्यादांतून बाहेर पडण्यासाठी चाललेल्या सीमाप्रांतातील बंडाळीची नुसती बातमीच वाचून त्यांना कापरें भरतें. अशांची विचारपूस नित्य नवचैतन्याचा वर्तमान काल कशाला करील ? परंपरेचें महत्त्व ओळखून तिचा योग्य तेथे स्वीकार करणारे, पण त्या स्वीकारातच तिजवर नवीन संस्कार करणारे, आणि हळू हळू तिचे रूप पालटवून तिचा नव-अवतार प्रकटविणारे असे जे साहित्यिक त्यांचा दुसरा प्रकार. आणि तिसरा प्रकार परंपरेला पुरून पुढे सरसावणाऱ्या पुरोगाम्यांचा. पारंपरिक पंथमार्ग सोडून जाणारे हेच नवीं खंडे शोधून काढतात आणि वाङ्मयजगाचा विस्तार वाढवितात.

## आग्रह का उद्भवतो ?

ही वेळ नवसाहित्याविषयीं काटेकोरपणा करीत बसण्याची नसून, त्या साहित्याचा जोमदार व धडाडीचा पुरस्कार करून साहित्यविषयीच्या जुनाट व बुरसट कल्पनांवर हल्ला चढविण्याची आहे असें प्रतिपादन आग्रहाने करणारा पक्ष तरुण मंडळींत आहे हे मी जाणून आहे. हा आग्रही पक्ष का निर्माण होतो त्याचीं कारणेंहि चिंत्य आहेत. जुन्या संतवाङ्मयाच्या भक्तिरसगंगेंत भाविकपणे त्रिकाल अवगाहन करून व त्यातील तत्त्वज्ञानाचे टिळे लावून संतकवींचीं नावें घेत स्मरणीची माळा ओढीत, देहू-आळंदीच्या साहित्यमंदिरातील अंधाऱ्या गाभाऱ्यातील कुंद वातावरणात सदैव राहून, आजकालच्या साहित्यसृष्टीकडे मंदपणें पाहणारे विचारवृद्ध वेळीं अवेळीं नवसाहित्याची जी कुत्सित हेटाळणी करतात ती ऐकून एखाद्या नवविचाराने भारलेल्या तरुणाचा तोल जाऊन तो नव्याचा आग्रही प्रचारक बनला तर त्यात नवल नाही.

आ. रा. देशपांडे

२७।८।१९३७ बडोदा (महाराष्ट्रशारदामंडळाच्या चतुर्थ-अधिवेशनातील अध्यक्षीय भाषण)

## पुनर्घटनेचे प्रभावी साधन

मराठी साहित्याकडे पाहिलें तर राष्ट्रीय किंवा सामाजिक पुनर्घटनेच्या प्रचंड उद्योगात मराठी वाङ्मय अत्यंत अंगचुकारपणा करीत आहे असें आढळून येईल. किंबहुना बाह्य जगात होत असलेल्या आमूलाग्र क्रांतीची किंवा बदलाची जाणीवहि मराठी साहित्यिकांना आहे किंवा काय याची पुष्कळ वेळां शंका येते. जीवनाच्या प्रत्येक प्रांतात नावीन्य व आधुनिकता आण-

ण्याचा आटोकाट प्रयत्न चाललेला दिसून येतो तर मराठी साहित्यिक रिप व्हॅन विंकलप्रमाणे पाय तणावून खुशाल घोरत पडले आहेत असें वाटतें.......

आजच्या जगाकडे पाहण्याची संवय वाचकांना लावणें हें साहित्यिकाचें कर्तव्य आहे. तथापि चालू घटकेच्या आयुष्याकडे जागरूकपणें बघण्याची साहित्यिकाची तयारीच नाही. त्यापेक्षा गणपतीच्या उत्सवांत मेळ्यांतून म्हटल्या जाणाऱ्या काव्यात सामाजिकदृष्ट्या अधिक जिवंतपणा आहे असें म्हणावे लागतें. त्याची रचना अत्यंत गैंगरूळ व अस्ताव्यस्त असेल. छंद-शास्त्राच्या दृष्टीने त्याच्यात शेकडो चुका असतील पण समाजाच्या राजकीय, धार्मिक किंवा सांस्कृतिक जीवनाचे पडसाद त्याच्यातून जोरदारपणें उमटलेले आढळतील. 'आई बघ हा माझा बाळ! पाहीं तुझा गोपाळ' या गाण्याने समाजात जेवढी खळबळ उडवली असेल तेवढी कोठल्याहि भावगीताने उडवलेली नाही. 'चालरीत सारी गेली, नित्य नवी सोंगे आलीं!' या गाण्यात सुधारणेवर जरी प्रखर हल्ला होता तरी नवीन संस्कृतीला प्रतिकार करणाऱ्या समाजाची खरीखुरी धडपड त्यात व्यक्त झालेली होती. श्री. तात्यासाहेब केळकराच्या 'वाज, वाज घंटिके' या दोनच ओळींच्या काव्यात जेवढा जिवंतपणा आहे तेवढा 'घंटा' या विषयावर शेकडो कवींनी कितीहि छंदोबद्ध 'शंख' केला तरी येऊं शकणार नाही! समाजाच्या धडपडीचे, समाजाच्या जीवनाचे प्रतिध्वनि वाङ्मयात उमटल्याशिवाय वाङ्मयात जिवंतपणा येऊं शकणार नाही. किंवा सामाजिक पुनर्घटनेचे प्रत्यक्ष साधन म्हणून त्याला महत्त्व प्राप्त होणार नाही. तात्कालिक महत्त्वाच्या गोष्टींचे प्रतिबिंब वाङ्मयात उमटल्यास तें वाङ्मय तात्कालिक महत्त्वाचे म्हणजे अल्पजीवी होईल असें भय बाळगण्याचें कारण नाही. शेकडो वर्षे टिकणारे अभिजात वाङ्मय निर्माण करण्याच्या इर्षेला चढून टिकाऊ वाङ्मय निर्माण होऊं शकत नाही. सामाजिक जीवनातील अत्यंत क्षुद्र किंवा उपेक्षणीय गोष्ट ही समाजावर दीर्घ काल परिणाम करणारी ठरते. टिकाऊ वाङ्मयासंबंधीच्या पारंपारिक कल्पनाहि आपणाला बदलावयाला पाहिजेत. समाजघटनेच्या त्या त्या वेळेच्या सामाजिक घटनेच्या कार्यात वाङ्मयाने यशस्वी रीतीने भाग घेतल्यानंतर तें मागाहून जगूं शकेल किंवा नाही या गोष्टीला महत्त्व नाही!

प्र. के. अत्रे

२-१०-३७ सोलापूर (जिल्हासाहित्यसंमेलन भाषण)

आपल्या भोवतालच्या समाजाविषयी जे उदासीन असतात—चालू युगातील घडामोडींत ज्याना कांही स्वारस्य वाटत नाही, रोजच्या जीवनातील महत्त्वाच्या प्रश्नाबद्दल ज्याना जिव्हाळा नाही ते सार्वत्रिक व सर्वकालीन असें वाङ्मय कसें निर्माण करू शकणार! साहित्य-निर्मात्याला जितकी सौन्दर्यबुद्धीची आवश्यकता आहे तितकीच ॲर्नोल्ड बेनेटच्या मताप्रमाणे विश्वव्यापी सहानुभूतीचीहि आहे (The Author's Craft). केवळ खुसखुशीत गोष्टी गुळगुळीत भाषेंत नटवून थिल्लर वाङ्मय निर्माण करणाऱ्याचे व्यक्तिमत्व कितीसे मोठे असणार! मानवजातीविषयीची वाटणारी तळमळ, 'जे रंजले गांजले' असतील त्याच्याविषयींची दयार्द्रबुद्धि, दीन-दुबळे, अज्ञानी, पापी, दरिद्री, दुःखी-कष्टी याच्याबद्दलची कळकळ किंवा थोडक्यात सांगावयाचें म्हणजे जी ही विश्वव्यापी सहानुभूति ती मोठ्या व्यक्तिमत्वाचें अचुक गमक आहे.

२-१०-३७ पं. मा. कामतकर

(सोलापूर जिल्हा साहित्यसम्मेलन स्वागतभाषण)

## भाषाशुद्धि

मराठी भाषेंत जुने जे शब्द आहेत ते न मारतां जरूर तेवढे नवे शब्द आणण्यास आम्हा भाषाशुद्धीवाल्यांचा विरोध नाही. परंतु आपल्या भाषेंतील शब्द मारून जे परभाषेंतील शब्द त्यांची जागा धरून बसले आहेत त्यांचें उच्चाटण करून त्या जागीं पुनः आपल्या जुन्या शब्दांची प्रतिष्ठापना करणें किंवा त्याऐवजीं संस्कृतोद्भव शब्द योजणें हें आमच्या चळवळीचें खरें ध्येय आहे. जे शब्द आमच्या भाषेत नाहीत ते त्या वस्तूबरोबर आले व आपल्या भाषेच्या धाटणीला धरून असले तर ते स्वीकारण्यास आमचा प्रत्यवाय नाही. पण आमचे शब्द मारणारे जे परके शब्द आहेत ते परके म्हणून तर नकोच पण परके शब्द आमच्या पराजयाचें चिन्ह म्हणून येतात ते आम्हांस नकोत.

२६–६–३७

वि. दा. सावरकर
(पुणें येथील भाषण)

## हिंदी व मराठी

हिंदी ही राष्ट्रभाषा झाल्याने मराठीचे काही फायदे होणारे आहेत काय ! असल्यास तुम्हीं त्याचें थोडक्यात दिग्दर्शन करावें. इंग्रजी भाषेप्रमाणे आमच्या ज्ञानात अधिक भर घालण्याइतकें हिंदी साहित्य मौल्यवान आहे असें समजण्यात येत नाही. फार काय, दुसऱ्या कोणत्याहि देशी भाषेच्या तोंडाकडे पाहण्याचें कारण नाही इतकी आमची मराठी भाषा सुदृढ व गुरुस्वरूप आहे याबद्दल आम्हाला अभिमान वाटतो. परकीय सत्ता आपल्या संस्कृतीचा प्रसार करण्यासाठी आपली भाषाहि परकीयांवर लादीत असते. इंग्रजीनीहि तेंच केलें. संस्कृतिप्रचारासाठीं हिंदीचा उपयोग आम्हा मराठ्यांपुरता तरी काही होणार नाही.

गो. गो. अधिकारी
(श्री. कालेलकरांस पत्र)

आम्हांला कोणत्याहि भाषेचा अभिनिवेश नाही. जनतेचा व्यवहार, जनतेचें शिक्षण आणि जनतेची सेवा जनतेच्या भाषेतच झाली पाहिजे आणि सर्व राष्ट्रांमध्ये परस्परव्यवहारासाठीं सर्वसामान्य भाषा असली पाहिजे, येवढ्या दोन स्वाभाविक तत्त्वांत आमचें सर्व धोरण येऊन जातें. लहानसहान बोलींना स्वतंत्र भाषा म्हणून पुढे करून भाषेची बजबजपुरी करण्याचा जोवर कोणी प्रयत्न करणार नाही, तोपर्यंत भाषेच्या बाबतींत कोणालाच असंतुष्ट होण्याचें कारण नाही. मराठी भाल्याच्या जोरावर अटकेपर्यंत जरीपटका घेऊन जाणाऱ्या मराठ्यांचे आम्ही वंशज आहोंत. आम्हीं मराठीला राष्ट्रभाषा करण्याचा प्रयत्न का करूं नये, असें म्हणणारे लोकहि मला भेटले आहेत. प्रस्तुत पत्रलेखकहि 'हिंदुपदपातशाहीबरोबर मराठीहि हिंदुस्थानची राष्ट्रभाषा व्हावी अशी उमेद आमच्या शूर पूर्वजांनी काय बाळगली नसेल !' असा प्रश्न करून ही गोष्ट दूरची आहे म्हणून सोडून देतात. केवळ महाराष्ट्रालाच परप्रांतानें आक्रमण नको आणि इतर प्रांतांना शूर मराठ्यांचें आक्रमण इष्ट वाटतें असें तर समजायचें नाही ना ! दुसऱ्यावर आक्रमण करण्याची हांव बाळगणें आणि नेहमी जेथे तेथे दुसऱ्याच्या आक्रमणाची भीति बाळगणें हें कशाचें लक्षण आहे !

मराठ्यांच्या हिंदुपदपातशाहीचा आदर्श नेहमी चघळत राहिल्याने हिंदुस्थानच्या सर्व प्रांतांना आपण आपलेसे करूं कीं त्यांना दूर लोटूं याचा आपण विचार केला पाहिजे. आज कोणालाहि महाराष्ट्रासंबंधाने तशी भीति वाटत नसल्यामुळे, कदाचित् फारसें नुकसान होणार नाही.

महाराष्ट्रापुरता सर्व व्यवहार मराठींतच चालावा. महाराष्ट्रांतील हिंदु, मुसलमान, पारशी, यहुदी, खिस्ती या सर्वांना मराठी आपली मायबोली आहे असें वाटावें असेंच आपलें धोरण असलें पाहिजे.

काका कालेलकर
(श्री. अधिकाऱ्यांस उत्तर)

---

# परीक्षण

**क्षितिजावर** [कवि: दत्तप्रसन्न कारखानीस यांचा कवनसंग्रह; प्रकाशिका: सौ. उषा जोशी (रुईकर), दादर; मूल्य १ रुपाया].

हा कवीच्या बारा वर्षांतील (१९२३-१९३५) निवडक कवितांचा संग्रह दिसतो. प्रि. प्रल्हाद केशव अत्रे यांची या संग्रहाला विशेष गुणग्राहक अशी प्रस्तावना आहे. कवीच्या अंगीं बऱ्यापैकी कवित्व आहे. शृंगारिक कवितांत 'गोड अबोला' ही कविता उत्कृष्ट आहे. प्रचलित विचारसरणीविरुद्ध वाद लढविण्याची कवीला आवड दिसते आणि अशा वादांत त्यांची कल्पनाशक्ति चांगली उठावून दिसते. 'पडद्याआड', 'निप्रेम', 'कावळा' आणि '[illegible] पोपटास' या कविता या दृष्टीने संस्मरणीय आहेत. परंतु अशा कुतूहलजनक विचारसरणींतहि असंभाव्यता भासली तर कृत्रिमतेचा वास येऊ लागून रसहानि होते. 'समाज', 'औरंगजेब आणि शिवाजी', 'कटु सत्य' इत्यादि कविता या दृष्टीने पाहतां दूषित आहेत. 'कार्याय तस्मै नमः' हें नांव ज्या कवितेला देण्यात आलें आहे ती कविता एकंदरीने चांगली असली तरी शेवटल्या चरणांतील निदान चुकीचें असल्याने विरस करिते. सांप्रत किल्लेदार होता येणार नाही, पण नव्या स्वराज्याच्या लढ्यात भाग घेऊन कीर्ति संपादितां आली नसती असें नाही.

भाषेच्या शुद्धपणाकडे मात्र कवीने अक्षम्य दुर्लक्ष केलें आहे. 'दीपजीवित' ही कविता चांगली आहे, पण भाषेच्या दृष्टीने पुढील श्लोक पहा —

तिग्मान्धकारिं बुडुनी जग जाइ जेव्हा
साहाय्य त्यास करण्यास्तव येसि तेव्हा;
आपत्तिग्रस्त सुहृदां करणें सहाय्य
दीपा, न हा गुण बरें तव सान होय (पृ. ३२)

तिग्म या अपरिचित शब्दाचा अर्थ तीक्ष्ण, प्रखर असा आहे. हें विशेषण प्रकाशाला लावितात, अन्धकाराला नाही. कोश पाहण्याची सवय कवीने ठेवावी हें बरें. सहाय्य हें रूप चुकीचें आहे. पुन्हा 'आपत्तिग्रस्त' येथे तिसऱ्या अक्षरावर छन्दोभङ्ग होतो. अशुद्धता ही उद्वेगजनक होते हें कवींनी विसरूं नये. आधी कविता निर्दोष पाहिजे, मग तींत रमणीय अर्थ पाहिजे म्हणजे ती सरस आपोआप वठते.

मा. प.

# वाङ्मयवार्ता



| | |
|---|---|
| ७ जून १९३७ | महेश्वर येथे मध्यभारतीय साहित्यसंमेलन, अधिवेशन ४ थें. अध्यक्ष श्री. ग. त्र्य. माडखोलकर. |
| १२ जून १९३७ | मुंबई येथे ग्रंथसंपादक व ग्रंथप्रकाशक मंडळीचा ४१ व्या वर्षाचा त्रैवार्षिक समारंभ. अध्यक्ष औंधकर पंतप्रतिनिधि. |
| २५ जून १९३७ | प्रख्यात साहित्यिक श्री. वि. दा. सावरकर यांची स्थानबद्धतेतून मुक्तता. |
| ६ जुलै १९३७ | पुणें येथे प. वा. डॉ. सर रामकृष्ण भांडारकर यांचा जन्म-भांडारकर प्राच्य विद्यासंशोधनमंदिरात शताब्दिदिन. अध्यक्ष डॉ. कूर्तकोटी. |
| ११ जुलै १९३७ | पुणे येथे मराठीकरणमण्डळाची स्थापना. अध्यक्ष श्री. ल. ब. भोपटकर, चिटणीस श्री. प्र. के. अत्रे. |
| १८ जुलै १९३७ | पुणे मराठी ग्रंथसंग्रहालयाचा रौप्यमहोत्सव. अध्यक्ष ना. जमनादास मेहता. |
| जुलै १९३७ | बेबी नाटिकेचे कर्ते श्री. श्रीपाद नरसिंह बेंडे याचे पायरी (है. सं.) येथे निधन. |
| ३ आगस्ट १९३७ | प्रा. श्री. नी. चाफेकर याची षष्ठ्यब्दिपूर्ति. |
| ६ आगस्ट १९३७ | आक्षिप्त वाङ्मयावरील बंदी उठविण्याची विनंती करण्याकरता मुंबईचे प्रधान मंत्री ना. बा. गं. खेर याना मुंबई मराठी साहित्य संघ शिष्टमंडळाची प्रत्यक्ष मागणी. नेते श्री. ना. म. जोशी. सदस्य श्री. न. चिं. केळकर, वा. म. जोशी, द. आ. तुळजापूरकर, प्रा. मा. दा. आळतेकर, श्री. श्री. म. वर्दे, लालजी पेंडसे, डॉ. अ. ना. भालेराव. |
| १५ आगस्ट १९३७ | मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय ३८ वा वार्षिक समारंभ. अध्यक्ष श्री. दाजी नागेश आपटे (बडोदें). |
| १८ आगस्ट १९३७ | मुंबई प्रांन्तांत भाषावार विद्यापीठें स्थापण्यास मुंबई विद्यापीठाची संमति. |
| २१ आगस्ट १९३७ | उमरावती येथे विदर्भ साहित्यसंघपरिषद्. अधिवेशनाचें उद्घाटन, मध्यप्रान्ताचे प्रधानमंत्री ना. डॉ. खरे याचे हस्तें. अध्यक्ष प्रा. न. र. फाटक (मुंबई). |
| २७ आगस्ट १९३७ | बडोदें महाराष्ट्र शारदामंडळाचें अधिवेशन ४ थें. अध्यक्ष श्री. आ. रा. देशपांडे (नागपूर). |
| सप्टेंबर १९३७ | श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचें 'मध्ययुगीन भारतकोश' या ग्रंथसंपादनाबद्दल पुणें येथे अभिनंदन. |

| | |
|---|---|
| १६ सप्टेंबर १९३७ | न्या. मू. मु. रा. जयकर यांचे नेतृत्वाखाली महाराष्ट्र विद्यापीठ मंडळाच्या शिष्टमंडळाचा पुणें येथे प्रधान मंत्री ना. खेर यांच्याशीं विचारविनिमय. सदस्य श्री. न. चिं. केळकर, भ. रा. गाडगीळ, प्रि. खाड्ये, प्रि. महाजनी, प्रि. धारपुरे, प्रा. सौ. कर्वे, रा. ब. डॉ. नायडू, प्रा. कपाडिया, खा. ब. सरफराजखां. |
| १ आक्टोबर १९३७ | हैद्राबाद येथे निजामराज्य मराठी साहित्यसंमेलन. अध्यक्ष श्री. बा. ग. खापर्डे, माजी मंत्री, मध्यप्रान्त. |
| २ आक्टोबर १९३७ | सोलापूर जिल्हा साहित्य संमेलन. अध्यक्ष श्री. प्र. के. अत्रे. |

# संलग्नसंस्थावृत्त

साहित्यसेवामंडळ, इचलकरंजीः -- १९३६-३७ चा वृत्तान्त. या सालाकरिता खालीलप्रमाणे कार्यकारी मंडळ निवडण्यात आलें:—

अध्यक्ष—रा. सा. गो. रा. चोळकर, उपाध्यक्ष—नि. स. जोशी, कार्यवाह--रा. न. रा. कुलकर्णी व रा. र. रा. भांबे, सभासद--रा. ग. बा. कोळेकर, आयव्ययपत्रकनिरीक्षक -रा. बा. चं. लगारे.

या सालीं मंडळाचे वतीने एकूण साहित्यविषयक आठ कार्यक्रम झाले. यापैकी उल्लेखनीय म्हणजे 'विडंबनाची अनिष्ट प्रथा', 'जळगाव साहित्यसंमेलन', 'साहित्य आणि जीवन' यावरील व्याख्यानें व चर्चा; याशिवाय विष्णुशास्त्री पंडित याचा सत्कारसमारंभ व काही काव्यगायनाचेंहि कार्यक्रम करण्यात आले.

सन १९३७-३८ या सालाकरिता आयव्ययपत्रकनिरीक्षकाच्या जागीं रा. गो. चिं. केळकर याची नेमणूक होऊन या सालासाठी मागील कार्यकारी मंडळ पुन्हा कायम करण्यात आलें.

## विश्वविद्यालयें : मराठी अभ्यासक

### नागपूर (पीएच. डी.)

| अभ्यासक | विषय |
|---|---|
| १ शं. दा. पेंडसे, एम्.ए., एम्.ओ.एल्. | ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान. |
| २ श्री. वि. घ. देशपांडे, एम्.ए. | मराठीचें मूळ. |

# परिषद्वार्ता



**कार्यकारी मंडळ—**

सप्टेंबरच्या १९ तारखेस भरलेल्या सभेंत कै. जयकृष्ण केशव उपाध्ये यांच्या खेदजनक मृत्यूविषयी खालील ठराव करण्यांत आला:—

'नागपूरचे प्रसिद्ध मराठी कवि व साहित्यभक्त श्री. जयकृष्ण केशव उपाध्ये यांच्या अकालीं निधनामुळे मराठी साहित्याची हानि झाली असून त्याबद्दल परिषदेस दुःख होत आहे.'

याच सभेंत मध्यप्रांत शाखा-सभेच्या घटनेचा खर्डा मान्य करण्यांत आला व बंगळूर येथील महाराष्ट्र मंडळास संलग्न संस्था म्हणून मान्यता देण्यात आली. साहित्यपत्रिकेच्या पहिल्या आठ वर्षांच्या बांधलेल्या पुस्तकांची किंमत प्रत्येक पुस्तकास रु. ४ अशी ठेवण्यांत आली; परंतु सभासदांस तीं अर्ध्या किंमतींत द्यावीं असेंहि ठरविण्यांत आलें.

**इतर—**

सप्टेंबरच्या १२ तारखेस परिषदेच्या कार्यालयांत मुंबईचे प्रसिद्ध विद्वान् श्री. पा. वा. काणे यांचें यूरोपच्या प्रवासासंबंधी उद्बोधक भाषण झालें.

दादरचे दानशूर डॉ. म्हसकर यांनी मराठी साहित्याच्या अभिवृद्ध्यर्थ परिषदेच्या इमारत-निधीस रु. ५०० ची देणगी दिली. नाशिक, मुंबई व हैदराबाद येथे उत्तम प्रचारकार्य झालें. मुंबईस ५ व हैदराबादेस १३ आजीव सभासद झाले. निरनिराळ्या भागात शाखासभा स्थापन करण्याची योजना होत आहे. व्याकरणसमितीच्या सभा नियमाने परिषदेच्या कार्यालयात भरविण्यांत येत आहेत.

## मध्यप्रान्त शाखा सभावृत्त

परिषदेने केलेल्या शाखासभेच्या घटनेप्रमाणे मध्यप्रान्त शाखासभेच्या निवडणुकी करण्यांत आल्या. खालीलप्रमाणे कार्यकारी मंडळ निवडून आलें:—

**अध्यक्ष**– प्रा. नारायण केशव बेहेरे.

**उपाध्यक्ष**– प्रा. शंकर दामोदर पेंडसे व प्रा. सौ. कुसुमावती देशपाडे.

**खजिनदार**– प्रा. डॉ. विश्वनाथ नारायण यत्ते

**जोडचिटणीस**– श्री. विष्णु घनश्याम देशपाडे व श्री. पुरुषोत्तम भास्कर भावे.

**सभासद**– श्री. केशव विश्वनाथ फणसे, प्रा. यादव मुकुंद पाठक, सौ. यमुनादेवी शहाणे, प्रा. दिगंबर काशीनाथ गर्दे, श्री. शरच्चंद्र वामन रानडे, श्री. विष्णु महादेव अत्रे, डॉ. लक्ष्मण जानराव कोकर्डेकर.

## परिषदेचे नवीन सभासद

१ श्री. काशीनाथ सखाराम दाडेकर, नाशिक
२ डॉ. विश्वनाथ बळवंत आठवले, ,,
३ श्री. विनायक पंढरीनाथ साठये, ,,
४ ,, सखाराम काशीनाथ आगाशे, ,,
५ ,, वामन श्रीधर पुरोहित, ,,
६ ,, नारायण हरि बर्वे, ,,
७ डॉ. अनंत वामन वर्टी नाशिक
८ प्रो. गोविंद विनायक देवस्थळी ,,
९ प्रि. त्रिंबक आपाजी कुळकर्णी ,,
१० श्री. नीळकंठ कृष्ण द्रवीड, ,,
११ ,, प्रभाकर अनंत मोडक, ,,
१२ ,, जगन्नाथ बलवंत कुमठेकर, ,,

१३ ले. सीताराम वासुदेव फडणीस, नाशिक
१४ श्री बकुल नीलकंठ बढे, ,,
१५ ,, शिवराम लक्ष्मण ओगले, ,,
१६ ,, माधव गोविंद दवंडे, ,,
१७ प्रो. नळिकंठ सदाशिव ताकखाव, ,,
१८ श्री. मदनराव नारायणराव सुकेणकर, ,,
१९ ,, दत्तात्रेय द्वारकानाथ तर्खडकर, ,,
२० ,, राजाराम बाबाशेट विसपुते, ,,
२१ कॅ. प्रभाकर शंकर गुप्ते, ,,
२२ श्री. गोपाळ त्रिंबक चाटवडकर, ,,
२३ डॉ. धोंडो गोविंद अभ्यंकर, माटुंगा
२४ श्री. गणपत भीमराव अफझुलपुरकर, ,,
२५ प्रो. गोविंद श्रीनिवास दिवाण, दादर
२६ श्री. विश्वनाथ आबाजी मोडक, सातारा
२७ ,, सदाशिव कृष्ण पिपळखरे, पुणे
२८ कु. अनसूयाबाई देवधर, ,,
२९ श्री. अनंत गोविंद कुळकर्णी, भोर
३० ,, शंकर वासुदेव खाडिलकर, पुणे
३१ ,, हरि वामन काणे, ,,
३२ प्रो. परशुराम महादेव लिमये, ,,
३३ डॉ. प्रो. परशुराम लक्ष्मण वैद्य, ,,
३४ श्री. केशव वामन ब्रह्म, नागपूर
३५ ,, अनंत रामचंद्र गोखले, ,,
३६ ,, नारायण शंकर हडस ,,
३७ ,, अनंतराव हणमंतशास्त्री पाध्ये, ,,
३८ ,, कृष्णस्वामी सभारत्नम्, ,,
३९ ,, ताराबाई वाटवे, पुणे
४० रा. सा. द. गो. कुलकर्णी औन्ध
४१ श्री. नळिकंठ दामोदर पुरंदरे, पुणे
४२ श्री. रामकृष्ण गोपाळ अक्षीकर, दादर
४३ ,, कृष्णाजी वामन चितळे, ,,
४४ ,, विष्णु कृष्ण जोशी, ,,
४५ ,, मोरेश्वर वासुदेव दोंदे, परळ
४६ सौ. कमलिनी दामले, दादर
४७ डॉ. वासुदेव वामन मावळंकर, ,,
४८ रे. सॅम्युएल जॉन आर. रामदास, भायखळा
४९ श्री. अनंत विठ्ठल आपटे, दादर
५० प्रो. विनायक अनंत गाडगीळ, ,,
५१ श्रीमती कृष्णाबाई वाघ, खार
५२ श्री. नारायण गणेश गाडगीळ, दादर
५३ डॉ. अनंत विश्राम मकासरे, भायखळा
५४ श्री. दत्तात्रेय दामोदर काळे, दादर
५५ सौ. कमलाबाई पंतवैद्य, ,,
५६ श्री. बाळकृष्ण रामचंद्र प्रभु ,,
५७ ,, दत्तप्रसन्न नारायण कारखानीस ,,
५८ प्रो. प्रल्हाद रावजी आवटी, ,,
५९ प्रि. विनायक केशव भागवत, ,,
६० प्रो. नानासाहेब रामजी तावडे, मुंबई
६१ श्री. रामचंद्र काशीनाथ जोशी, ,,
६२ ,, नारायण मंगेश कोप्पीकर, माटुंगा
६३ प्रो. नारायण गणेश नारळकर, पुणे
६४ ,, वामन माधव दबडघाव, ,,
६५ ,, गणेश हरि केळकर, ,,
६७ ,, श्रीकृष्ण निळकंठ चापेकर, ,,
६७ श्री. मोरेश्वर श्रीधर जोशी, ,,
६८ ,, यशवंत गणेश फफे, ,,

तहाहयात

१ प्रो. नरहर रघुनाथ फाटक, मुंबई

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## साहित्यविषयक परीक्षा

म. सा. परिषदेच्या योजिलेल्या साहित्यविषयक वार्षिक परीक्षा, उमेदवारास अधिक अवधि मिळावा या हेतूने, दसऱ्याच्या सुमारास न होता पाडव्याच्या सुमारास घेण्यात येतील. या परीक्षांचा अभ्यासक्रम खाली दिला आहे. परीक्षांसंबंधीच्या अटी, केंद्रें वगैरे सविस्तर माहिती मागाहून प्रसिद्ध करण्यात येईल.

चिटणीस

**म. सा. परिषद्**

### परीक्षांचा अभ्यासक्रम

पहिल्या व दुसऱ्या परीक्षांचे विषय व पुस्तकें हीं समितीने निश्चित केलीं आहेत. पुस्तकें दरसाल किंवा दोन वर्षांनी बदललीं जातील; दुर्मिळ पुस्तकांबद्दल दुसरीं सुचविलीं जातील. तिसऱ्या परीक्षेचा अभ्यासक्रम या दोन परीक्षांच्या अनुभवावरून ठरविला जाईल.

### पहिली परीक्षा

**दर्जाः**—मॅट्रिकच्या बराच वरचा, थर्ड इयर (ट्रेनिंग) बरोबरीचा. प्रत्येक पत्रिकेला १०० गुण ठेविले आहेत.

**प्रश्नपत्रिका १ ली (गद्य)**

१ यशवंतराव खरे (ह. ना. आपटे)
२ विष्णुशास्त्री चिपळूणकर चरित्र (लक्ष्मणराव चिपळूणकरकृत)
३ इतिहासमंजिरी (द. वि. आपटे)
४ विचारविलास (वा. म. जोशी)

**प्रश्नपत्रिका २ री (पद्य)**

१ नवनीत (निवडक वेंचे)
२ रसवंती (रानडे-खानोलकर भाग २)

**प्रश्नपत्रिका ३ री (भाषा, व्याकरण निबंध)**

१ व्याकरण (ना. वि. आपटे), २ वृत्तदर्पण (गोडबोले), ३ अलंकार (रा. भि. जोशी)
४ मराठीची सजावट (मुजुमदार).

### दुसरी परीक्षा

**दर्जाः**—बी. ए. (ऑनर्स) प्रत्येक पत्रिकेला १०० गुण.

**प्रश्नपत्रिका १ ली (गद्य)**

१ सुशीलेचा देव (वा. म. जोशी)
२ दौलत (ना. सी. फडके)
३ सौभद्र (किर्लोस्कर)
४ भाऊबंदकी (खाडिलकर)
५ प्रेमसंन्यास (गडकरी)
६ जागती ज्योत (वरेरकर)

**प्रश्नपत्रिका २ री (गद्य)**

१ टिळकचरित्र भाग १ ला (केळकर)
२ अच्युतराव कोल्हटकरांचे लेख भाग १ ला
३ भाऊसाहेब पेशव्याची बखर
४ वासुदेवशास्त्री खरे यांच्या प्रस्तावना
५ सुदाम्याचे पोहे (श्री. कृ. कोल्हटकर)

**प्रश्नपत्रिका ३ री (पद्य)**

१ मोरोपंत (एक पर्व-कर्ण, उद्योग इ.
२ ज्ञानेश्वरी (एक अध्याय १८ वा इ.
३ तुकाराम (महाराष्ट्र वेद—टिपणीसकृत)
४ केशवसुताची कविता (सी. के. दामले)
५ तांबे याची कविता (वा. गो. मायदेव)

**प्रश्नपत्रिका ४ थी (भाषा-साहित्य)**

१ व्याकरणावरील निबंध (कृष्णशास्त्री चिपळूणकर)
२ भाषाशास्त्र (कृ. पां. कुळकर्णी)
३ महाराष्ट्रसारस्वत (भावे—द्वितीयावृत्ति व तृतीयावृत्ति भाग १ ला)
४ मराठी गद्याचा इंग्रजी अवतार (द. वा. पोतदार)
५ अभिनव काव्यप्रकाश (रा. श्री. जोग)
६ छंदोरचना (मा. त्र्यं. पटवर्धन)

**प्रश्नपत्रिका ५ वी**

निबंधलेखन—दोन प्रकार

[ पत्रिकालेखनाच्या कामीं म. सा. परिषदेचे नवे शुद्धलेखन अनुसरलें पाहिजे. ]

चिटणीस

**म. सा. परिषद्**